सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला : पुष्प ४८ वें

# भारतीय राष्ट्रवादाचा विकास



लेखक

प्रा. न. र. फाटक



जून १९४९ ]

[ मूल्य ४॥ रुपये

# आमचें प्रकाशन

( शिल्लक नसलेल्या पुस्तकांची किंमत दिलेली नाहीं. )

१-२ **सत्याचे प्रयोग** ( द्वितीयावृत्ति ) : म. गांधी

३ **खादी-मीमांसा** ( द्वितीयावृत्ति ) : बाळूभाई मेहता

४ **स्वराज्य-शिपाई** : म. गांधी

५ **संयम कीं स्वैराचार ?** ( खंड १ ला ) : म. गांधी

६ **हिंडलग्याचा प्रसाद** : काका कालेलकर

७ **हिंदुधर्माचीं मूलतत्त्वें व पुनर्घटना** ( द्वितीयावृत्ति )
लेखक : डॉ. राधाकृष्णन् २॥

८ **उपनिषदांतील दहा गोष्टी** ( तृतीयावृत्ति )
लेखक : शंकरराव देव ॥॥

९ **विद्यार्थी-जीवन** ( द्वितीयावृत्ति ) : श्री. स. महाजन

१० **फिलिपाइन्सच्या स्वातंत्र्याचा इतिहास**
लेखक : त्र्यं. र. देवगिरीकर १।

११ **काँग्रेसचा इतिहास** ( द्वितीयावृत्ति )
लेखक : डॉ. पट्टाभिसीतारामय्या

१२ **समाजवादच कां ?** ( द्वितीयावृत्ति )
लेखक : जयप्रकाश नारायण २

१३ **खानबंधू** : महादेवभाई देसाई

१४ **पं. जवाहरलाल नेहरू** : आत्मचरित्र (द्वितीयावृत्ति) पं. नेहरू १२॥

१५ **विश्राम** ( पंचमावृत्ति ) : साने गुरुजी १॥

१६ **भारतीय संस्कृति** ( चतुर्थावृत्ति ) : साने गुरुजी ३

१७ **प्रसाददीक्षा** : म. गांधी

१८ **भिल्ल साधु गुलामहाराज** : शं. वि. ठकार

१९ **आधुनिक भारत** : आचार्य जावडेकर

२० **हिमालयांतील प्रवास** ( तृतीयावृत्ति )
लेखक : काका कालेलकर २।

२१ **गांधीजींचें विविध दर्शन** ( द्वितीयावृत्ति )
संकलनकार : डॉ. राधाकृष्णन् २॥

**२२ जिवंत व्रतोत्सव** ( द्वितीयावृत्ति ) : काका कालेलकर ३॥।
**२३ गांधी-विचार-दोहन** : किशोरलाल मश्रूवाला
**२४ सत्याग्रही महाराष्ट्र** : प्रेमा कंटक ३
**२५ अर्थशास्त्र कीं अनर्थशास्त्र ?** ( द्वितीयावृत्ति )
लेखक : जॉन रस्किन २
**२६ जीवन-दर्शन** ( तृतीयावृत्ति )
लेखक : महाकवि खलिल जिब्रान १॥।
**२७ ग्रामोद्योगाचें अर्थशास्त्र** : जे. सी. कुमारअप्पा
**२८ बापू** : घनश्यामदास बिडला
**२९ संस्कृतीचें भवितव्य** ( द्वितीयावृत्ति ) : डॉ. राधाकृष्णन् १।
**३० महात्मा गौतमबुद्ध** : डॉ. राधाकृष्णन्
**३१ जीवन आणि साहित्य** : आचार्य स. ज. भागवत २॥
**३२ प्राचीन साहित्य** : कविसम्राट् रवींद्रनाथ ठाकुर १॥
**३३ संयम कीं स्वैराचार ?** ( खंड २ रा ) : म. गांधी १॥।
**३४ हिंदु-मुसमान-ऐक्य** : आचार्य जावडेकर ३
**३५ गीता-हृदय** ( तृतीयावृत्ति ) : साने गुरुजी ॥।
**३६ हिंदूंचें समाजकारण** : काका कालेलकर २।
**३७ द्विखंड हिंदुस्थान** : डॉ. बाबू राजेंद्रप्रसाद ११
**३८ कॉंग्रेस-कथा** ( द्वितीयावृत्ति ) : गो. आ. देशपांडे ४॥
**३९ भगवान् बुद्धासाठीं** : शंकरराव देव ३॥
**४० आचार्य कृपलानी** : निवडक लेख व भाषणें ३
**४१ वाल्मिकी-आश्रमांतील प्रवचनें** : आचार्य जावडेकर १
**४२ संपूर्ण स्वदेशी** : म. गांधी २।
**४३ प्रवासी** : महाकवि खलिल जिब्रान २
**४४ ज्ञानेश्वरी-अंतरंग** : डॉ. रा. द. रानडे २॥
**४५ गांधीजींचें मानस** : म. गांधी ४
**४६ दिल्ली-डायरी** : म. गांधी ६
**४७ मानवजातीची कथा** : डॉ. हेन्री थॉमस ८
**४८ भारतीय राष्ट्रवादाचा विकास** : प्रा. न. र. फाटक ४॥

---

# प्रस्तावना



सुमारें तीन वर्षांमागें श्री• गोपीनाथ तळवळकर यांचें ' साधना ' नांवाचें पुस्तक प्रसिद्ध झालें. त्यावर अभिप्राय लिहावा• व तोहि शक्य तेवढा सविस्तर लिहावा असा ' यशवंत ' मासिकाचे संपादक श्री. गो. वा. पाध्ये यांचा तीव्र आग्रह पाहून 'यशवंत' मासिकांत कांहीं लेख लिहिले. त्यानंतर ते लेख एकत्र छापल्यास जिज्ञासूंना उपयोगी होतील असा आचार्य जावडेकर व भागवत या उभयतांचा अभिप्राय पडल्यामुळें ' सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाले'च्या व्यवस्थापकांनीं ' यशवंत ' मासिकांतले व त्यानंतर ' मौजे'च्या दिवाळी-अंकांतला एक ( जातीय दंग्याची मीमांसा ) असे लेख छापून काढले. या लेखांतील विषयाची पूर्तता नवा मजकूर जोडल्याशिवाय होणार नाहीं, असें वाटल्यामुळें नव्या मजकुरासाठीं हें पुस्तक सुमारें दोन वर्षं रखडलें. या दिरंगाईचा दोष सर्वस्वीं लेखकाचा आहे. प्रकाशक श्री. र. ग. जोशी व आचार्यद्वय यांनीं दिरंगाईच्या बाबतींत दाखविलेल्या सहनशीलतेबद्दल साभार कृतज्ञता कितीहि व्यक्त केली तरी ती अपुरीच ठरेल. हे लेख लिहून घेतले म्हणून 'यशवंत'चे श्री. गो. वा. पाध्ये यांचेहि आभार मानणें हें कर्तव्य आहे.

'साधने'वरील टीका हें मूळच्या लेखाचें स्वरूप आतांच्या संग्रहांत राहूं नये असा प्रयत्न केला असला, तरी श्री. तळवळकर किंवा त्यांचें पुस्तक यांचे निर्देश कुठें कुठें राहून गेले आहेत. शिवाय लेखांचा काळ व आजचा काळ यांत अंतर पडल्यामुळें मूळ लेखांचा रोख आतां तितकासा परिणाम-कारक न वाटणेंहि शक्य आहे. पण अर्वाचीन हिंदी राजकीय लढ्याचा शक्य तो सर्वांगीण इतिहास या दृष्टीनें लेखांत सादर केलेल्या माहितीचें महत्त्व कमी वाटूं नये अशी समजूत आहे. क्वचित् पुनरुक्तीचा दोषहि वाच-कांच्या प्रत्ययास येईल. दुसऱ्या आवृत्तीचा योग आल्यास आतांच्या दोषांचें परिमार्जन होईल.

मूळच्या व नंतर जोडलेल्या लेखांतील माहितीसाठीं हिंदी, इंग्रजी, उर्दू व बंगाली वगैरे भाषांतील अनेक ग्रंथांचें साह्य झालेलें आहे. त्या ग्रंथांच्या कर्त्यांचें व ते मिळवून देणारांचे आभार मानणें अवश्य आहे.

—न. र. फाटक

# अनुक्रमणिका

## प्रथम खंड


१ प्रास्ताविक ... ... ... १
२ काँग्रेसपूर्व जागृतीची चिकित्सा ... ८
३ हिंदुस्थानच्या राजकीय साधनेची तपस्या ... २३
४ सत्य आणि अहिंसा ... ... ५५
५ हिंदु-मुसलमान (पूर्वरंग) ... ... ६६
६ हिंदु-मुसलमान (उत्तररंग) ... ... ८४
७ जातीय दंग्यांची मीमांसा ... ... ९५
८ हिंदी संस्थानें ... ... ... १०५


## द्वितीय खंड


९ किसान-कामगारांचें राजकारण ... ... ११९
१० स्वराज्यवादाचीं स्थित्यंतरें ... ... १४५
११ दुसऱ्या महायुद्धाचीं वर्षें ... ... १८६
१२ म. गांधींची अवतारसमाप्ति ... ... २१२

## प्रास्ताविक : : : १

अलीकडे काँग्रेसनें हिंदुस्थानांत घडवून आणलेले राजकीय स्थित्यंतराचे बरेच इतिहास प्रसिद्ध झाले असून त्यांमध्यें प्रायः म. गांधींनीं काँग्रेसचीं सूत्रें हातीं घेतल्यापासून पुढें झालेल्या घडामोडींची हकिगत फार मोठ्या प्रमाणांत आस्थेनें देण्याचा प्रघात पडला आहे. म. गांधींनीं राजकीय चळवळीच्या दृष्टीनें विलक्षण मन्वंतर घडवून आणलें यांत मुळींच शंका नाहीं. परंतु त्यांचा हिंदी राजकारणांत पुढारीपणानें प्रवेश होण्यापूर्वीं देशामध्यें मुळींच जागृति नव्हती किंवा असल्यास उपेक्षणीय होती, ही भावना या विषयाकडे नव्यानें लक्ष देणारांना सोयीची असली, तरी इतिहासदृष्ट्या खरी नाहीं. एवढ्यासाठीं ज्यांना सगळ्या माहितीची आवश्यकता असेल त्यांनीं इंग्रजी राज्याच्या प्रारंभापासून लोकांमध्यें कोणत्या आचार–विचारांच्या लाटा उत्पन्न झाल्या होत्या, त्यांत कोणत्या भावनांचें प्राबल्य होतें, याचा बारीक शोध करणें अवश्य ठरतें. म. गांधींनीं राजकारणाला आपले गुरु गोखले यांच्या शिकवणीप्रमाणें नित्य आचरण्याच्या धर्माचें रूप देण्याला सुरुवात करण्यापूर्वीं हिंदुस्थानांत सामाजिक दुहीचा पाया इंग्रजी राज्यव्यवस्थेनें घातला होता. म. गांधी राजकारणांत आले तेव्हां नुकतेंच पहिलें महायुद्ध संपलें होतें. हिंदी मुसलमान तुर्की खिलाफतीच्या प्रश्नामुळें क्षुब्ध होऊन देशव्यापी चळवळीच्या उद्योगांत असल्याचें पाहून म. गांधींनीं हिंदु–मुसलमानांच्या ऐक्यानिमित्त मुसलमानांची खिलाफतीची चळवळ आपल्या कार्यास जोडली. १९२० ते १९२२ हीं दोन वर्षें या दोन्ही समाजांच्या ऐक्यानें खुललेलीं दिसलीं. १९२२ मध्यें तुर्कस्तानांत केमालपाशाचा उदय होऊन त्याच्या पुढारीपणाखालीं तुर्कांनींच खिलाफत विल्हेस लावल्यावर हिंदी मुसलमानांच्या

चळवळीचा आधारच नष्ट झाला व ते हताशेनें पूर्वस्थळीं आले, म्हणजे ते हिंदी स्वराज्याच्या चळवळीपासून निवृत्त झाले. हिंदुस्थानांत यानंतर हिंदु-मुसलमानांचें द्वैत वाढून जिकडे तिकडे आपसांतील दंग्यांची सांथ उठली! ही आपसांतल्या कलहाची समस्या समाधानकारक रीतीनें कशी निकालांत निघेल हा सर्व प्रकारच्या हिंदू पुढाऱ्यांना चिंतेचा विषय होऊन बसला आहे. कित्येकजण म्हणतात कीं, हा प्रश्न कायमच्या द्वैताचा असल्यानें दोन्ही समाजांना वेगवेगळ्या टापूंत अगदीं निराळे राहूं दिल्यासच तो सुटण्याचा संभव आहे. कोणाचा निश्चित अभिप्राय असा आहे कीं, हा प्रश्न इंग्रजी राज्यानें उत्पन्न केला असल्यामुळें तो त्या राज्याबरोबरच लयास जाईल व देशांत सलोखा नांदूं लागेल. म्हणून प्रथम काँग्रेसच्या स्थापने-पर्यंतचा स्थूल दृष्टिक्षेप करून हिंदु-मुसलमान-संबंधाचा व इतर बेबनावाच्या प्रकरणांचा पूर्वेतिहास पाहणें योग्य वाटतें.

१८८५ सालीं काँग्रेसची स्थापना होऊन हिंदी राष्ट्रीय जागृतीला संघटित स्वरूप आलें. पुढें या जागृतीचा विस्तार होत जाऊन तिचें बळ वाढलें. जागृतीच्या अंतिम ध्येयांत वेळोवेळीं फरक होऊन त्याबरोबर साधनेंहि बदललीं. हिंदुस्थानच्या राजकीय इतिहासाला १८८५ पासून प्रारंभ झाला हें कांहीं अंशीं खरें आहे. परंतु काँग्रेसची स्थापना ही त्या वर्षीं एकाएकी झालेली नाहीं. तिच्यामागें जवळजवळ दहा वर्षें निरनिराळ्या प्रांतांचे पुढारी आपापल्या परीनें नेटाची चळवळ करीत होते. हिंदुस्थानांतील निरनिराळे प्रांत एकाच वेळीं इंग्रजांनीं जिंकले नसल्यामुळें त्यांच्यामध्यें एकजिनसीपणा आलेला नव्हता. उदाहरणार्थ, पेशवाईचा अन्त १८१८ मध्यें झाला, तरी पंजाब १८४८ पर्यंत स्वतंत्र होता. मुंबई, मद्रास, कलकत्ता येथें विद्यापीठें १८५७ त स्थापन झालीं, तरी पंजाब, संयुक्तप्रांत इत्यादि इतर प्रदेशांमध्यें तीं मागाहून कितीतरी वर्षांनीं अस्तित्वांत आलीं. मध्यंतरीं १८५७ च्या बंडाळीचा तडाखा हिंदी जनतेला व इंग्रज राज्यकर्त्यांना सोसावा लागला. लष्कराचें बंड म्हणून त्याचा शेवट करण्यांत आला, तरी त्यानें इंग्रजांच्या राजकीय धोरणाला नवी दिशा लावलीच. १८६० मध्यें कायदेमंडळाची मुहूर्तमेढ रोंवली गेली. शिवाय या काळापर्यंत इंग्रजांनीं कितीतरी असे कायदे अंमलांत आणले

कीं, ज्यांच्यामुळें हिंदी जनतेला ' आपण सारे एक आहोंत; प्रांत, भाषा व किरकोळ चालीरीती भिन्न दिसल्या, तरी राष्ट्र या नात्यानें आड येण्यासारखे हे भेद नाहींत, सर्वांची राजकीय हिताची दिशा एकच आहे, ' अशा विचारांची जाणीव होऊं लागली.

जागृतीचा प्रारंभ बहुजनसमाजांत झालेला नव्हता. जमीनदार व मोठ्या भांडवलाचे व्यापारी यांच्यावर इंग्रजी राज्यकर्तृत्वाचा परिणाम प्रथम झाल्यामुळें जागृतीच्या पहिल्या संस्था त्यांनीं काढल्या. शिक्षण वाढल्यानंतर, बहुजनसमाजानें आपल्या कल्याणाचा मार्ग निराळा आंखल्याशिवाय गत्यंतर नाहीं, ही खूण कित्येक पुढाऱ्यांना पटली व त्यांनीं जुन्या जमीनदारांसारख्या बड्या लोकांच्या नेतृत्वाला सोडचिठ्ठी देऊन आपला सवता सुभा सुरू केला. बहुजनसमाजाचें लक्ष इंग्रजी राज्यपद्धतीच्या इष्टानिष्टतेकडे वेधून घेणाला सामाजिक सुधारणेचे जे पुष्कळसे कायदे १८६० पूर्वींच्या ३०।४० वर्षांमध्यें इंग्रजांनीं जारी केले, त्यांचा उपयोग विशेष रीतीनें झालेला आहे. या कायद्यांपैकीं कित्येकांनीं देशांत अतिशय मोठ्या प्रमाणांत तीव्र असंतोष उत्पन्न केल्याचे दाखले आहेत. असंतोष वरून विझल्यासारखा दिसला तरी तो निःशेष कधींच झालेला नव्हता. त्यांतच संस्थानें खालसा करण्याचा धूमधडाका सुरू झाला. संस्थानें म्हणजे जुन्या वैभवाचीं आश्रयस्थानें असा लोकांचा आजहि समज आहे. १८५७ पूर्वीं तो फारच उत्कट आणि व्यापक स्वरूपाचा होता. शिवाय नवीन तऱ्हेच्या इंग्रजी शिक्षणाचा प्रसार जोरानें चालूच होता. हें शिक्षण नव्या पिढीची बुद्धिमत्ता धार्मिक व सामाजिक शुद्धतेच्या दृष्टीनें भ्रष्ट करणारें आहे, अशा समजुतीनें लोक या शिक्षणाचा द्वेष करीत होते. १८५७ च्या बंडाळींत इंग्रजांच्या हिंदी लष्कराचा धुमाकूळ प्रचंड स्वरूपाचा असला, तरी त्या बंडाळीचीं सारींच कारणें लष्करी नाहींत. त्या कारणांना लष्करी असंतोष हें निमित्त सांपडलें. बंडाळीचा मोड केल्यावर इंग्रजी राज्यकर्त्यांनीं हिंदी जनतेच्या विविधतेचा व तिच्या मुळाशीं असलेल्या लहानमोठ्या भेदभावांचा फार बारीक अभ्यास करून आपल्या राज्यपद्धतीला नवी दिशा लाविली. कॉंग्रेसपूर्व काळासंबंधाचा प्रस्तुत ऊहापोह, अर्वाचीन हिंदी राजकारणाचा इतिहास योग्य रीतीनें आकलन करून घ्यावयाचा झाल्यास

केवळ काँग्रेसच्या स्थापनेनंतरच्या उलाढाली लक्षांत घेऊन चालावयाचें नाहीं हें गळीं उतरविण्यासाठीं केलेला आहे.

हिंदु–मुसलमानांच्या दुहीचा विचार केल्यास वरील प्रतिपादन जास्त स्पष्ट होण्याचा संभव आहे. हिंदुस्थानांत अरब लोक प्रचीन काळापासून व्यापारा-निमित्त येत होते. नंतर इस्लामधर्म अरबस्तानांत उदयास आला तेव्हां तेच अरब मुसलमान म्हणून हिंदुस्थानांत आपला व्यवहार करूं लागले. मात्र आतां नव्या धर्माचा आग्रह धरून त्यांनीं आपली निराळी व्यवस्था हिंदू राज्यांत करून घेतली. इस्लामच्या उदयानंतर सुमारें दोनशें वर्षांनीं अरब-मुसलमानांची धाड राज्य जिंकण्यासाठीं हिंदुस्थानांत उतरली. परंतु पुढें आणखी चारशें वर्षें गेल्यावर मुसलमानांचें हिंदुस्थानांत राज्य सुरू झालें. या चारशें वर्षांत सरासरी सव्वाशें दीडशें वर्षांच्या अंतरांनीं मुसलमानी स्वाऱ्यांचे कमी जास्त जोराचे धक्के हिंदू राज्यांना सोसावे लागले. या अवधींत मुसलमान धर्मप्रसारकांनीं पश्चिम हिंदी किनाऱ्यालगतच्या मुलुखांत आपल्या उपदेशाच्या प्रभावानें पुष्कळशा हिंदूंना आपल्या धर्माची दीक्षा दिली. तलवारीचा धाक दाखवून आपल्या धर्मांत हिंदूंना ओढण्याचा मामला पुढें सुरू झाला. मुसलमानांच्या धंदेरोजगारांचा अभ्यास केल्यास मुसलमान झालेले बहुतेक हिंदू कारागिरांच्या वर्गांतले होते असें आढळतें. मुसलमानांचा दरबार व राज्यकारभार प्रामुख्यानें लष्करी वळणाचा होता. या वळणाला उपयोगी पडणाऱ्या वर्गाला मुसलमान राजकर्त्यांनीं आपल्या धर्मांत खेचलें. इमारती बांधणारांत, हत्यारें घडवणारांत सर्वत्र मुसलमानच अतोनात दिसतात. नालबंद, भिस्ती, पाथरवट, रंगारी, चाबुकस्वार, बागवान, मांडव उभारणारे, यांच्याकडे व यांसारख्याच इतर धंदेवाल्यांकडे नजर टाकल्यास हिंदुस्थानां-तील मुसलमानांची संख्या कोणत्या वर्गानें वाढविली, याचा बोध होईल. लष्करी राज्याचे आधारस्तंभ या नात्यानें शिपाईगिरी हाच मुसलमानांचा मुख्य पेशा होता.

ब्रिटिशांचें राज्य होण्यापूर्वीं सगळ्या राज्यांतील फौजांत मुसलमानांचा भरणा जास्त होता. घोडा, भाला, बंदुक, तलवार इतकें साहित्य असलें, कीं कुणाहि मुसलमानाला फौजेंत दाखल होण्याला उशीर लागत नसे. सैन्यांत रहाण्याचा आणखी एक फायदा म्हणजे पोटाची ददात नसणें हा होय. पराक्रम,

साहस हे गुण उत्कर्षास येण्याला संधी मिळाल्यास सैन्यांतला मोठा अधिकार व इनाम–जहागीर मिळविणें सोपें होतें. लष्करावरच राज्याची मदार असल्यानें तें संतुष्ट राखण्याचा कटाक्ष बहुतेक राजेरजवाड्यांना बाळगावा लागे. यामुळें साध्या शिपाईगिरीलाहि खाणघालेण्याची टंचाई सहसा भासत नसे. स्वारी–शिकारींत लूटफाट हा कमाईचा रस्ता खुला होताच. यामुळें व्यापार किंवा शेतकी यांकडे लक्ष न देतां बहुतेक सारा मुसलमान हिंदुस्थानांतील लष्करांतच गुरफटलेला होता. इंग्रजी राज्याचा जसजसा विस्तार होऊं लागला, तसतसा मुसलमानांचा लष्करी व्यवसाय आंखडत चालला. १८१७ सालांतील पेंढाऱ्यांची वावटळ ही मुसलमानांच्या लष्करी दृष्टया होऊं लागलेल्या गळचेपींतून सुटण्याची धडपड म्हणावी लागते. १८५७ सालीं त्यांनीं दुसऱ्यांदा जोराची दंगल केली आणि ती वायां गेल्यावर मुसलमान समाज कांहीं काळपर्यंत अगदींच थंड राहिला. १८५७ सालच्या बंडाळीचें पुढारीपण मुसलमानांचें असल्यानें हा समाज इंग्रजी राज्याचा कायमचा शत्रु आहे असें ठरवून इंग्रज राज्यकर्त्यांनीं त्याच्याबद्दल बरींच वर्षें मनांत अढी धरली होती.

१८५७ नंतरच्या काळांत जिकडे तिकडे इंग्रजी राज्यकारभारांत हिंदु समाज सरसावला. पण हळूहळू त्याला आपण इंग्रजांचें अंकित आहोंत, याची जाणीव टोंचूं लागली. विशिष्ट मर्यादेच्या पलीकडे राज्याधिकारांत इंग्रज आपल्याला फिरकूं देत नाहींत, ही स्थिति हिंदूंच्या हृदयाला जाचूं लागली. लायकी असेल त्याला वाटेल त्या उंच अधिकारावर चढतां येईल असा नियम असला, तरी हिंदी माणसाच्या वाटेंत अनेक विघ्नें उभीं केलेलीं असल्याचा प्रत्यय हिंदु समाजाला येत चालला. इंडियन सिव्हिल सर्व्हिसच्या परीक्षेंत वयाच्या व इतर अटी अशा होत्या, कीं हिंदी तरुणाला या परीक्षेचा नादच सोडावा लागे. [ अगदीं पहिली चळवळ सिव्हिल सर्व्हिसच्या परीक्षेबद्दलची असल्यामुळें तिचा निर्देश येथें केलेला आहे. ]

इंग्रजी राज्यांत हिंदूच आघाडीवर असल्यानें त्यांच्यांत जेव्हां जास्त जास्त राज्याधिकार हस्तगत करण्याची लालसा उत्पन्न झाली, तेव्हां अगदीं मागासलेल्या स्थितींत रखडणाऱ्या मुसलमानांच्या हिताचा कळवळा इंग्रजांमध्यें उत्पन्न झाला ! मुसलमानांचा पाठिंबा हा इंग्रजी राज्यरक्षणाचा एक

तट होऊं शकेल, अशी कल्पना १८७०–७५ च्या सुमारास इंग्रज राज्यकर्त्यांकडून स्वीकारली गेली व त्या कल्पनेला अलीगढच्या मुसलमान कॉलेजानें मूर्त रूप आणलें. मुसलमान संस्कृति, भाषा, महति इत्यादिकांच्या भेदाची कल्पना या सुमारास रुजत घातली गेल्यावर १९०६ सालीं तिचा 'मुस्लिम लीग' या संस्थेच्या रूपात मोठा वृक्ष होऊं लागल्याचें आढळून आलें. मुस्लिम सवत्या सुभ्याच्या पायावर ही इमारत उभी ठाकली. १८९३ सालीं जो कायदेमंडळाच्या सुधारणेचा कायदा झाला, त्यांत सवत्या सुभ्याला अवकाश देण्याइतका मुसलमान समाज जागृत व संघटित नव्हता. मोर्ले–मिंटो–सुधारणांच्या वेळीं मुसलमानांना वेगळे करण्याची कल्पना तडीस नेण्यांत आली. त्या सुधारणा विलायतेस घडविल्या जात असता १९०५ मध्यें कर्झनसाहेबांनीं बंगालप्रांताचीं शकलें पाडलीं. राज्यकारभाराची सोय हें या शकलीकरणाचें एक निमित्त सांगण्यांत आलें असलें, तरी हिंदु–मुसलमानांची फूट साधण्याचा डाव त्या चिरफाडींत होता, असें मानण्याला जागा आहे. हिंदु–मुसलमानांचे दंगे अधूनमधून १०।२० वर्षांनीं क्वचित् होत असत. परंतु बंगालच्या फाळणीनंतरच्या वर्षांत प्रथम बंगालमध्यें व नंतर इतरत्र हे दंगे फार मोठ्या प्रमाणांत होऊं लागल्याचें सिद्ध करणें कठिण नाहीं. किंबहुना, हे अनिष्ट प्रकार सांप्रत हिंदी राजकीय जीवनाचें एक अपरिहार्य अंगच बनत आहे कीं काय, असा संशय बाळगण्याजोगी या प्रकाराची सध्यांची स्थिति आहे. मुसलमानांना सवता सुभा दिल्याचेंच ताजें फळ म्हणजे पाकिस्तानची मागणी हें होय.

हिंदु–मुसलमानांच्या द्वैतानेंच हिंदी समाजाची विभागणी थांबली नाहीं. पंजाबांत शिखांची वस्ती मोठी असून शीख हा हिंदुस्थानांतील लष्कराचा महत्त्वाचा आधार आहे. मोर्ले–मिंटो–सुधारणा अमलांत येण्याच्या सुमारास १९११ सालीं झालेल्या शिरगणतींत शिखांची निराळी जात ठरविली गेली. त्यापूर्वीं शीख हा हिंदू समाजाचा एक पोटविभाग मानला जात होता. हिंदूंमध्यें पूर्वीं जसे शैव, वैष्णव, जैन, बौद्ध हे धर्मपंथ होते, त्यांतलाच शीख हा एक अर्वाचीन संप्रदाय, ही वस्तुस्थिति १९११ तील शिरगणतीनें बदलून टाकली. शीख हे मुसलमानी अरेरावीच्या प्रतिकारार्थ आज पुष्कळदां हिंदु-महासभावाल्यांच्या जोडीनें दिसतात खरे; पण ते स्वतःला हिंदू समजत नाहींत हें देखील तितकेंच खरें आहे. शीख हिंदु–समाजांतून बाहेर पडल्याचा

दहा वर्षांनीं पंजाबांत शिखांच्या अकाली पंथानें जी चळवळ केली, ती आपल्या गुरुद्वारांच्या सुधारणेसाठीं असली, तरी तिनें हिंदुसमाजाचेंहि थोडें-फार नुकसान केल्याचीं उदाहरणें विचारवंत संशोधकांना सांपडतील. मुसलमानांच्या सवत्या सुभ्याला पंजाबांत बळकटी येऊं शकणार नाहीं व हिंदूंनाहि जोर करतां येणार नाहीं, अशी तजवीज हिंदूंतून शीख बाहेर पडल्यामुळें झाली.

आधीं मुसलमान, नंतर शीख यांना विभक्त केल्यावर १९१६ मध्यें या विभक्तपणाच्या प्रयोगाला नवी शाखा फुटली. तिचेंहि मूळ राज्यसुधारणेच्या नांवानें चालणाऱ्या उद्योगांत आहे. हिंदुस्थानांत अस्पृश्य [Untouchable] किंवा दलित [Depressed] या शिक्क्यानें ओळखले जाणारे वर्ग हजारों वर्षांपासून आहेत. इंग्रजी राज्यांतहि ह्या वर्गाची परंपरागत दुर्दशा बदलली नाहीं. इंग्रज राज्यकर्त्यांनीं त्या हलाखीच्या स्थितीकडे कधीं स्वयंप्रेरणेनें लक्ष दिल्याचा पुरावा नाहीं. तथापि १९१६ मध्यें लखनौस कॉंग्रेस-लीगचा समेट झाल्याचें दिसल्यावर नव्या राज्यसुधारणेची विवंचना चालवितांना दलितवर्गाच्या कैवाराचा झटका राज्यकर्त्यांच्या ठिकाणीं उद्भवल्याचा अनुभव येऊं लागला. मांटेग्यू-चेम्स्फर्ड-सुधारणाच्या कच्च्या खर्ड्यांत या झटक्याचे परिणाम उमटले आहेत, व तेव्हांपासून अस्पृश्यांचें हित हें हिंदी राजकारणांत नवें कलम सुरू झालें आहे. या कलमाबद्दलचें राज्यकर्त्यांमधील उसनें अवसान पाहूनच प. वा. लाला लजपतराय यांनीं एकदां मध्यवर्ति कायदेमंडळात वैतागानें राज्यकर्त्यांची झगझणीत कानउघाडणी केल्याचा प्रसंग पुष्कळ जाणत्यांना येथें आठवण्याला हरकत नाहीं. हें विभक्तपणाचें खूळ आतां मोठमोठाल्या समाजविभागांतच न थांबतां किती खोलवर जाऊं पहात आहे याचा अंदाज येण्यासाठीं गुजराती-दाक्षिणी, कोंकणस्थ-देशस्थ, कोंकणस्थांत पुनः ऋग्वेदी-आपस्तंभ अशासारख्या सौम्य-उग्र किंवा व्यापक-संकुचित वादांचा निर्देश केल्यास अनुचित होणार नाहीं. हिंदी एकराष्ट्रीयत्वाचा हा देखावा पहातांना प्रांताप्रांतांमधील दुजाभाव दृष्टिआड न करणें चांगलें.

# कॉंग्रेसपूर्व जागृतीची चिकित्सा : : : २

## लोकहितवादींची भविष्यवाणी

हिंदी राजकीय जागृतीला संघटित स्वरूप कॉंग्रेसच्या स्थापनेमुळें आलें. तेव्हांपासूनच हिंदी राजकीय चळवळीचा इतिहास सुरू झाला, असें मानण्यांत येतें; परंतु खोल अभ्यास करणारांना तो इतिहास इंग्रजांच्या राजवटीबरोबरच जन्मास आल्याचें दिसून येईल. राममोहन रॉय ही या इतिहासांतील पहिली ठळक व्यक्ति दृष्टीस पडते. १८१३ सालीं कंपनीसरकारच्या कारभाराची नवी दिशा मुक्रर करण्यांत आली. तिचें व्यापार हें ध्येय संपुष्टांत येऊन राज्यकर्तृत्वाच्या ध्येयाची दीक्षा कंपनीच्या व्यवस्थेला मिळाली. पुढें दर वीस वर्षांनीं या ध्येयाचा अंमल कितपत झाला याचा आढावा घेऊन कंपनीवर राज्यकर्तृत्वाच्या नवीन नवीन जबाबदाऱ्या लादल्या जाऊं लागल्या. १८३३ च्या सुमारास हिंदी समाजांतील विचारवंत माणसें राजकीय दृष्टीनें किती पुढारलीं होतीं याची कल्पना राममोहनांच्या विस्तीर्ण साक्षीवरून सहज होईल. १८५३ च्या फेरतपासणीच्या वेळीं तर कांहीं प्रांतांतून आपलीं राजकीय गाऱ्हाणीं पद्धतशीरपणें ब्रिटिश पार्लमेंटासमोर दाखल करण्यासाठीं स्वतंत्र संस्थाच निर्माण झाल्या होत्या. त्यांचीं गाऱ्हाणीं व हक्कांची मागणी नजरेखालीं घातल्यास १८३३ ते १८५३ या वीस वर्षांत हिंदी समाजानें राजकारणाचें ज्ञान कोठवर आपलेंसें केलें होतें, याचा बोध होण्याला उशीर लागत नाहीं. पुण्यांत निघालेल्या ‘ कल्याणोन्नायक मंडळ ’ नामक संस्थेनें हिंदी समाजाच्या हक्कांचा एक मसुदा तयार केला होता. तो पार्लमेंटकडे रुजू करून, कमीअधिक शिष्टाईसाठीं आपल्यांतले जाणते वादपटू विलायतेस पाठविण्याचा या मंडळानें संकल्प सोडला होता. हा मसुदा हिंदी राजकीय जागृतीचा दर्शक

आहे. मंडळाचे एक पुरस्कर्ते सरदार गोपाळराव देशमुख-उर्फ 'लोकहित-वादी' यांनी १ एप्रिल १८४९ साली प्रसिद्ध केलेल्या पत्रांतील भविष्य येथें सादर केल्यास तेव्हांच्या विचारवंतांच्या राजकीय आकांक्षा कळण्याला साधन होईल. इंग्रज हिंदुस्थानांत राज्य करूं लागले हें उत्तम झालें. असें त्यांनीं म्हटल्यामुळें त्यांच्यावर अनेकविध अभद्र आरोप करण्याचा एक शिष्टाचारच होऊन बसला आहे! केवळ राजनिष्ठेच्या भावनेनें त्यांनीं इंग्रजी राज्याचें स्वागत मांडलें, हा ग्रह चुकीचा आहे. 'हिंदी समाजांतील मूर्खपणा मोडण्यास व त्यास ताळ्यावर आणण्यास परदेशांतील सुधारलेले लोक यांची व त्यांची गांठ घालून देण्यापेक्षां उत्तम उपाय दुसरा कांहीं आहे, असें वाटत नाहीं. यास्तव ईश्वरानें या देशांत इंग्रजांची प्रेरणा केली आहे...तेव्हां या साक्षात् शहाणे लोकांची गांठ पडून हिंदू लोकांच्या वाईट चाली बहुत सुटल्या व आणखींहि कितीएक सुटतील. आणि यांचीं मनें शुद्ध होऊन यांस राज्यकारभार, व्यापारधंदा कसा करावा हें ज्ञान येईल. देशसुधारणा क्षणांत होत नाहीं. तीस पुष्कळ विलंब लागतो...अर्थातच दोनशें चारशें वर्षें लागतील. तोंपर्यंत या लोकांस दुःख आहे. परंतु त्यास उपाय नाहीं.' याप्रमाणें प्रस्तावना करून लोकहितवादी म्हणतातः—'लोक शहाणे झाले म्हणजे हळूच इंग्रजांजवळ म्हणतील कीं, आम्हांस तुमच्या देशांत आहे तसें पार्लमेंट द्या. नंतर आपले लोक त्यामध्यें बसूं लागले म्हणजे हळूच म्हणतील कीं, तुम्हांसारखेच आम्ही शहाणे आहों, मग आम्हांस अधिकार कां नसावे? मग हिंदू लोकांचें बहुमत असें पडलें म्हणजे सरकारास देणें अगत्य होईल. इकडील लोक राज्याचे कारभार वगैरे चांगले करूं लागले, लांच खावयाचें सोडून दिलें म्हणजे बहुतकरून मोठालीं कामें गवर्नरीचींसुद्धां यांचे हातीं येतील आणि मग अर्थातच इंग्रज फक्त व्यापार मात्र करून राहातील. म्हणजे जसे हिंदुस्थानांत प्रथम इंग्रज आले त्या स्थितीवर येतील आणि **आपले लोक पार्लमेंट व स्वराज्य भोगतील.** राज्यकारभारांत व व्यापारांत त्यांस महत्त्व प्राप्त होईल. आणि मग परदेशांशीं देखील व्यापार करतील. असे हे लोक प्रबल झाले म्हणजे इंग्रजांस कांहीं दिवसपर्यंत आभारी मानतील; कारण कीं त्यांचे योगानें हे ज्ञानी झाले. **परंतु ज्या काळीं इंग्रज गडबड करूं लागतील किंवा कांहीं नवीन**

**कानू बसवावयाचा आग्रह धरतील त्या काळीं जसें अमेरिकेंत झालें तसें होऊन हे लोक आपल्यास स्वतंत्र करून घेतील. आणि इंग्रजांस सांगतील कीं तुम्हीं आपले देशास जावें**, आतां आमचे देशाचा कारभार आम्हांस चांगला करतां येतो. **तुमचें गुरुत्व नको**. तुम्ही पाहिजे तर व्यापारापुरते इकडे येत जा. आमचे प्रजेचें जसें आम्ही रक्षण करतों, तद्वत् तुमचेंहि करूं; परंतु **तुमचें वर्चस्व नको**. याप्रमाणें या देशाची गति होईल...यांस दोनशें वर्षे तरी पाहिजेत. परंतु असें होईल यांत संशय नाहीं.' [जाडा ठसा मुळांतला नाहीं.]

**स्वदेशीचा उपदेश : व्यापारधंद्यांची उभारणी**

लोकहितवादींनीं राजकीय दृष्टीनें मारलेल्या उडींत कायदेमंडळाच्या मागणीपासून तों संपूर्ण स्वातंत्र्याच्या आणि 'क्विट् इंडिया'च्या घोषणेपर्यंतचे सारे टप्पे ओलांडले आहेत. इंग्रजी राज्यापायीं हिंदी समाज गुलामगिरींत बुडून नामशेष होईल म्हणून लोकांनीं इंग्रजांचें शहाणपण घेऊन आपल्या नशिबाचे दरवाजे उघडण्याचा उद्योग निकरानें केला पाहिजे, असा तळमळीचा विचार त्यांच्या 'शतपत्रां'त अनेकदां उत्कटतेनें प्रकट झाला आहे. आणखी एका उताऱ्यानें लोकहितवादींच्या विचारसरणीची जास्त स्पष्ट कल्पना होईल. हा उतारा १३ मे १८४९ रोजीं लिहिलेल्या पत्रांतील आहे:—'तात्पर्य, विलायतेंतील पार्लमेंट यास हा देश कसा वाटतो कीं जसा आपले घरीं गडी आहे, त्यानें एकादा व्यापार केला व त्यांत त्यानें अन्याय केला तरी आपण तें मनास आणीत नाहीं. कारण आपण आपलें घरचें काम टाकून गड्याचा घरचा कारभार कशाला पाहूं ? ...सवतीचे मुलाची काळजी कोण करतो ? **तेव्हां आमचे लोकांनीं एकत्र होऊन पार्लमेंट मागावें** आणि मुंबई—कलकत्ता अशा ठिकाणीं तें नेमून तेथें कांहीं इंग्रज व आपले सर्व जातीचे शहाणे लोक त्यांत ठेवावे आणि त्यांचे हुकुमानें कारभार करावा. म्हणजे विलायतेचे बादशहाजादीसहि नाहीं म्हणवणार नाहीं. **कारण कीं विलायतेंत पार्लमेंट असावें व येथें नसावें अशी आम्हीं कांहीं चोरी केली नाहीं**. हा एक मोठा उपाय साध्य व्हावयाजोगा आहे.' राजकीय प्रगतीचें अंतिम साध्य दाखविल्यावर लोकहितवादींनीं 'स्वदेशी' चा सिद्धान्त निवेदन केला आहे. 'तूर्त दरिद्र मोडण्यास उपाय असा आहे कीं, ब्राह्मण लोकांनीं आपल्या

मूर्खपणाच्या समजुती सोडाव्या आणि केवळ कारकून आणि भट हे दोनच रोजगार आम्ही करूं असें म्हणूं नये. या देशांत आणखी पुष्कळ रोजगार आहेत व तेहि आतां इंग्रज दिवसेंदिवस घेत चालले. सावकारी, शेतकी वगैरे इंग्रज करूं लागले. हेच रोजगार आपले लोकांनीं करावे. म्हणाल तर कांच, कापड, सुरी, कात्री, लांकडी सामान, घड्याळें, चाबूक, यंत्रें इत्यादि पुष्कळ इकडे इंग्रज खपवितात. हीं सर्व आपले लोकांनीं करावयास शिकावें. व येथें जो माल खपणार नाहीं तो दुसऱ्या देशास घेऊन जावा आणि तेथें विकावा. पुष्कळ देश आहेत या गोष्टीचा शोध करावा व **इंग्रजांचें देशाचें सामान बंद करावें**; किंबहुना, आपलें सामान त्यांस द्यावें. परंतु त्यांचें आपण घेऊं नये. जो इकडे उत्पन्न होईल तितका माल घ्याव. **विलायती कापड घेऊं नये**, यास्तव आपल्यास जाडीं मोठीं कापडें नेसावयास लागलीं तर काय चिंता आहे ! परंतु आपले देशाचें रक्षण करावें.' जो उठतो तो इंग्रजी शिकतो नोकरीच्या मागें लागतो, यामुळें बेकारींत खितपावें लागतें हा मुद्दा या प्रसंगीं उजेडांत आणला आहे: 'जो तो इंग्रजी शिकतो. परंतु इतक्यांची गरज नाहीं. यामुळें दीनवाणी फिरतात.'

## महाराष्ट्राची राजकीय जागृति

गेल्या शंभर वर्षांतील राजकीय जागृतीचा आढावा घेतल्यास लोकहित-वादींनीं व्यक्त केलेल्या विचारांच्या पुढें मजल गेली आहे असें म्हणवत नाहीं. परंतु १८४९ सालांत विचार समजण्याची पात्रता समाजाच्या वरच्या जागत्या ठरलेल्या वर्गांतहि नव्हती. इंग्रजांचा हिंदुस्थानांतील दिग्विजय तेव्हां शिखरास चढत होता. पंजाबचें स्वतंत्र शीख राज्य नुकतेंच त्यांनीं पादाक्रान्त केलेलें होतें. कित्येक लहानमोठीं संस्थानें आपल्या विस्तारांत जिरविलीं होतीं व कित्येक गिळण्याकरितां तयारी केली होती. इनाम–कमिशनामार्फत जहागीरदार–इनामदारांचा चट्टामट्टा सुरूच होता. इंग्रजी राज्याच्या विस्ताराचा हा देखावा डोळयांसमोर ढळढळीत दिसत असतां इंग्रजांचें राजकीय वर्चस्व नष्ट होण्याचें व करण्याचें भविष्य वर्तविणारा वेड्यांत गणला जाऊन त्याच्या विचाराकडे कुणाचेंच लक्ष जाऊं नये, हें तत्कालीन लोकस्थितीची अटकळ बाळगल्यास स्वाभाविकच म्हणावें लागतें.

त्या दिवसांत पेशवाईतील जहागिरी व इनामें ऐतखाऊपणानें भोगणारे लोक व शास्त्री–भिक्षुकादि त्यांचे आश्रित हेच काय ते स्मशानांत मोडणारे वर्ग होते. बाकीच्या बहुजनसमाजाला पेशवाई गेली व इंग्रजशाही आली या क्रांतीचा अर्थ समजण्याजोगा नव्हता. या क्रांतीचा धक्का कांहींसा जोराचा बसला तो जुन्या राजवटीमध्यें जहागीरी–इनामें खाऊन त्या राजवटींत अधिकारानें उठाठेवी करणाऱ्या लोकांना बसला. त्या धक्क्यानें त्यांच्या जवळच्या आश्रितांनाहि गदगदां हालविलें! परंतु या क्रांतीचें पर्यवसान कोणत्या वळणांनीं कोठवर जाईल याची कल्पना करतां येण्यासारखे संस्कार त्यांच्या बुद्धीला पूर्वीं कधींच मिळालेले नव्हते. लोकहितवादींनीं या क्रांतीच्या संबंधांत इतिहास व राज्यशास्त्राचीं पुस्तकें वाचून आपली बुद्धि चालविली आणि हिंदी समाज कालान्तरानें स्वराज्य प्राप्त करून घेईल, असें भाकीत निःशंकपणें बोलून टाकलें. परंतु यासारख्या दूरदर्शी प्रगल्भ राजकीय विचारांची उपेक्षा करून जुन्या विद्या, भटाभिक्षुकांचे धर्माच्या नांवाखालीं चालणारे अनर्थावह उद्योग, नव्या परिस्थितीबद्दलची निराशामय उदासीनता, इत्यादिकांविषयीं त्यांनीं केलेल्या खरमरीत टीकेकडे व इतस्ततः त्यांनीं केलेल्या इंग्रजांच्या स्तुतीकडे लक्ष पुरवून, त्यांची जी नालस्ती विचारांच्या भरीवपणापेक्षां आवेशाच्या सफाईदार भाषाशैलीनें लोकांस झुलविणाऱ्या लेखकांनीं जी एकदां सुरू केली, ती अजून पूर्णपणें थांबलेली नाहीं.

महाराष्ट्रीय समाजापुढें राजकीय जागृतीचा वृत्तांत सांगत असतां कुणालाहि असें सिद्ध करतां येण्याजोगें आहे कीं, महाराष्ट्राइतका राजकीय विचारांत बराच पुढें सरसावलेला दुसरा प्रांत त्या काळांत नव्हता. लोकहितवादींच्या मताची चर्चा थोडी पाल्हाळानें करण्याचें कारण असें कीं, लोकहितवादींच्या बाबतींतला अन्याय व गैरसमज नाहींसा व्हावा.

## इंग्रजी राज्य, कायदा, शिक्षण=हिंदी जागृति

हिंदी राजकीय तपश्चर्येचा उगम इंग्रजी राजवटीच्या प्रारंभापर्यंत मागें जाऊन पहावा लागतो. इंग्रजी राज्य, इंग्रजी कायदा, इंग्रजी शिक्षण आणि मिशनऱ्यांचा स्वधर्मप्रसारार्थ चाललेला उद्योग यांच्या तडाख्यांनीं हिंदी जनतेला जागृत करून

स्वोद्धाराच्या तपश्चर्येकडे वळविलें. १८६० पर्यंत स्वोद्धाराचा यत्न शिथिल व दुबळा होता. १८६० मध्यें कायदेमंडळें अस्तित्वांत आणून सरकार-मान्य हिंदी पुढाऱ्यांना आपलीं मतें बड्या अधिकाऱ्यांच्या कानांवर समक्ष घालण्याची व्यवस्था सरकारनें केली; परंतु हिंदी पुढाऱ्यांचें त्यामुळें समाधान होऊं शकलें नाहीं. १८६० नंतर असे कित्येक कायदे एकामागून एक जारी झाले, कीं ज्यांच्या योगानें हिंदी जनतेला आपली राजकीय गुलामगिरी काळजास जाऊन झोंबली. लिटनशाहीचें स्मरण या अनुसंधानांत सहज होणारें आहे. १८६०–१८८० हीं वर्षें जुलमी कायदे, दुष्काळ, हिंदी जनतेच्या उपमर्दाचे प्रसंग यांनीं भरलेलीं आहेत. या कालखंडाच्या अखेरीस सबंध देशांत रक्तपात, जाळपोळ, लुटालूट यांचा धूमधडाका माजण्याचा संभव ब्रिटिश राज्यकर्त्यांना दिसूं लागला होता. महाराष्ट्रांत तर सावकारांचीं घरें लुटणें, त्यांना शारीरिक इजा करणें, त्यांचीं कागदपत्रें जाळणें, असल्या दंगलींतून स्वराज्यप्राप्तीच्या यत्नाची एक ठिणगी उडाल्याचें इतिहासज्ञांस अवगत आहे. लिटनशाहीमागून रिपनसाहेबानीं राज्यकारभाराची धुरा आपल्या खांद्यांवर घेऊन लोकांतील क्षोभाला विरजण घातलें, पण त्यांच्या कारकीर्दींतहि हिंदी जनतेला हीनत्वानें लेखण्याच्या ब्रिटिश प्रवृत्तीचा एक मासला दृष्टीस पडलाच ! लोकांचा असंतोष रिपनसाहेबानीं कमी केला, पण तो धुमसत होता. त्याचें एक प्रतीक म्हणजे काँग्रेस ही संस्था होय.

## राष्ट्रीय जागृतीचे हक्कदार !

१८६० पासून १८८५ पर्यंतच्या पंचवीस वर्षांत युनिव्हर्सिटीचें शिक्षण घेतलेल्यांची संख्या पुष्कळच वाढली होती. देशपरदेशांतील राजकारणाचें ज्ञान देणारीं व त्याचा साधकबाधक खल करणारीं देशी व इंग्रजी भाषेंतील वृत्त-पत्रें वाढत्या संख्येनें लोकमताला जागृत करण्याचें काम करीत होतीं. विलायतेस जाऊन तेथील शिक्षण घेतलेलीं माणसेंहि देशांत बरींच होतीं. जमीनदार–कारखानदारांच्या कक्षांतून हिंदी राजकारणाचीं सूत्रें निसटून तीं डॉक्टर, वकील, बॅरिस्टर, पेन्शनर, बिनसरकारी व निमसरकारी कारकून, वृत्तपत्रकार वगैरे मध्यमवर्गीतील लोकांच्या हातीं आलीं होतीं. सुरेंद्रनाथ बानर्जीनीं स्थापिलेली इंडियन असोसिएशन [ १८७६ ] व मुंबईतील बॉंबे

प्रेसिडेन्सी असोसिएशन [१८८५] या संस्था मध्यम वर्गातील लोकांच्या क्रियाशील जागृतीची साक्ष देणाऱ्या आहेत. पुण्यांतील सार्वजनिक सभेचें १८७० सालानंतरचें कर्तृत्व हें याच जागृतीचें प्रमाण आहे. याच काळांत हिंदी राष्ट्रीयत्वाच्या भावनेला धर्माभिमानाची पुष्टि पुरविणाऱ्या आर्यसमाज, थिऑसफी यांसारख्या संस्था उदयास आल्या. राष्ट्रीयत्वाला आध्यात्मिकतेच्या रंगानें धर्माचा खुराक देण्याला रामकृष्ण परमहंसांच्या अनुयायांनीं याच काळांत प्रारंभ केला होता. वैष्णव भक्तिपंथाची कांस धरणाऱ्या शिशिरकुमार घोषांसारख्या व्यक्ती नव्या राष्ट्रीयत्वाची जुन्या भक्तिसंप्रदायाच्या भूमिकेवर राहून जोपासना करणाऱ्या लोकांच्या प्रतिनिधी होत. महाराष्ट्रांतील रानडे-भांडारकरांचा प्रार्थनासमाज किंवा ज्योतिबा फुल्यांचा 'सत्यशोधक' समाज यामध्यें हिंदी धर्मश्रद्धेला नवें रूप देण्याची प्रेरणा होती. परंतु भौतिक शास्त्रांच्या ज्ञानाच्या चौकटींत जुन्या चमत्कारिक धर्माचाराला बसवून त्याचें मंडन करण्याचा व त्याविषयीं दुरभिमान वाढविण्याचा हेतु जसा इतर संप्रदायांमध्यें आढळतो तसा नव्हता; म्हणून ब्राह्म किंवा प्रार्थना समाज आणि सत्यशोधक समाज यांना इतरांहून थोडें निराळें मानावें लागतें.

हिंदी राष्ट्रीयत्वाला उदयास आणल्याचा हक्क आपल्या संप्रदायाचा आहे असें वरील वेगवेगळ्या संप्रदायाचे अनुयायी बजावतांना दिसतात. हिंदी जनतेच्या हक्कांचा पुरस्कार सार्वजनिक रीतीनें करणारा पहिला पुरुष राममोहन म्हणून ब्राह्मसमाजानें हिंदी राष्ट्रीयत्वाच्या उदयाचें पुण्य आपल्या गांठीस बांधावें, यांत नवल नाहीं. इंग्रजी शिक्षणानें होऊं लागलेल्या धार्मिक ऱ्हासाला अडवून लोकांना वैदिक तत्त्वान्वयें स्वधर्मतत्पर करण्याची कामगिरी स्वामी दयानंदांची. यामुळें वैदिक धर्म हाच सर्व प्रकारच्या पराक्रमाचा पाया, हें लक्षांत बाळगून स्वामीजींचे भक्त हिंदी राष्ट्रीयत्वाच्या उठावणीचें श्रेय आपल्याकडे खेंचतात. थिऑसफीच्या योगानें कॉंग्रेसचें बीजारोपण झालें, तेव्हां या संप्रदायाला योग्य मान द्या, असा दावा प. वा. बेझंटबाईच्या लिखाणांत नमूद आहे. प्रथम बाबू [आतां योगी] अरविंदांनीं व पुढें देशबंधु दासांनीं हिंदी राष्ट्रीयत्वाचे जनक इतर कोणी नसून स्वामी रामकृष्ण परमहंसच ठरतात असें लोकांच्या कानांवर हडसूनखडसून सांगितल्याचे दाखले हिंदी राजकीय विचाराच्या प्रगतीचा अभ्यास करणारांना अपरिचित नसावेत. हिंदी राष्ट्रीयत्वाच्या उभारणींत

धर्माभिमानाचा एक प्रबळ घटक दिसतो, याला मुळांत इंग्रजी कारभारच कारणीभूत आहे. इंग्रजी शिक्षण व कायदा यांनीं जुन्या समाजरचनेवर आंतून-बाहेरून जोराचे आघात करून त्याची एकोणिसाव्या शतकाच्या दुसऱ्या पंचविशींत दुर्दशा उडविली होती. भौतिक शास्त्राच्या ओळखीनें इंग्रजी शिक्षण घेणारांनीं जुन्या धर्माचरणाला तिळांजलि देण्याचा हव्यास धरला होता. सती जाण्याची बंदी, मरणोन्मुखांना गंगाकिनारीं असहाय्य स्थितींत टाकण्याच्या रिवाजाला मनाई, गुन्हेगाराची जातपात मनावर न घेतां सर्वांना सारखी शिक्षा देणें, नरमेधाचा व कन्यावधाचा प्रतिबंध, हिंदू देवतांच्या उत्सवांत सरकारतर्फे भाग न घेतला जाणें, [ हा प्रकार लॉर्ड ॲमूहर्स्टच्या कारकीर्दींत अमलांत आला. त्यापूर्वीं हिंदूंच्या उत्सवांत अधिकारी लोक जातीनें भाग घेत असत, तोफांची सलामी झडत असे व लष्कराची कवाईत होत असे ] अशा तऱ्हेचे कायदे कंपनीसरकार घडाक्यानें जारी करीत होतें. या कायद्यांना इंग्रजी शिकलेल्यांचा पाठिंबा मिळत होता. [ पण युरोपियन मिशनऱ्यांचा आग्रह या बाबतींत विशेष होता. ]

## इंग्रजी शिक्षणाचा हेतु आणि फल

इंग्रजी भाषेचें शिक्षण देण्यांत तत्कालीन ब्रिटिशांचा हेतु उघड झालेला आहे. इंग्रजी ज्ञानाच्या जोरावर इंग्रजांच्या नोकरींत राहून त्यांच्या राज्य-पद्धतीचा जुन्या राज्यपद्धतीच्या तुलनेनें आपल्या मनाशीं गौरव बाळगणारा हिंदी समाजांत एक नवा वर्ग निर्माण करावयाचा, ही त्या हेतूची एक शाखा असून दुसरी शाखा आपल्या व्यापाराला शहाणेसुतें गिऱ्हाइक मिळ-वावयाचें ही आहे. शहाणेसुतें गिऱ्हाइक याचा अर्थ विलायती वस्तूंची आवड उत्पन्न झालेलें गिऱ्हाईक असा करावा लागतो. रानटी लोकांवर सदैव राज्य करण्यापेक्षां त्यांना शिकवून शहाणे करून त्यांच्या या संबंधांतील कृतज्ञतेला आपल्या व्यापाराच्या विस्ताराकडे व पोषणाकडे जुंपणें अतोनात फायद्याचें आहे, अशा अर्थाचे लॉर्ड मेकॉलेचे उद्गार प्रसिद्ध आहेत. इंग्रजी शिक्षण आणि मुद्रणस्वातंत्र्य या दोन देणग्या कदाचित् शेवटीं इंग्रजी राज्याला विघातक ठरतील, अशी शंका शंभर वर्षांमागच्या ब्रिटिश मुत्सद्यांना आली होती. हिंदी शिक्षितांना नोकऱ्या दिल्यानें त्यांची

अधिकारलालसा वाढत जाऊन अखेरीस ते ब्रिटिशांचें राज्य हिंदुस्थानांतून घालवितील असाहि अंदाज शंभर वर्षांमागें कित्येकांनीं बोलून दाखविला होता. परंतु या शंकांची धास्ती मनांत न वागवितां इंग्रज राज्यकर्त्यांनीं आपलें पाऊल पुढें टाकलें. १८१५ पासून इंग्लंडांत मध्यमवर्ग आणि कामगार यांची राजकीय हक्कांसाठीं जोराची धडपड सुरू होती. या वर्गांच्या धडपडीनें नवें राजकीय तत्त्वज्ञान लोकांच्या हृदयांत ठाण मांडीत होतें. एवढयांत यांत्रिक कारखानदारीचा जन्म होऊन तिनें त्या तत्त्वज्ञानाच्या प्रसाराला आणखी अवसर करून दिला. इंग्लंडच्या उमरावांचे अधिकार संपुष्टांत आले. मध्यमवर्गाला यश लाभलें. पार्लमेंटची सुधारणा, चार्टिस्ट-चळवळ, अँटी-कॉर्न लॉ लीग इत्यादि घटनांची इंग्लंडांत गर्दी चालली असतांनाच इकडे हिंदुस्थानांत संस्थानें खालसा करणें, सामान्य जनतेमधील साक्षरांना सरकारी नोकऱ्या देणें शिक्षणाची उदार योजना अमलांत आणणें, धार्मिक दुराचार कायद्याच्या सक्तीनें थांबविणें, मुद्रणकार्यावरील निर्बंध काढून टाकणें वगैरे प्रकारांचा अंमल सुरू होता. इंग्लंड व हिंदुस्थान या देशाचें राजकारण समान्तर पद्धतीनें किंवा बिंब-प्रतिबिंब न्यायानें चालत असल्यामुळें हिंदी राजकारणाचा विचार करतांना विलायती राजकारणावरहि जिज्ञासूंनीं आपली दृष्टि असूं द्यावी, असें प. वा. रमेशचंद्र दत्तांनीं आपल्या एका ग्रंथांत म्हटलें असून त्याची यथार्थता अभ्यासकांना पटण्याजोगी आहे. इंग्लंडांत जसें जमीनदार-उमरावांच्या खास हक्कांचें उच्चाटन करण्यांत आलें, तसेंच मोगलाई किंवा मराठेशाही यांच्या नाशांतून बचावलेल्या हिंदी संस्थानिकांच्या बाबतींत वागावें, या इच्छेबरोबरच, जुन्या राजवटींतील या खोडांना उपटून टाकल्यानें आपल्या राज्याचें उत्पन्न वाढेल हा लोभहि इंग्रज राज्यकर्त्यांना संस्थानिकांच्या खाणाखुणा हिंदी भूगोलावरून खरडून टाकण्याची प्रेरणा त्या काळांत देत होता. बेवारसांचीं संस्थानें गट्ट करण्याचा डाव या प्रेरणे-मुळेंच टाकला होता. हा डाव जोरानें खेळण्याची कामगिरी डलहौसीवर पडली असली, तरी १९ व्या शतकाच्या अगदीं सुरुवातीलाच कंपनीसर-कारच्या विलायती डायरेक्टरांनीं, या डावाचा संकल्प आपसांत पक्का केला होता. १८५७ च्या बंडाळीचें मूळ संस्थानें बुडविण्याच्या प्रचारांत आहे अशी एक समजूत आहे. पण त्या बंडाळींत कोणीच राज्यकर्ता संस्थानिक

सामिल नव्हता; कांहीं थोडेसे जमीनदार मात्र होते, तरीसुद्धां त्यांच्याकडे बंडाळीचा मोठासा पुढाकार नव्हता. विशेष प्रमाणांत लष्कर व त्या खालोखाल ब्रिटिशांच्या शेतसारावसुलीच्या नव्या पद्धतीनें असलेला बहुजनसमाज एवढेंच काय तें त्या बंडाळीचें मनुष्यबळ होतें; बंडाळीनें फायदा मात्र जर कोणाचा झाला असेल तर तो संस्थानिकांचा व जमिनदारांचा झाला. इतकें खरें कीं, या बंडाळीनंतर ब्रिटिशांचें पहिलें, लोकसुधारणा कायद्यानें करण्याचें धोरण बदललें.

बद्धावस्थेची तीव्र जाणीव होऊन त्या अवस्थेतून बाहेर पडण्याची धडपड सुरू झाली, कीं मनुष्य दुसऱ्या पायरीवर चढतो. साधकावस्था ही जवळजवळ सिद्धावस्थाच म्हणावी लागते. वेदान्ताच्या ग्रंथांतून या साधन–चतुष्टयाचा उलगडा आहे. पहिली अवस्था आपल्या दैन्याची ओळख पटण्यापुरती असून दुसरी अवस्था दैन्यांतून सुटण्याच्या धडपडीची असते. वेदान्तांतील आत्मसाक्षात्काराच्या मोक्षासारखाच राजकीय स्वातंत्र्याचा प्रकार मानल्यास प्रथम आपलें दैन्य पूर्णपणें समजण्याची स्थिति उत्पन्न झाली पाहिजे. नंतरच ती स्थिति पालटून टाकणाऱ्या उपायांची अंमलबजावणी सुरू होऊं लागते. हिंदी जनतेला मुसलमानी राज्यांत धार्मिक दैन्याची क्वचित् ओळख झालेली होती. राजकीय पारतंत्र्याचा तिटकारा धर्मानिमित्त कधीं वाटला, तरी आज ज्या समजुतीमुळें हा तिटकारा उत्पन्न झालेला आहे त्या समजुतींना मुसलमानी राजवटींतील हिंदी प्रजा पारखी होती. बादशहापासून तों तहत पाळेगार, देशमुख–देशपांड्यापर्यंत बहुजनसमाजावर सत्ता गाजविण्याची तऱ्हा एकच होती. ज्याचें मनगट चालेल त्यानें आपला उत्कर्ष साधावा, त्याच्या साह्यकर्त्यांनीं त्या उत्कर्षाचें वांटेकरी व्हावें, पहिल्यावर मात करणारा कोणी नवा पुरुष सरसावला, कीं पहिल्याच्या साह्यकर्त्यांपैकीं कोणी खाल्ल्या अन्नाला जागून लढावें, मरावें किंवा कोणी नव्याचें अंकित व्हावें, कोणी पहिल्याचा द्रोह करून नव्याला मदत द्यावी, आणि आपला अधिक उत्कर्ष साधावा, असा धुमाकूळ कित्येक शतकें या देशांत चालला होता. यामुळें बहुजनसमाजाला राजकारणाचें शास्त्र कळण्याची कधींच संधि मिळाली नाहीं. एकाचा अंमल जाऊन दुसऱ्याचा आला यांत कांहीं चांगलें झालें कीं वाईट झालें, आणि

वाईट झालें असल्यास त्याचा प्रतिकार कसा करावयाचा, असले विषय बहुजनसमाजाच्या अंतःकरणाला पूर्वी केव्हांच शिवले नाहींत. इंग्रजी राज्यांत नव्या तंत्रामुळें बहुजनसमाजाचे डोळे उघडूं लागले. इंग्रजांनीं सगळ्या अधिकाराच्या जागा आपल्या हातीं ठेवल्या. मुसलमानांप्रमाणें ते हिंदुस्थानांत रहात नव्हते; हिंदी जनतेशीं मिसळत नव्हते. त्यांच्या सगळ्या चालीरीती हिंदु–मुसलमानांहून निराळ्या होत्या. पूर्वीच्या राजवटींत लुटालूट झाली तरी तिचा विनियोग या देशांतच होत असे. इंग्रजांनीं लुटालूट, रक्तपात, दंगे-धोपे, लोकांची आपसांतील जुलूमजबरदस्ती नाहींशी केली. प्रजा निर्भय झाली, पण त्याबरोबरच निष्कांचनहि होत चालली. मागील काळांत वंश-परंपरेनें अधिकार चालत असल्यानें अधिकारांच्या ठिकाणीं जे राजत्वाचे अंश वसत असत त्यांचा इंग्रजी तंत्रानें लोप केला. जमीनदारासारख्या माण-साला आपल्या टापूंत मुख्य राजाचे कितीतरी हक्क गाजवितां येत असत. इंग्रजांनीं त्याचें राजत्व हिरावून घेतलें. 'एक विस्तीर्ण प्रदेशाचा धनवान् शेतकरी' यापेक्षां त्याची योग्यता जास्त राहूं दिली नाहीं. नव्यानव्या फौज-दारी व मुलकी कायद्यांनीं न्यायमनसुव्यांतील हिंदु–मुसलमानांच्या शास्त्रग्रंथांचें प्रामाण्य नष्ट करून टाकलें. इतकेंच नव्हे, तर एकदा धर्माच्या नांवावर राजसत्तेच्या मान्यतेनें चालणारे प्रकार त्यांनीं बंद केले. व्यापाराचा अगदीं नवा प्रघात सुरू करून येथील उद्योगधंदे संपुष्टांत आणले. ही क्रांति बहुजन-समाजाला जाणवली. इंग्रजांनीं शिक्षण देऊन लोकांना सज्ञान केलें नसतें व शिकलेल्यांना मुद्रण–स्वातंत्र्य, वाक्स्वातंत्र्य वगैरे हक्क दिले नसते, तर राजकीय बद्धावस्थेचा संताप उत्पन्न होण्याला अवकाश लागला असता. इंग्रजांच्या घरच्यासारख्या उदारपणानें तिची जाणीव व तिच्यांतून सुटण्याची तळमळ लवकर उद्भवली. बद्धावस्थेच्या जाणिवेला सौम्य वाचा फोडण्याचें काम राममोहन व त्यांचे सहकारी यांनीं केलें. इंग्रजांच्या आमदानींत हिंदी जनता स्वोद्धाराच्या मार्गास लागल्याशिवाय रहात नाहीं अशी राममोहनांची खात्री होती. पण या जाणिवेचें क्षेत्र लहान होतें. शहरांत रहाणाऱ्या व इंग्रजी ग्रंथा-भ्यासानें आणि संसर्गानें दृष्टि फांकलेल्या लोकांतच ही जाणीव होती. पुढें शिक-लेल्यांची संख्या वाढली, शहरें वाढलीं, बहुतेक जिल्ह्यांच्या शहरांतून शिकले-ल्यांनीं उदरनिर्वाहार्थ ठाणें दिलें; तेव्हां बद्धावस्थेची जाणीव फैलावली. १८५७

सालची बंडाळी ही स्वराज्यप्राप्तीची धडपड खरी, पण तिच्यामागें इंग्रजांनीं शहाणा केलेला समाज नव्हता. या समाजाला पेशवाईचें किंवा मोगलाईचें पुनरुज्जीवन व्हावें अशी मनापासून इच्छा नव्हती. आपल्या राज्यपद्धतीची-श्रेष्ठता जाणणारा समाज निर्माण करावा ही मागें नमूद केलेली इंग्रजांची मनीषा यावेळीं सफळ झाली. इंग्रजी राज्याची श्रेष्ठता समजणारा वर्गच राजकीय तपश्चर्येचा आद्य घटक ठरतो.

## पूर्वग्रहांचा गोंधळ

इतिहासाच्या स्पष्टीकरणाला कालानुक्रमाच्या ज्ञानाचें भक्कम सुकाणूं नसेल तर कल्पनांचा कसा गोंधळ होऊं शकतो, याच्या खुणांची तळवलकरांच्या प्रस्तुत लिखाणांत अनेक स्थळें आहेत. हिंदी लोकजागृतीच्या कारणांत त्यांनीं इंग्रजांच्या यंत्रसंस्कृतीचा निर्देश केला आहे. राममोहनांचा अंत १८३३ त झाला. लोकहितवादी १८४८ मध्यें शतपत्रें लिहूं लागले. दादाभाईंनीं राष्ट्रीय दृष्टीनें लोकसेवेला १८४५ मध्यें आरंभ केला. या काळांत इंग्रजांच्या यंत्र-संस्कृतीची पहांट नुकतीच इंग्लंडांत फुटली होती. तिचा प्रकाश हिंदुस्थानांत पोंचलेला नव्हता. इंग्रजी कायदा, यंत्राऐवजीं इंग्रजी वाङ्मयसुद्धां त्या दिवसांत इकडे फारसें येत नव्हतें. वाङ्मयाऐवजीं इंग्रजी शिक्षण, शिवाय त्यांच्या व्यवहारानें घडणारा बोध, मुद्रणस्वातंत्र्यादि मतप्रसाराचीं साधनें, यांनीं हिंदी राष्ट्रवादाला जन्म दिला, असें मानणें जास्त बिनचूक व सयुक्तिक आहे. इंग्रजी शिक्षण हें ' वाघिणीचें दूध ' ठरलें, असें श्री. तळवलकर याच संदर्भात एका ठिकाणीं सुचवितात. जणुं काय तें दूध कोणाचें हें इंग्रजांस माहीतच नव्हतें ! शिक्षणाचें व त्याच्या जोरावर मिळणाऱ्या अधिकाराचें पर्यवसान इंग्रजी राज्याला हिंदुस्थानांतून साफ घालवून देण्याच्या प्रयत्नांत होईल, असें भविष्य जेथें इंग्रजच वर्तवीत होते तेथें ' नवविचार व स्वातंत्र्याची स्फूर्ति ' हीं या दुधांतून निपजणार याविषयीं इंग्रजांना कांहींच अटकळ नसावी, असा भास उत्पन्न करणाऱ्या शब्दांचा प्रयोग केवळ पूर्वग्रहांचा दर्शक ठरतो; वस्तुस्थितीच्या प्रामाणिक निवेदनाचा ठरत नाहीं.

## ंग्रेसच्या स्थापनेची पार्श्वभूमि

यानंतर कॉंग्रेसच्या स्थापनेचें मंगलाचरण एका इंग्रजाच्या हातून झालें, 'काळाच्या करणीचें कौतुक' असें सांगून या कौतुकाच्या कल्पनेवर ो. तळवलकरांनीं स्वतःच हरताळ फांसला आहे! कॉंग्रेसच्या स्थापनेचें र्व लक्षांत बाळगल्यास 'जगांत फार मोठा प्रतिस्पर्धी नव्हता' 'जिकडे कडे आबादीआबाद होतें.' 'इंग्रजी मन जरा मोकळें व उदार होऊं कलें.' 'ह्यूम व डफरिन या उदार मतवादी तत्त्वज्ञानानें भरलेले होते,' सलीं विधानें पोंचट वाटतात. या काळांत इंग्लंडचा मोठा प्रतिस्पर्धी शेया होता. १८८५ चे सुमारास त्याची स्वारी हिंदुस्थानवर होते कीं काय सा धाक वाटत होता. कॉंझर्वेटिव्ह व लिबरल हे दोन्ही पक्ष तुल्य बळानें कमेकांशीं झगडत होते. साम्राज्यशाहीच्या दुष्ट ग्रहांचा पगडा ब्रिटिश नतेवर बसला होता. तथापि उदारमतवादी पक्षाविषयीं हिंदी देशभक्तांना शा वाटत होती. ग्लॅडस्टनसाहेबांचा उदारमतवाद आयर्लंडच्या उद्धा- ला हातभार लावतांना दिसत होता, यामुळें तो हिंदुस्थानची अनास्था रणार नाहीं, अशी समजूत या आशेच्या मुळाशीं होती. याच आशेनें ८८५ मध्यें एक हिंदी शिष्टमंडळ ब्रिटिश जनतेला आपली कैफियत गण्याकरितां गेलें होतें. ह्यूमसाहेबांचें सारें उमेदीचें आयुष्य हिंदुस्थानांत लें. १८८० पर्यंत येथेंच त्यांनीं नोकरी केली, उदारमतवादाचा संपर्क ांना झालेला नव्हता. डफरिनसाहेबांचाहि उदारमतवादाशीं संबंध नव्हता. ूमसाहेबांना हिंदुस्थानांत दंगेधोपे, किंबहुना, सार्वत्रिक बंडाळी माजण्याची क्षणें दिसत होतीं; डफरिनसाहेबांना हिंदी लोकमत नीट समजावें अशी सुकता होती. दोघांचें खलबत झालें. १८८५ त कॉंग्रेस अवतरली पण ८८३ मध्यें [ डफरिनसाहेब येण्यापूर्वी ] ह्यूमसाहेबांनीं तरुण हिंदी वीधरांना अनुलक्षून एक जाहीरनामा काढला होता, त्याची वासलात कशी लावयाची ? 'स्वतंत्र व्हावयाचें असेल तर तुम्ही स्वतःच तडाखा लागावला हिजे.' देशांतील श्रेष्ठ दर्जाचे सुशिक्षित जर स्वार्थत्याग, आत्मसंयम, ढळ निश्चय, साहस या गुणांच्या जोरावर देशाच्या स्वातंत्र्यासाठीं अखंड ाडत रहाण्यास तयार नसतील, तर तुम्ही सदैव पारतंत्र्यांतच राहण्याला ग्य आहांत असें सिद्ध होईल. तुमच्याविषयीं सहानुभूति बाळगणाऱ्या

इंग्रजांची मदत व्यर्थ आहे. तुमचीच तयारी पाहिजे. फक्त खऱ्या मर्दांना कर्तबगारीचें रहस्य कळतें, अशा अर्थाचा जळजळीत उपदेश ह्यूमसाहेबांच्या सदर जाहीरनाम्यांत आहे. ऐक्य, संघटना व निश्चित अशा स्वरूपाचें ध्येय असे तीन उपायहि त्यांनीं सुचविले आहेत. या वर्षीं कलकत्त्यास कॉंग्रेसच्या उभारणीची मुहूर्तमेढ रोवली गेली. १८८४ सालीं आणखी एकदां हिंदी पुढारी मद्रास शहरीं एकत्र आले व त्यांनीं जनतेपुढील कर्तव्याचा खल केला. १८८५ सालीं दोन वर्षांच्या बैठकींना कॉंग्रेसच्या स्थापनेचें फळ आलें.

## साधनेंतील उणीवा

कॉंग्रेसच्या आधीं सुमारें पन्नास वर्षें 'साधना' सुरू होती. बद्धावस्थेचें ज्ञान दृढ होत जाऊन मुमुक्षुत्वाच्या दशेंत लोकांचें पाऊल पडलें होतें. पारधार्मिक साधनेंत जे अडथळे येतात तेच राजकीय साधनेलाहि भोंवतात. पहिला अडथळा आत्मविश्वासाचा अभाव हा होय. दुसरा अडथळा प्रकृतीचा. पूर्वपरंपरेनें ज्या संवयींची प्रकृति बनली असेल, त्या संवयी एकदम सुटत नाहींत; त्यांना सोडतांना कित्येकदां त्याच मुमुक्षुवर वरचष्मा गाजवून त्याला स्वोद्धाराच्या मार्गापासून परावृत्त करतात. राजकारणांत जो नानाविध मतमतांतराचा गलबला दिसतो तो भिन्न भिन्न प्रकृतींचा परिणाम असल्याचें ध्यानांत येणें कठिण नाहीं. प्रकृतिधर्मांचा प्रकोप सोसण्यापेक्षां आस्तेकदम जाणें बरें, असें या अडथळ्यांच्या प्रसंगीं साहजिकच वाटते. तिसरा अडथळा स्वार्थाचा. हा तर विशेषच बलवत्तर मानावा लागतो. योग्यांच्या मार्गांत सिद्धी उभ्या राहून त्याला भ्रष्ट करतात; राज्यकर्त्यांकडून दाखविलीं जाणारीं प्रलोभनें राजकीय मुमुक्षूचा बळी घेतात. समुदायाच्या कामांत तर या अडथळ्यांचा अनिष्ट परिणाम जास्तच भोगावा लागतो. कॉंग्रेसच्या आधींच्या पन्नास वर्षांतील साधनेला अशा विघ्नांच्या कांटयाकुट्यांतून, खांचखळग्यांतून रस्ता काढावा लागला. दडपशाही, लालूच स्वजनांचा विरोध असे सर्व प्रकारचे आघात त्या काळांत साधनेवर सुरू होते. सुरवातीला कांहीं इंग्रज राज्यकर्त्यांनीं तिचें कौतुक केलें. पण हा कौतुकाचा मनु फार दिवस टिकला नाहीं. १८६० ते १८८० पर्यंतच्या वीस

वर्षांत राज्यकर्त्यांच्या प्रतिगामी धोरणाची चढती कमान पाहून साधनेंत ध्येयाचा निश्चितपणा उत्पन्न झाला. कॉंग्रेसच्या स्थापनेनंतर राजकारणांत लहान लहान विजय मिळत गेल्यानें साधनेच्या कर्तबगारींत प्रखरता येऊं लागली. लोकहितवादींनीं म्हटल्याप्रमाणें देशाची स्वोद्धाराकरितां खरी तयारी होण्याला कालावधि गेल्याशिवाय भागत नाहीं. कॉंग्रेसच्या आधींचीं पन्नास वर्षें निरनिराळ्या अनुभवांचीं व तयारीचीं म्हणूनच अतिशय महत्वाचीं मानल्याशिवाय गत्यंतर नाहीं. साधनेचा पाया त्या काळांत भरला गेला. पण आश्चर्य हें कीं त्या काळांतील घडामोडींचा जितका बारीक अभ्यास व्हावयास पाहिजे तितका अजून होऊं लागलेला नाहीं. मराठींत व इंग्रजींत हिंदी राजकारणाच्या विकाससंबंधानें पुष्कळ पुस्तकें झालेलीं आहेत. त्यानंतरचें 'साधना' हें पुस्तक. यामुळें वरील उणीव या पुस्तकानें नाहींशी केली असेल, या अपेक्षेच्या उत्सुकतेला जबर थप्पड बसल्याशिवाय रहात नाहीं.

# हिंदुस्थानच्या राजकीय साधनेची तपस्या : : ३

## ना. गोखले आणि कॉंग्रेसचीं २० वर्षें

कांग्रेसचीं १९०५ सालापर्यंतचीं वीस वर्षें पराक्रमानें रंगलेलीं नाहींत; यामुळें कित्येक आधुनिकांना तीं निःसत्त्व वाटतात. पण उमेदवारीचा काळ केव्हांहि एकदम डोळ्यांत भरणारा नसतो हें लक्षांत ठेवणें बरें. बीजारोपण, अंकुरावस्था, मग नुसतीच शाखा–पल्लवांची वाढ, नंतर फुलें किंवा मोहर व शेवटीं फळें हा वनस्पतीसृष्टीचा न्याय माणसाच्या व्यवहारांतहि आढळतो. कर्तबगारीचीं पावलें लटपटल्याशिवाय भराभर इवीं तेथें पडत जाऊन, मोठी मजल तुडविल्याचा अनुभव येण्यापूर्वीं पुष्कळच पूर्वतयारी व्हावी लागते. ही पूर्वतयारी ज्या मानानें अव्यंग व बलसंपन्न असेल त्या मानानें पुढचा पराक्रम व्हावयाचा हें ठरलेलेंच आहे. कॉंग्रेसचीं पहिलीं वर्षें तयारीचीं असल्यानें तिच्यांत नेत्र वेधून घेणाऱ्या विक्रमाचीं उदाहरणें नाहींत हें खरें; पण भावी विक्रमाला उपयोगी पडणाऱ्या अनुभवांचें शहाणपण व बळ कांग्रेसनें याच वर्षांत संपादन केलें, याची उपेक्षा करण्यांत इंशील काय ? कॉंग्रेसनें या वर्षांत हिंदी लोकमताला एका केंद्रांत आणून सोडलें. ना. गोखल्यांनीं बनारस येथें २१ व्या कॉंग्रेसच्या अध्यक्षस्थानावरून कॉंग्रेसच्या कामगिरीचा जो थोडक्यांत आढावा दिला आहे, तो या काळांत काय साधलें याची कल्पना होण्याला पुरेसा आहे. कॉंग्रेसनें एकराष्ट्रीयत्वाच्या भावनेची जोपासना केली; जाति, धर्म, पंथ इत्यादि भेदांची तीव्रता राजकारणापुरती पुष्कळच कमी केली; लोकांना राजकारणाची गोडी उत्पन्न करून शिक्षण दिलें; राजकारणाचा व्याप लोकांच्या चिंतन–क्षेत्रांत आणून सोडला; राजकीय स्वरूपाचे विजय अल्पस्वल्पच मिळाले हें खरें;

तरीसुद्धां कांहीं वेळां कॉंग्रेस–प्रेरित लोकजागृतीसमोर राज्यकर्त्यांना आपलें प्रतिगामी धोरण आवरावें लागलें. अर्थात् तेवढी राजकीय पीछेहाट टळली. राज्यकर्त्यांच्या शक्तीचा प्रतिकार करण्याचे उपाय योजले गेले. गोखल्यांनीं म्हटलें आहे कीं, प्रतिकाराचा हेतु बहुत वेळां वायां गेला असला, तरी त्यानें सार्वजनिक जीवनाला चांगलाच भक्कमपणा आणलेला आहे. प्रतिकाराबद्दलची शंका मावळून निर्भयता उत्पन्न होणें, इतकेंच नव्हे, तर प्रतिकाराच्या साहसाची आवड वाटणें, ही प्रतिकारक्षमतेची पाहिली पायरी आहे. कॉंग्रेसच्या उद्योगानें या पायरीवर हिंदी लोकमताला पाहिल्या वीस वर्षांत चढविलें.

## कोंडमारा म्हणजे स्वातंत्र्याची जाणीव

पारमार्थिक भार्षेत वरील गोष्टी स्पष्ट करावयाच्या झाल्यास राजकीय बद्धावस्थेची असह्यता त्या निष्फळ वाटणाऱ्या वीस वर्षांनीं लोकांना पटवून दिली. माणसाला आपण बद्ध आहोंत, हें कळायलाच आधीं पुष्कळ अवधि लागतो. बद्ध आहोंत, असें समजल्यावर ह्या स्थितीचा तिटकारा उत्पन्न व्हायला आणखी कांहीं काळ खर्ची पडतो. तो तिटकारा एकदम सक्रिय होत नाहीं. दीर्घकालीन संवयीमुळें बद्धावस्थेंतील क्षुद्र सुखें मोहक भासून त्यांतून आपला जीव बद्धावस्थेंतून सुटण्याच्या नव्या उद्योगांतील दुःखांत टाकायला मनुष्य धजत नाहीं. धजल्यास पाहिल्याच प्रतिकूल अनुभवानें निराश होऊन तो सुटकेचा नवा उद्योग सोडून देतो. ' पण आपण गुलाम आहोंत ' ही एकदां उद्भवलेली जाणीव मरत नाहीं. तिची टोंचणी आंतून चालू राहते. ह्या टोंचणीनें तो सुटकेच्या स्थितीचा–राजकीय भार्षेत स्वराज्याचा–अभ्यास करतो. इतर देशांनीं आपल्या गुलामगिरीचे पाश कोणत्या साधनांनीं तोडले, ते तोडतांना त्यांना कोणत्या यातना सोसाव्या लागल्या, याची माहिती अभ्यासानें झाल्यावर व स्वराज्यसुखाचा आनंद कल्पनेच्या आटोक्यांत आल्यावर त्याला हातपाय हालवावे असें वाटूं लागतें. आपली बुद्धिमत्ता, विद्वत्ता, कल्पकता, विद्यापीठाची देशीविदेशी थोर पदवी, कर्तृत्व, सांपत्तिक योग्यता, श्रेष्ठ संस्कृति वगैरे यच्चयावत् गुण राजकीय पारतंत्र्यामुळें मातीमोल ठरत आहेत, अशा तऱ्हेच्या नव्या नव्या कटु अनुभवांनीं बद्धावस्थेची जाणीव हृदयाला झोंबतां

सोसतां स्वस्थ बसवेनासें होतें. अपमान, उपमर्द, असह्य वाटूं लागण्यापूर्वी मनांत जाज्वल्य स्वाभिमान पोसला जाण्याची आवश्यकता असते. 'आपण सर्वप्रकारें योग्य असतांहि केवळ राजकीय बद्धावस्थेमुळें आपण हीन ठरलों आहोंत' हें जाचकपणानें गळीं उतरण्याला स्वपरतुलनात्मक अभ्यास व्हावा लागतो. आपले हक्क कोणते, त्याच्या आड कोण आहे, ते मिळविण्याचे उपाय कोणते, ते उपाय अयशस्वी कां होतात, त्या हक्कांचे फायदे कोणते, हक्क मिळविण्याच्या लढयांतील लोकांचीं कर्तव्यें कोणतीं, अशा कितीतरी गोष्टींची देशांत जाणत्या वर्गाच्या द्वारें सार्वजनिक व खासगी रीतीनें चर्चा होऊं लागल्याशिवाय बद्धावस्थेची असह्यता वाटत नाहीं.

## वंगभंगानें लोकमत बळावलें !

एका बाजूस दारुण अज्ञान, परावलंबन व अनास्था आणि दुसऱ्या बाजूस ज्ञान, शिस्त, जूट, सहकार व चढेल राज्यकर्तेपणाचें बळ असें काँग्रेसच्या सुरवातीस हिंदी जनता आणि ब्रिटिश राज्यव्यवस्था यांच्यामध्यें जमीनअस्मानाप्रमाणें अंतर होतें. राज्यव्यवस्था लोकमताला बेजबाबदार असल्यामुळें हिंदी जनतेचा कोंडमारा होत आहे, याची कल्पना काँग्रेसच्या उद्योगानें लोकांत पसरली. सालोसाल काँग्रेसला जमणाऱ्या लोकांची वाढती संख्या या संबंधांत साक्ष देणारी आहे. ब्रिटिश राज्यकारभाराच्या गतीकडे आपल्या हक्कांच्या दृष्टीनें पाहण्याची संवय काँग्रेसच्या अधिवेशनानें लोकांस लावली. नियतकालिकांच्या मार्फत हिंदी राजकारणाची जी चर्चा चाले, तिला काँग्रेसकडूनच भांडवल पुरविलें जाई. सरकारकडून काँग्रेसची व तिच्या पुढाऱ्यांची सामन्यतः उपेक्षा व पुष्कळदां उघड उघड अवहेलना होत असली, तरी लोकांचें या दोघांवरील प्रेम वाढतच होतें. हिंदी जनतेचीं प्रत्यक्ष दुःखें काय आहेत, हें बड्या सरकारी अंमलदारांच्या कानांवर एकमुखानें घालावें, हा काँग्रेसचा मूळ उद्देश सरकारी अधिकाऱ्यांच्या अरेरावीनें बाजूस पडून स्वराज्यप्राप्तीच्या दिशेनें काँग्रेसच्या अधिवेशनांचा रोख वाढला. राज्यकर्ते न्यायी आहेत, स्वातंत्र्यप्रिय आहेत, समंजस आहेत, बिनतोड पुराव्याच्या नम्र बुद्धिवादानें त्यांच्या गैरसमजुती नष्ट करतां येतील, असें ब्रिटिश राज्यकर्त्यांविषयींचे भ्रम काँग्रेसच्या पहिल्या वीस वर्षांतील

कांहींशा निष्फळ कामगिरीनें नाहींसे होत चालले होते. ह्या भ्रमांचा डोलारा एकदम कोसळण्याला १९०५ सालीं वंगभंगाची उत्कृष्ट मदत झाली. ब्रिटिश-राज्यकारभाराची खातेवार सुधारणा करण्याची अपेक्षा सुटून सगळा राज्यकारभारच आपल्या हातीं घेतला पाहिजे, अशी आकांक्षा बळावून ती बोलती होण्याचा योग १९०५ सालच्या वंगभंगमूलक प्रचंड क्षोभानें आला व गोखल्यांनीं 'वसाहतीचें स्वराज्य' या शब्दांनीं त्या आकांक्षेचा निश्चित स्वरूपांत उच्चार केला.

## आयर्लंडच्या हक्कांचा लाभ

'वसाहतीचें स्वराज्य' हा शब्द आज थट्टेचा वाटतो. राज्यव्यवस्थेंत लोकमताचा थोडाफार अंतर्भाव व्हावा, एवढीच इच्छा बाळगून कॉंग्रेसचें काम चाललें होतें व शेवटीं वसाहतीच्या स्वराज्याच्या मागणी-पर्यंत हिंदी पुढाऱ्यांची विचारसरणी प्रगल्भवस्था पावली. युनिव्हर्सिटीचे पदवीधर निपजण्यापूर्वी सरळ स्वराज्याची भाषा बोलणारीं कित्येक माणसें होतीं. युनिव्हर्सिटीनें इंग्रजी इतिहास शिकविल्यावर 'सनदशीर चळवळी'च्या विचाराचें वळण पदवीधरांच्या राजकीय मनोरथाला लागलें. प्रातिनिधिक (रिप्रेझेंटेटिव्ह) राज्य म्हणजे हिंदुस्थानांतील पुढाऱ्यांना पार्लमेंटांत बसण्याची संधि मिळावी, असा त्यांचा ग्रह होता. आयरिश लोकांना जो हक्क मिळाला तो हक्क या लोकांच्या डोळ्यांपुढें होता. १८७० पर्यंत आयरिशांनीं पार्ल-मेंटांत राहून आपल्या राजकीय आकांक्षेची जोपासना चालविली होती. त्यानंतर होमरूलची हांक उठली. त्या हांकेचे पडसाद हिंदुस्थानांतहि गाजूं लागले. हिंदुस्थानलादेखील होमरूल द्यावें. अशी वाच्यता १८७५-७६ सालीं हिंदी वृत्तपत्रांतून चालली होती. तथापि आयर्लंडप्रमाणें हिंदी लोक-नियुक्तांना पार्लमेंटांत बसण्याचा हक्क लाभल्यास आयरिश सभासदांच्या मदतीनें हिंदी गरजासंबंधांत न्याय संपादन करतां येईल, इतक्यावरच तेव्हांचे पुढारी संतुष्ट होते. १८७४ त हिंदुस्थानांतून प्रातिनिधिक राज्याच्या मागणीचा अर्ज हजारों सह्यानिशी पार्लमेंटासमोर गुदरला गेला होता. त्याच मागणीचा उच्चार पुढें थोडा वेळ कॉंग्रेसमध्यें होत राहिला. नंतर ही कल्पना जाऊन

हिंदी कायदेमंडळांतून लोकनियुक्तांची संख्या वाढावी, ही मागणी होऊं लागली.

## ‘ वसाहतीचें स्वराज्य ’

१९०५ मध्यें कै. ना. गोखल्यांनीं ‘ वसाहतीचें स्वराज्य ’ हें अंतिम ध्येय लोकांसमोर मांडलें, याला कारण ‘ निर्भेळ स्वातंत्र्य ’ हा शब्द त्यांना माहीत नव्हता असें नाहीं. दक्षिण आफ्रिकेंतील बोअर वसाहतींच्या राज्यव्यवस्थेची ब्रिटिश मुत्सद्दी या सुमारास वाटाघाट करीत होते. बोअर लोकांना जिंकून त्यांच्याशीं तह करतांना त्यांना स्वराज्य देण्याची हमी ब्रिटिशांनीं घेतली होती. ऑस्ट्रेलियाला ब्रिटिशांनीं १९०१ मध्येंच स्वराज्य दिलें होतें. त्यापूर्वींच कानडा वसाहतीच्या स्वराज्याचें सुख भोगूं लागला होता. तेव्हां ब्रिटिशांनीं दूरच्या वसाहतींबरोबर जी वागणूक केली तिचा कित्ता हिंदुस्थानाबाबत ब्रिटिशांच्या हातून गिरवला जाणें अवश्य आहे, असें गोखल्यांनीं म्हटल्यास त्यांत कमीपणा कोणता ? ‘ होमरूल ’ या शब्दांत दुसऱ्याच्या वर्चस्वाचा ध्वनि नसला तरी ‘ ब्रिटिश साम्राज्यांतर्गत स्वराज्य ’ हें शब्दाचें स्पष्टीकरण ‘ वसाहतीच्या स्वराज्या ’ हून वेगळें असें काय सुचवितें ? दासबाबूंनीं एकदां निर्भेळ स्वातंत्र्याचें स्तोत्र गाइलें; पण मरण्यापूर्वीं दोनच महिने फरीदपूरच्या भाषणांत निर्भेळ स्वतंत्र्याचें ध्येय हितावह होणार नाहीं, असा त्यांनींच लोकांना उपदेश केला. १९२८ सालीं कलकत्त्यास कॉंग्रेसनें ब्रिटिश राज्यकर्त्यांना जो निर्वाणीचा आदेश दिला, त्यांत वसाहतीचें स्वराज्य एका वर्षाच्या आंत आम्हांला द्या, हाच अभिप्राय आहे. १९३० सालीं ‘ स्वातंत्र्य ’ म्हणजे ‘ संपूर्ण स्वराज्य ’ अशी व्याख्या अस्तित्वांत आली. शब्द पालटले तरी वसाहतीच्या स्वराज्यानें दाखविल्या जाणाऱ्या अर्थांत कांहीं अंतर पडलेलें नाहीं. सध्यांच्या युद्धानें देशाच्या निर्भेळ स्वातंत्र्याबद्दल साशंक होऊन लढाऊ राष्ट्राचे मुत्सद्दी जगाच्या भावी राजकारणाविषयीं पूर्वींच्या कल्पनांपेक्षां निराळ्या रीतीनें विचार करूं लागले आहेत. तिकडे विलायतेस ‘ वसाहतीचें स्वराज्य ’ या कल्पनेच्या मूळ व्याख्येला पुस्ती जोडण्यांत येऊन ती लवचिक बनविण्यांत आली आहे.

## स्वातंत्र्याची व्याख्या आणि ' ब्रह्म '

' स्वातंत्र्य ' या शब्दांत मात्र एक प्रकारची जादू आहे यांत संशय नाहीं. त्याचा उच्चार मोहक वाटतो. ' स्वराज्य ' शब्दहि कांहींसा चटकदार आहे. या शब्दांचा घोष १९०६ सालापासून [ या वर्षी दादाभाईनीं कलकत्त्यास आपल्या भाषणांत हा शब्द योजून त्याच्या प्रचाराला परवाना दिला ] लोकांच्या चळवळींत चालू आहे. परंतु ' ब्रह्म ' शब्दासारखीच याची अवस्था आहे. ब्रह्म जसें निराकार अनिर्वचनीय, तसें स्वातंत्र्य आहे. स्वातंत्र्य व्यवहारांत कसें आणावयाचें हा प्रश्न सोडवायला बसणारे विचारवंत वसाहतीच्या स्वराज्याच्या आसपासच घोटाळतांना आढळतात. स्वराज्य, स्वातंत्र्य याचा कारभार प्रत्यक्षपणें अजून दिसावयाचा असल्यानें त्याविषयीं जास्त चर्चा करण्याची तूर्त गरज नाहीं.

## श्री. तळवलकरांचा साधना-गोंधळ

१९०५ मध्यें बंगालची फाळणी करण्यांत आल्यानें लोकांत विलक्षण क्षोभ उत्पन्न झाला. त्या क्षोभानें स्वदेशीचें व्रत लोकांना अंगीकारावयास लाविलें. ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या बेजबाबदार वर्तनानें कित्येक वर्षें सांठत असलेल्या असंतोषाचा स्फोट वंगभंगाच्या तडाख्यामुळें झाला. हिंदी राजकीय साधनेंतील तो एक महत्त्वाचा टप्पा आहे. कॉंग्रेस ही वरिष्ठ वर्गाची प्रतिनिधि होती. वंगभंगानें मध्यमवर्गाची प्रचंड फळी कॉंग्रेसच्या पाठीशीं उभी केली. वस्तुतः कॉंग्रेस ही केव्हांहि वरिष्ठ वर्गाची प्रतिनिधि नव्हती. तिच्यांत असें मत क्वचित् दिसतें; पण तें खरें नाहीं. अधिकाऱ्यांना [सरकारी नोकरांना] तिच्यांत भाग घेण्याला सरकारी प्रतिबंध होता. कॉंग्रेसला मोठाल्या जमीनदारांची किंवा कारखानदारांची सहानुभूति होती व केव्हां केव्हां मदतहि झाल्याचीं उदाहरणें आहेत; परंतु या लोकांनीं कॉंग्रेसच्या चळवळींत प्रत्यक्षपणें फारसा भाग घेतलेला नाहीं.

## आशियांतील जागृतीचे पडसाद

१९०५ पासून १९१४ हीं वर्षें अतिशय धामधुमीचीं आहेत. या वर्षांत हिंदी चळवळ जशी जोरावली, तशीच सरकारी दडपशाही उग्रत्व पावली.

या कालावधीमध्यें आशियाखंडांत नवें चैतन्य संचारलें होतें. १९०५ मध्यें जपान देशानें रशियाला चीत मारून युरोपियन अजिंक्यपणाच्या भ्रमाचा भोपळा फोडला व आशियाच्या जनतेमध्यें युरोपियनांविरुद्ध जाऊन स्वतःच उद्धार करून घेतां येतो असा आत्मविश्वास निर्माण केला. वंगभंगाच्या चळवळीमागें जपानी विजयाचें उत्तेजक चित्र उभें होतें. १९०४ सालीं एका अध्यक्षस्थानावरून बोलतांना स्वदेशीच्या मीमांसेंत ना. गोखल्यांनीं जपानचा दाखला लोकांच्या कानांवर घातला आहे. जपानी विजय हा हिंदी जनतेच्या अभिमानाचें एकमेव केंद्र बनल्याचें तेव्हांच्या वाङ्मयावरून सहज पटणारें आहे. जपानी विजयानंतर थोड्याच वर्षांत इराण, तुर्कस्तान, या देशांतील तरुणांनीं आपापला देश वर आणावा, या उद्देशानें जोराच्या चळवळी केल्या. इजिप्तहि स्वस्थ नव्हता. या नंतर चीनमध्यें क्रांति होऊन तेथील बादशाही जमीनदोस्त झाली. तुर्कस्तानच्या पोटांतून बाल्कन राष्ट्रांनीं बाहेर निघण्याचा चंग बांधून प्रत्यक्ष लढाईच आरंभली. त्यापूर्वीं जपानी मारानें हबकून खंतावलेली रशियन झारशाही लोकांचें अस्वास्थ्य शमविण्यासाठीं ड्यूमासारख्या संस्था निर्माण करण्याला प्रवृत्त झाली होती. इराण–तुर्कस्तानांतील जागृतीनें हिंदी मुसलमानांनाहि थोडी हुशारी वाटूं लागली. येथील मुसलमान आशियांतील इस्लामी राज्यांबद्दल सलगीची भावना बाळगतो, हें जाणून त्या राज्यांतील जागृतीच्या झळीनें हा मुसलमान हिंदी राज्यकर्तृत्वाला कदाचित् तापदायक होण्याचा जो किंचित् संभव आहे, तो वेळींच निर्जीव करण्यासाठीं ब्रिटिशांनीं त्याच्या सवत्या सुभ्याच्या मागणीचें कोडकौतुक चालविलें. हिंदु समाजाच्या राष्ट्रीयत्वाला उतारा म्हणून येथील ब्रिटिश राज्यकर्तृत्वाला हिंदी मुसलमान आपल्या लगामीं हवाच होता. इस्लामी राज्यांतील नवमताच्या धामधुमीनें हिंदी मुसलमान बिथरूं न देण्याचें व त्याला राजी राखून आपली बळकटी टिकविण्याचें असें दुहेरी काम त्याला सवता सुभा देऊं करून ब्रिटिशांनीं साधलें.

## दडपशाहीचा वरवंटा

जागृति व तिचा प्रतिकार ही स्थिति राजकीय व्यवहारांत कायमची दृष्टीस पडते. हिंदुस्थानांत लोकजागृतीच्या मागोमाग तिचे पाय ओढून

तिला जमीनदोस्त करण्यासाठीं दडपशाहीनें आपले कांटेरी पाश झपाट्यानें फेंकायला सुरवात केली होती. १९०७ मध्यें पंजाबांतील लजपतराय व अजितसिंग या दोघां पुढाऱ्यांना सरकारनें चौकशीवांचून अटकेंत डांबलें व बहिष्काराची मर्यादा परदेशी मालापुरतीच न समजतां सरकारशीं कोणत्याहि प्रकारचा संबंध ठेवावयाचा नाहीं, अशा थरापर्यंत कांहीं पुढाऱ्यांनीं ताणली. स्वदेशी–बहिष्कारानें तडकाफडकीं स्वराज्याचें फळ हातीं पडणार नाहीं, या जाणिवेनें तरुणांचे गुप्त कट अस्तित्वांत आले. त्या कटाचा बॉंब १९०८ सालीं पहिल्यांदा फुटला. आगगाड्या उलथून पाडून त्यांतील अधिकाऱ्यांचा जीव घेण्याचा प्रयत्न त्यापूर्वीच अमलांत आला होता. १९०६ सालीं बारिसाल येथें सभाबंदी व पोलिसांचा लाठीमार असें दडपशाहीचें कृत्य लोकांनीं अनुभविलें. राजद्रोही सभांना बंदी, 'वंदे मातरम्' चा उच्चार करण्याला बंदी, मुद्रणकार्याची मुस्कटदाबी, स्फोटक द्रव्याविषयीं निर्बंध, खुनाच्या चिथावणीचा प्रतिबंध, विद्यार्थ्यांवर कडक नजर, १८१८ च्या एका जुलमी कायद्याचें पुनरुज्जीवन, असे दडपशाहीचे कायदे एकामागून एक या वेळीं उभवले. झडत्या, जप्त्या, धरपकड, यांच्या परंपरेला तर अंतच राहिला नव्हता. याच्या उलट अधिकाऱ्यांचे खून, राजकीय दरवडे, कटाविरुद्ध असलेल्या साक्षीदारांचे खून, असल्या प्रकारची सांथ पसरली होती. परंतु आशिया खंडांतील क्रांतीच्या लाटांनीं हिंदी जनतेची उमेद खचूं दिली नाहीं. हिंदी राज्यसुधारणांच्या १९१० तील कायद्यानें या उमेदीला दुजोरा दिलेला होता. आपलें नशीब उघडण्याचे दिवस दूर नाहींत, असा हिंदी जनतेला धीर वाटत होता. इतक्यांत आयर्लंडामध्यें होमरूलच्या मागणीचा प्रचंड आवाज निघाला. मताधिकारासाठीं झगडणाऱ्या ब्रिटिश स्त्रियांनीं अवसान घेऊन ब्रिटिश प्रधानमंडळाला सतावण्याला सुरवात केली. आयर्लंड व सफ्रेजिस्ट [ मताकांक्षी स्त्रिया ] यांनीं हिंदी जनतेचा हुरूप वाढविला. ब्रिटिश मजूरपक्षाच्या पुढाऱ्यांनीं या देशाची प्रत्यक्ष पहाणी करून हिंदी राजकीय आकांक्षांचा पाठपुरावा केला.

## दिल्लीदरबार आणि गुप्तकट

अशा ओढाताणींत बादशहाची स्वारी राज्याभिषेकासाठीं जातीनें

हिंदुस्थानांत आली. बादशहांनीं बंगालची फाळणी रद्द केली व असंतोषाचें एक मूळ उपटून टाकलें. राजधानीचा मान दिल्ली शहराला देऊन लोकांच्या भाविकपणाला आराम पोंचविला. चळवळीला या देणग्यांनीं कांहींसें क्षीणत्व आणलें तरी तिच्यांतील कटासारख्या कित्येक नांग्या मोडलेल्या नव्हत्या. यामुळें दडपशाहीची प्रखरता चालूच राहिली. १९१२ मध्यें व्हाइसरॉय-साहेबावर बॉबफेक होऊन गुप्त कटांच्या नांगीचा प्रत्यय आला. बाल्कन राष्ट्रांच्या लढाईचा निर्देश मागें आलाच आहे. युरोपियन महायुद्धाचें हें पूर्वचिन्ह असें पुष्कळांनीं त्या वेळीं ताडलें होतें. टिळक मंडालेहून परत आल्यावर महायुद्धाचा भडका उडाला. परंतु मध्यंतरीं याप्रमाणें कितीतरी उलाढाली झाल्या होत्या. हिंदी राजकीय साधनेला बळकटी आण-णाऱ्या या साऱ्या घडामोडी आहेत. कोणतीहि 'साधना' आंतरबाह्य विकार—विघ्नांच्या आगींत भाजून निघाल्याशिवाय पक्की होत नाहीं. तिच्यांत खरा कस नसेल तर ती जळून खाक होईल. कस असेल तर उजळून बळकट झाल्याचा अनुभव आणून देईल. १९०५ पूर्वी हिंदी स्वराज्यविषयक साधनेची कठोर परीक्षा केव्हांच झालेली नव्हती. या परीक्षेवेरीज लोकांच्या राजकीय स्वोद्धारविषयक तळमळीचा अंदाज लागला नसता. ही तळमळ संघटित असून, तिनें देश व्यापला आहे अशी राज्यकर्त्यांची खात्री या प्रसंगीं पटली. दडपशाहीचा अकाळविकाळपणा अस्सल देश-भक्तीला भेडसावूं शकत नाहीं, उलट तिला जास्त जास्त धिटाईचें व साह-साचें शिक्षण देतो, हें तात्पर्य या दहा वर्षांतील घडामोडींनीं राज्यकर्त्यांच्या मनीं उतरविलें.

### बेझंटबाईंची कामगिरी

मेल्या महायुद्धाच्या काळांत बेझंटबाईंनीं हिंदी लोकप्रियतेचें अत्युच्च शिखर गांठलें होतें. टिळकांनीं होमरूलच्या मागणीनें जसा देश दणाणून सोडला, तसाच बेझंटबाईंनीं दणाणून सोडला. उत्तर—दक्षिण—हिंदुस्थानांतील किती तरी नव्या व्यक्ती बेझंटबाईंच्या प्रभावानें हिंदी राजकारणांत ईर्ष्या-पूर्वक उतरल्या. ह्यूम, कॉटन, वेडरबर्न, रिपन, वेब, यूल, ब्रॅडला प्रभृति अनेक पुरुषांनीं हिंदी राष्ट्राचें राजकीय ऊर्जित साधावें म्हणून पूर्वी उद्योग

केला होता. ब्राइट, फॉसेट, इत्यादिकांनीं हिंदी प्रश्नाची पार्लमेंटांत उपेक्षा होऊं दिली नाहीं. बेझंटबाई त्यांच्यासारख्या इंग्रजच, पण त्यांनीं हिंदुस्थानाला मातृभूमीचा मान देऊन स्वतःसाठीं निराळाच दर्जा संपादन केला होता. त्यांच्या थिऑसफी संप्रदायाच्या द्वारें त्यांनीं धार्मिक व शैक्षणिक क्षेत्रांत नव्या नव्या विचारांची पेरणी चालविली होती. १९१२ नंतर त्यांनीं हिंदी राजकारणांत लक्ष घातलें. थिऑसफीचा पसारा जगभर असून बेझंटबाई या पसाऱ्याच्या सूत्रधार, यामुळें त्यांची नजर राजकारणाकडे वळतांच त्यांच्या शेंकडों अनुयायांनीं राजकारण अंगीकारलें. बेझंटबाईंच्या ठिकाणीं उत्साह, आवेश, उरक, तडफ वगैरे अनेक गुण होते. शिष्यत्वानें अनन्यभाक्तिपूर्वक त्यांची पडेल ती सेवा करणारा अनुयायांचा जमाव त्यांच्या जवळ होता. हिंदी राजकारण हातीं घेतल्यापासून अवघ्या दीडदोन वर्षांच्या आंतच त्यांनीं सगळें वातावरण असें गरम करून सोडलें, कीं त्यांना अटकेंत कोंडून ठेवण्याची आवश्यकता सरकारला भासली. वृत्तपत्रें, व्याख्यानें, पत्रकें, यांचा विलक्षण धडाका त्यांनीं चालू केला होता. हिंदुस्थानला होमरूल मिळावें, हेंच त्यांचें ध्येय होतें. सप्रू, पं. मोतीलाल नेहरू, चिंतामणी, सरोजिनी नायडू अशीं किती तरी माणसें त्यांनीं आपल्या होमरूलच्या राजकारणांत ओढून आणलीं. यांतलीं कित्येक अशीं होतीं, कीं जीं पूर्वीं टिळक किंवा दुसरे पुढारी यांना बहुधा दुरूनच नमस्कार करीत. बेझंटबाई युरोपियन होत्या, इतकेंच नव्हे, तर थिऑसफीच्या अध्यक्ष या नात्यानें त्या जगद्विख्यात होत्या. हिंदी राजकारणाचे इतर पुढारी फार झाल्यास विद्यार्थी म्हणून इंग्लडांत चारदोन वर्षें राहिलेले किंवा शिष्टाईसाठीं चारदोन वेळां तिकडे फेरी मारून आलेले. म्हणजे इंग्लंडांत फार तर त्यांचें नांव कदाचित् ऐकून माहीत असावयाचें. पण बेझंटबाईंनीं पूर्ववयांत ब्रॅडलाबरोबर इंग्लंडांत नांव गाजविलें होतें. त्यांना जगभर ओळखीदेखीची कमतरता नव्हती. शिवाय थिऑसफीच्या अध्यक्ष यामुळें त्यांचें जिकडे तिकडे वजन होतें. त्यांनीं हिंदी राजकारणाच्या साधनेला नवें वळण लावलें व नवा जोम आणला, यांत संशय नाहीं.

## परदेशी मित्रांची उपेक्षा कां ?

सुब्रह्मण्य अय्यर या महर्षितुल्य वृद्धानें प्रे. विल्सन यांना धाडलेलें पत्र हें एक या नव्या जोमाचें उदाहरण आहे. १९१८ नंतर बाईंच्या लोकप्रियतेचा भाव खालावत जाऊन १९२० नंतर त्या बहुतेक मागासल्या. पावसाचें पाणी वहाळांतून निघून गेलें तरी त्याची ओल मागें रहाते, या दृष्टान्तानुसार त्यांनीं हिंदी राजकारणांत आपल्या प्रभावानें जीं माणसें पुरविलीं त्यातल्या कित्येकांचें साह्य पुढें गांधीजींना लाभलें. त्यांच्या सान्या कर्तबगारीचा पाढा वाचण्याचें हें स्थळ नाहीं. युरोपियन मित्रांनीं 'साधने' ला जो हातभार लावला त्याची मुळींच विचारपूस न केल्यानें साधनेचें एक अंग लपविल्याचा दोष घडतो. एखाद्या व्यक्तीनें साधना आरंभल्यास ज्याचा त्याचा निग्रही प्रयत्न हा मुख्य घटक असला तरी वजनदार मित्रामार्फत शाब्दिक उत्तेजनही ह्या प्रयत्नाच्या यशाविषयीं त्या व्यक्तीला निःशंकतेचें समाधान देतें. मग ज्यांनीं प्रत्यक्ष साह्याचे श्रम केले असतील, त्यांच्या कर्तृत्वाचा अंश साधनेच्या अभिवृद्धीला कारण झालाच पाहिजे हें काय सांगायला हवें ?

## टिळक व गांधी

टिळक व गांधी यांची तुलना नेहेमीं केली जात असते. टिळक व गांधी यांच्यामध्यें कसलाच फरक नाहीं. टिळकांचा नवा अवतार गांधी असा म्हणणारा एक पक्ष आहे तर टिळक हे गांधींहून सर्व प्रकारें श्रेष्ठ, गांधींनीं टिळकांच्या राजकारणाची घडी विस्कटून टाकून देशाचें अतोनात नुकसान केलें, असें प्रतिपादन करणारा दुसरा पक्ष आहे. टिळकांचे कांहीं शिष्य व अनुयायी गांधींच्या निशाणाखालीं असून त्यांना गांधी–टिळकांमध्यें कसलाच भेद दिसत नाहीं. परंतु टिळकांच्या मृत्यूनंतर गांधींच्या मार्गावर कांहीं काळ राहून येथून भ्रष्ट झालेले टिळकांचे दुसरे शिष्य, टिळक व गांधी यांमध्यें जमीनअस्मानाचें अंतर असून टिळकपक्षाला नेस्तनाबूद करण्यासाठीं गांधींचा अवतार आहे, असें वेळींअवेळीं कंठशोषानें बजावण्यास चुकत नाहींत. ज्यांना टिळक–गांधी यांत भेदभाव पहावासा वाटत नाहीं, ते गांधीभक्त टिळकशिष्यांच्या साक्षी काढून आपल्या मनोगताला दुजोरा देत असतात. ज्यांना दोघांमध्यें अंतर पाहून आपली बुद्धि रिझविण्याचा नाद आहे ते

गांधींचें नेतृत्व एकदां पत्करून नंतर झुगारणाऱ्या टिळकशिष्यांच्या मतांचा हवाला देऊन आपल्याप्रमाणें इतरांचेही समाधान करूं पाहातात. या ओढाताणींतून सुटण्याकरितां टिळक व गांधी या दोघां थोर पुरुषांच्या चरित्राचें व कार्याचें स्वतंत्र निरीक्षण ज्यानें त्यानें आपापल्या ज्ञानानुसार करून कोणता निर्णय सांपडतो तें पहावें. असें स्वतंत्र निरीक्षण बरेंच उद्बोधक होण्याला हरकत नाहीं.

## ला० टिळकांच्या राजकारणाची भूमिका

टिळकांचा स्वार्थत्याग, धैर्य, स्वीकृत कार्याबद्दल अढळ निष्ठा, विद्वत्ता इत्यादि गुणांविषयीं कुणाचाच मतभेद असण्याचें कारण नाहीं. यांतील बरेच गुण गांधींच्या स्वभावांत आहेत व गांधींच्या पुष्कळशा अनुयायांतही आहेत. टिळकांची दार्शनिक विद्वत्ता आणि व्यासंग गांधीजीपाशीं नाहीं. स्वार्थत्यागांत टिळक गांधीजींच्या बरोबरीला बसणार नाहींत. गांधींना मुलगे आहेत. पण त्यांच्यासाठीं गांधींनीं कसलीच तरतूद केलेली नाहीं व स्वतःचा असा निराळा परिग्रह त्यांनीं बाळगलेला नाहीं. अशीच त्यांच्या कितीतरी अनुयायांची स्थिति आहे. टिळक हे इंग्रजी सनदशीरपणाच्या राजकारणांत वाढलेले होते. त्यांना कायदेभंगाचें तत्व अंमलांत आणण्याची बुद्धि कधीं झाली नाहीं. उलट 'कायद्याची धार कितीही तीव्र व सूक्ष्म असली तरी तिचा धक्का लागणार नाहीं किंवा ती सुटणार नाहीं किंवा ती तुटणार नाहीं अशा कौशल्यानें आपण आपल्या मताचा प्रसार करूं' असें त्यांनीं आश्वासन दिल्याचें प्रसिद्ध आहे. त्यांना कायदेभंगाची संधि मिळाली नाहीं, असेंही नाहीं. मंडालेहून परत आल्यावर कर्नाटकांत एकदां तेथील कलेक्टरानें त्यांच्यावर भाषणबंदीचा हुकूम बजावला असतां टिळकांनीं जाहीर भाषण टाळून त्याच्या हद्दीबाहेर प्रयाण केलें; कायदेभंगाचा उपाय स्वीकारला नाहीं. यावेळीं कायदेभंग त्यांना अपरिचित होता असेंही नाहीं. गांधीजींची दक्षिण आफ्रिकेतील निःशस्त्र प्रतिकाराची चळवळ व कायदेभंग हें तिचें साधन टिळकांच्या माहितीचें होतें. परंतु टिळकांच्या मनोधर्मामध्यें जुलमी हुकुमाचा या साक्षात् व तात्कालिक प्रतिक्रियेचा संस्कारच नव्हता. राज्यकर्त्यांच्या शिरजोरीचा निषेध, शिरजोरीनें अनिष्ट परिणाम भोगावे लागतील असल्या

मार्मिकतासह जोरदार निषेध, एवढीच त्या काळांतल्या सर्व पुढाऱ्यांच्या उद्वेगाची परिसीमा होती. मनुष्यासाठीं कायदे आहेत, कायद्यासाठीं माणसें नाहींत; कायद्यांनीं हित होण्याऐवजीं अहित घडूं लागलें तर ते कायदे धाब्यावर बसविणें अवश्य, हें तत्वज्ञान गांधींनीं स्वतःच्या आचरणांत उतरवून लोकांना शिकविलें. टिळकांवर राजद्रोहाचे खटले झाले तर त्यांनीं बचावाकरितां आपलें सारें कायद्याचें ज्ञान खर्ची घातलें. 'राजद्रोह करणें हा माझा धंदा आहे. हा धंदा नाइलाजानें पत्करला आहे. कां पत्करला याचा खुलासा मान्य असल्यास, जज्जसाहेब, तुम्ही आपलें आसन सोडून माझ्या उद्योगांत सामिल व्हा, मान्य नसेल तर तुमच्या कायद्याप्रमाणें मोठ्यांत मोठी शिक्षा मला द्या.' असें न्यायाधीशाला तोंडावर सांगण्याची रीत गांधींची आहे. कोणत्याही सुशिक्षित अर्वाचीनाच्या अंतरंगांत राजद्रोह सांपडायचा नाहीं, अशा ठाम समजुतीचे टिळक, तर राजद्रोह ही मतभेदाची बाब आहे; ब्रिटिशांनीं आपलें राज्ययंत्र न सुधारल्यास या मतभेदाचा उपद्रव वाढला पाहिजे, असें छातीठोकपणानें जनतेला शिकविणारे गांधी आहेत.

### लोकमान्य आणि क्रांतिकारक

राजद्रोहविषयक दृष्टिकोनासारखाच टिळकांचा क्रांतिवादाबद्दलचा दृष्टिकोन स्थूलमानानें होता. अहिंसा–हिंसेचा गांधींच्याप्रमाणें विधिनिषेध नसल्यामुळें टिळकांच्या राजकीय प्रगतीच्या कल्पनांमध्यें एक विलक्षण कल्पना दडून बसलेली होती. चीन, अफगाणिस्तान किंवा नेपाळ यांसारख्या शेजारच्या देशांतून इंग्रजी राज्यकारभारावर संकट वाटण्याजोगें दडपण उत्पन्न घ्हावें व या दडपणाच्या अडचणींत ब्रिटिश राज्यकर्ते सांपडले कीं, आपल्या सहकारितेचा मोबदला म्हणून त्यांच्याकडून राजकीय सुधारणांची मोठालीं घबाडें मिळवावीं, या कल्पनेची एक सूक्ष्म धार टिळकांच्या राजकारणांत होती. तिच्या प्रभावानें कांही हालचाली त्यांच्या मित्रांनीं व अनुयायांनीं वरील देशांतून केल्या. त्या अर्थातच यशस्वी झाल्या नाहींत, हें निराळें सांगावयास नको. अमेरिकेसारख्या देशांत हिंदी तरुणांनीं लष्करी शिक्षण घ्यावें व त्याचा उपयोग हिंदी राजकारणांत करावा, या कल्पनेचेही कित्येक भोक्ते टिळकांच्या जिवलग अनुयायी परिवारांत होते. तथापि सावरकर

पंथाची ओळख घडतांच टिळकांनीं त्यांतील तरुणांची कानउघाडणी करून त्यांना जीव निष्कारण बळी पडेल, देशाचें राजकारण बिघडेल, अशा अर्थाचा इषारा दिल्याची हकीकत उपलब्ध आहे. अर्वाचीन शिक्षितांच्या अंतःकरणांत राजद्रोहाचा प्रादुर्भाव घडणें शक्य नाहीं व देशाभिमानाला माथेफिरूपणाचें रूप येऊन एखाद्याच्या ठिकाणीं राजद्रोहच नव्हे तर राज्य उलथून पाडण्याच्या लालसेनें जन्म घेतल्यास ती गोष्ट लाभप्रद होण्याऐवजीं आत्मघातकीपणाची ठरण्याचाच संभव अतिशय, असें दोन्ही प्रकारचें टिळकांचें निश्चित राजकीय हृद्गत वरील प्रसंगानें उघडकीस आलें. कटाच्या कल्पनेचा निषेध केला तरी टिळकांना हिंसेचा गांधींसारखा अगदीं हाडांत मुरलेला तिटकारा नव्हता. तिटकारा नसला तरी टिळक हिंसेला मान्यता देणारांपैकीं नव्हते. हिंसेपासून इष्ट फलप्राप्ति व्हावयाची नाहीं, अशी खात्री व कायद्याचा हिंसेला असणारा कडक विरोध अशा दोन गोष्टींमुळें टिळक हिंसामार्गाला अनुकूलता दाखवीत नव्हते. पण परचक्रासारख्या संकटाच्या शहांत ब्रिटिश राज्यकर्तृत्व सांपडल्यास देशाचा फायदा होईल, ही त्यांची भावना ध्यानांत ठेवण्यालायक आहे.

## जनजागृतीचा पाठपुरावा करणारे लोकमान्य

टिळकांनीं आपल्या हयातभर स्वतंत्र मताचा प्रसार करण्याऐवजीं देशांत जीं राजकीय मतें तीव्र असतील व ज्यांचा लोकांत असंतोष वाढविण्याला उपयोग होईल अशा इतर बहुमान्य विचारांचा धूमधडाक्यानें प्रसार केला. सुरुवातीपासून त्यांच्या कर्तृत्वाचा हाच मासला दिसतो. 'तुमच्या विचाराला उचलून धरणारीं दोन माणसें दाखविल्यास मी तुमच्या कार्याला मदत करतों' असें टिळकांनीं पैसाफंडाबद्दल उद्गार काढल्याची गोष्ट पैसाफंड काळयांनीं प्रसिद्ध केली आहे. ज्या कल्पनेला कुठें थोडाफार पाठिंबा असेल त्या कल्पनेला [अर्थात् उचित व इष्ट वाटली तर] धरावयाचें हा टिळकांच्या स्वभावाचा एक विशेष वरच्या गोष्टीनें सहज कळणारा आहे. न्यू इंग्लिश स्कूल-क्राफर्डची चौकशी, संमतिवयाच्या कायद्याविरुद्ध चळवळ, शिवाजीउत्सव, गणेशोत्सव, समर्थविद्यालय, पैसाफंड कांचशाळा, स्वदेशीबहिष्कार, दारू, गुत्त्यांचें पिकेटिंग, होमरूल इत्यादि ज्या ज्या गोष्टींशीं टिळकांनीं आपला संबंध जोडला, त्या त्या साऱ्या गोष्टी मुळामध्यें दुसऱ्यांच्या कल्पनेंतल्या, अशी माहिती उपलब्ध आहे. मात्र स्वीकृताची जोपासना वाटेल त्या उपा-

यांनीं व संकटांस न जुमानतां करावयाची असा त्यांचा गुण कुणासहि कबूल करावा लागेल.

## सनातनी पाठिंब्याचा परिणाम

पूर्वोक्त अनेक गोष्टींचें केवळ प्रांतिक—किंबहुना महाराष्ट्रापुरतेंच—महत्त्व असल्यानें टिळकांना अखिल भारतीय महत्त्वानें ओळखण्याचा योग प्रथम राजद्रोहाच्या खटल्यानें आला. १९०७ सालीं सुरतेस काँग्रेसचा जो बखेडा झाला त्या योगानें त्यांचें नांव हिंदुस्थानभर झालें. काँग्रेसला ते बहुधा नियमानें हजर रहात असले तरी त्यांचें स्थान त्या मेळ्यांत बहुत वर्षें दुय्यम स्वरूपाचें होतें. गोखले-फिरोजशहांच्या मृत्यूनंतर आयुष्याच्या अखेरीस टिळक खऱ्याखुऱ्या अखिल भारतीय महत्त्वास चढले. पण महाराष्ट्रांत त्यांची लोकप्रियता असामान्य होती. त्यांतल्या त्यांत पांढरपेशा-वर्ग व त्यांत पुनः ब्राह्मणवर्ग त्यांना अधिक चहात होता, अशीहि वर्ग-वारी केल्यास चुकीची ठरणार नाहीं. ब्राह्मणांत त्यांच्याविषयींचें प्रेम जास्त कां दिसावें, याची मीमांसा केल्यास त्यांची जुन्या वळणाची रहाणी, पेशवाई ढंगाचा पोशाख, सामाजिक सुधारणेबाबत टिळकांनीं स्वीकारलेलें प्रतिगामी धोरण, अशा गोष्टी विचारांत घ्याव्या लागतात. १८९१ मध्यें ते शाळा-कॉलेजाच्या कामांतून मोकळे होतांना त्यांनीं लोकांत आपली बैठक जमविण्या-साठीं संमतिवयाच्या विरोधांत जबरदस्त ईर्षेनें उडी घेतली. या विरोधामागें महाराष्ट्रांत ब्राह्मणवर्गच प्रामुख्यानें व मोठ्या संख्येनें उभा होता. शिकलेल्या ब्राह्मणांना जुन्या आचारविचारांचें मंडन करण्यासाठीं या काळापर्यंत एक सोय झाली होती. संस्कृत ग्रंथांचा अभ्यास करणाऱ्या युरोपियन विद्वान मंडळींनीं श्रुतिस्मृतिपुराणांचा अधूनमधून निरनिराळ्या संदर्भांत जो गौरव केला असेल, तो जमेला धरून जुन्या चालीरीतींना या गौरवाच्या मुलाम्यानें अस्सल सोन्याच्या योग्यतेस नेऊन बसविणाऱ्यांचा एक पंथ या सुमारास जन्मलेला होता. [ प्रो. जिनसीवाले व प्रि. म. शि. गोळे हीं दोन नांवें याचा उलगडा होण्याला पुरेशी आहेत. ] डार्विनचा उत्क्रांतिवाद, स्पेन्सरचें समाजशास्त्र, यांसारख्या शास्त्रांतील जेवढा भाग जुन्या आचारविचारांच्या तरफदारीला उपयोगी पडेल तेवढा घेऊन त्याच्या जोरावर आपला जुन्याचा अभिमान पोसावयाचा हा प्रकार या सुमारास

बराच फोफावलेला होता. टिळकांनीं या प्रकारची तळी उचलून धरल्या-मुळें भांडारकर, रानडे, तेलंग, आगरकर यांच्या विरुद्ध त्यांचा लोकांत जम बसण्याला पुष्कळच मदत झाली. टिळकांना बंगालमध्यें या चळवळीमुळें तिकडील संमतिकायद्याच्या विरोधी गटांत मान्यता मिळाली. पण हा केवळ पुढारीपणा संपादन करण्याचा खटाटोप असून टिळकांचें अंतरंग निराळें आहे असा आगरकरांनीं 'सुधारकां'तून टिळकांबद्दल लोकांना वेळोवेळीं इषारा देण्याचें जें काम चालविलें होतें, तें येथें विसरून चालणार नाहीं. धर्माच्या नांवानें संपादिलेल्या लोकप्रियतेसाठीं टिळकांना पुढें सामाजिक सुधारणेबद्दल कायमचें उदासीन किंवा विरोधी रहावें लागलें. सामाजिक सुधारणेचा पुरस्कार स्वतः करावयाचा नाहीं व जे पुरस्कार करीत असतील त्यांना निंदावयाचें, असें त्यांचें धोरण होतें.

## लोकमान्य आणि कायदेभंग

जनतेची जागृति व शक्ति केवळ राजकारणांतच केंद्रित व्हावी, अशा उद्देशानें त्यानीं समाजसुधारणेकडे पाठ फिरविली असेल, पण सरकारचे दोष कायद्याच्या कक्षेत उघडकीस आणून लोकांना चालू राज्यकारभारा-विषयीं निरंतर असंतुष्ट राखणें, एवढीच काय ती एक कामगिरी त्यांनीं चालविली होती. लोकांत वाढणाऱ्या असंतोषाला मार्ग दाखविण्याची जबाबदारी त्यांनीं कधींच अंगावर घेतली नाहीं. 'स्वराज्य' हा राजकीय ध्येयाचा शब्द निघाला तेव्हां त्याचा प्रचार त्यांनीं केला. पण हें ध्येय गांठण्यासाठीं लोकांनीं कोणत्या क्रिया आचराव्या, याचें दर्शन त्यांच्या विचारसरणींत आढळत नाहीं. कलकत्त्याला १९०६ सालीं कॉंग्रेस भरली तेव्हां नव्या पक्षांचीं तत्त्वें म्हणून त्यांनीं कांहीं क्रियांचा पाल—अरविंद वगैरेंच्या धोरणानें उच्चार केला. पण त्या क्रिया आचरल्या जाण्यासाठीं लोकसंघटनेचा जो प्रयोग व्हावयास पाहिजे होता तो त्यांच्या हातून कधींच घडला नाहीं. [ येथें कोणास कदाचित् १८९६ सालांतील दुष्काळाचें स्मरण होईल. पण गांधींनीं खेडा जिल्ह्यांत केलेल्या प्रयोगाचा विसर न पडूं दिल्यास तें स्मरण गैरलागू असल्याचें ध्यानांत येण्याला उशीर लागणार नाहीं. ] सदर नव्या पक्षाबद्दल टिळकांनीं ना. गोखल्यांवर टीका करतांना जें म्हटलें आहे तें टिळक आणि गांधी यांच्या

तुलनेला उपकारक होईल असें वाटतें. 'कॉंस्टिटयूशनल चळवळ करा, या शब्दांनीं जर पीनल कोडांतील सरकारच्या आज्ञा मोडून शिक्षा भोगूं नका, एवढाच उपदेश करावयाचा असेल तर या उपदेशासंबंधानें नवीन पक्षाकडून कांहीं हरकत होईल असें आम्हांस वाटत नाहीं. पीनल कोडाच्या आज्ञा मोडणें हें कांहीं प्रसंगीं नीतीचें व योग्य असलें तरी तो व्यक्तिविषयक प्रश्न असल्यामुळें कायदा मोडून सरसकट शिक्षा भोगण्यास तयार व्हा असा उपदेश सर्व लोकांना करणें नवीन पक्षासहि संमत नाहीं. नवीन पक्ष सरकाराविरुद्ध बंड करा, असा उपदेश करीत सुटलेला नाहीं, किंवा कायदे मोडण्याचाहि या पक्षानें लोकांना आग्रह केलेला नाहीं. ना. गोखले, सर फेरोजशहा मेथ, किंवा इतर कोणीहि जुन्या पक्षाचा पुढारी सरकारच्या कायद्याची महति जितकी उचलून धरील तितक्या प्रमाणानेंच कायद्याच्या सीमेचें उल्लंघन न करणारा नवा पक्ष आहे.' टिळकांच्या लोकप्रियतेचें क्षेत्रफळ मुळांत किती होतें, नंतर कसें व कुठवर वाढलें, याची पहाणी करतांना त्यांच्या 'ओरायन'व 'वेदांतील उत्तर ध्रुवाची भूमि' या पुस्तकांचें कदाचित् स्मरण घडेल. या विद्वत्ताप्रचुर ग्रंथांनीं परदेशांतील १०।५ विद्वानांकडे त्यांचें नांव पोंचलें, प॰. ती ख्याति लोकप्रियतेच्या [ राजकीय ] हिशोबांत घेण्याला पुरेशी नाहीं.

## महाराष्ट्राच्या राजकीय अवस्था

टिळकांच्या राजकारणाचें संशोधन करीत असतां एकंदर महाराष्ट्राच्या राजकारणाची छाननी केल्यास वावगें होणार नाहीं. महाराष्ट्राचें इंग्रजी राज्यांतील राजकारण इतर कोणत्याहि प्रांताहून जास्त तेजस्वी व जास्त उंचीचें दिसलें तरी आरंभानंतर कांहीं काळपर्यंतच तें तसें राहिलें, हें थोड्याशा विचारानें कळण्याजोगें आहे. संभाजीच्या वधानंतर महाराष्ट्राचें राजकारण जें एकदां ब्राह्मणांच्या हातांत गेलें तें आजतागायत प्रामुख्यानें त्यांच्याच हातांत आहे. इंग्रजी राज्य झाल्यावर ब्राह्मणांनीं इंग्रजी शिक्षण घेतलें, व त्याच्या जोरावर सरकारी नोकरींत जिकडे तिकडे त्यांचा शिरकाव झाला. वकिली, डॉक्टरी हे धंदे त्यांनींच व्यापले. वृत्तपत्रें ह्यांनींच काढलीं व चालविलीं. कालान्तरानें शिक्षणाचा व्यापार ह्यांनींच आरंभिला. महाराष्ट्रांतील ब्राह्मणांना पेशवाईमुळें वर्चस्वानें राहण्याची संवय जडली असल्यास नवल

नाहीं व त्याबद्दल त्यांना दोष देणें म्हणजे एक प्रकारें अन्यायच ठरेल. दोष द्यायचा झाल्यास त्यांनीं इंग्रजी राज्याचें स्वरूप न ओळखतां गतकालीन वर्चस्व टिकविण्याचा जो मार्ग स्वीकारला त्यासाठीं देतां येईल. अव्वल इंग्रजशाहींत पुणें शहरामध्यें राजकारणाची धामधूम नव्हती. मुंबईत नव्या राजकारणाचें बीज प्रथम रुजत पडलें होतें. पुणें शहरांतील लोकहितवादीसारख्या व्यक्ती मुंबईतील प्रभाकर पत्राच्या साह्यानें आपलीं मतें प्रकट करीत होत्या हें, मुबई पुण्याहून अधिक जागृत असल्याचें एक लक्षण मानावें लागतें. मुंबईत हिंदु, मुसलमान, पारशी या सगळयांचा दर्जा सारखा असल्यानें ब्राह्मणांच्या मोठेपणाला वाव नव्हता. मुंबइत पुण्याप्रमाणें एकजिनसी ब्राह्मण वर्ग नाहीं. शिवाय भिन्नभिन्न व्यवसायांतील इंग्रजाचा भरणा मुंबईत मोठा असल्यानें त्यांचा संपर्क हिंदी जनतेला पुण्यापेक्षां कितीतरी पटीनें जास्त घडावा व त्यायोगानें जातिभेदमूलक विषमतेच्या कांट्यांची तीक्ष्णता ओसरावी हें स्वाभाविक आहे. या परिस्थितीचा परिणाम असा दिसतो कीं, मुंबईच्या पुढाऱ्यांत सामाजिक सुधारणेसकट राजकीय दृष्टया एकवाक्यता होण्याला अडचण आली नाहीं. कालांतरानें पुणें हें राजकारणाचें दुसरें केंद्र निर्माण झालें आणि या एकवाक्यतेला टिळकांच्या पुढाकारातील ब्राह्मणी श्रेष्ठतेच्या भावनेनें झपाटलें! लोकहितवादी, रानडे प्रभृति पुढाऱ्यांनीं जुन्या धर्मव्यवहाराचा अभिमान सोडून विचारजागृति चालविली होती; किंबहुना त्या धर्माचारांना चिकटून राहिल्यास राजकीय प्रगतीला अडथळा होईल असा त्यांचा पक्का समज होता. पुण्यांतील धर्माभिमानाचें व इतिहासाभिमानाचें वारें सबंध देशाच्या राजकारणाला बाधलें नसलें तरी महाराष्ट्रांत त्याचे जे परिणाम व्हावयाचे ते झालेच.

## ब्राह्मण आणि सामाजिक सुधारणा

पुण्याला राजकीय दृष्टीनें मान मिळण्याला रानड्यांचे श्रम कारणीभूत होते. टिळकांनीं १८९१ साली राजकीय क्षेत्रांत प्रवेश केल्यानंतर दोन वर्षांनीं रानडे मुंबईस गेले व टिळकांनीं तें क्षेत्र आपलेंसें करून सोडलें. १८९३ सालांतील हिंदूंची सभा, त्यानंतर सार्वजनिक सभेचा कबजा असे त्यांच्या चढत्या कमानीचे कांहीं टप्पे सहज ध्यानांत येणारे आहेत. पुण्य

गोखले होते पण ते धर्माच्या नांवानें चालणाऱ्या राजकारणाकडे कधीं फिरकले नाहींत. त्यांचें राजकारण धर्म, पंथ, जाती, अवतार, आचार्य यांच्यापैकीं कुणाच्याहि नांवाच्या आधाराशिवाय चाललेलें होतें. धर्म आणि ब्राह्मण यांची युति सनातन आहे. संमतिकायद्याबाबत भांडारकर, तेलंग, आगरकर यांच्याशीं झगडा केला म्हणून धर्मरक्षक या नात्यानें टिळकांचा जो बोलबाला एकदा वाढला तो 'कॉंग्रेसच्या मंडपात सामाजिक परिषद भरूं नये,' असल्या कटकटींच्या मागें राहून त्यानीं कायम राखला. सामाजिक सुधारणेचा रोख ब्राह्मण समाजावरच होता. ब्राह्मणांना सामाजिक सुधारणेचा उद्योग संमत नव्हता. त्या उद्योगाच्या रानडे—भांडारकरांसारख्या वजनदार पुढाऱ्यांची सडकून हजेरी घेणारा टिळकासारखा पुरुष पुढें सरसावताच ब्राह्मण समाजानें त्यांच्या सभोंवतीं जयजयकार करीत गोळा व्हावें, हें स्वाभाविक आहे. सामाजिक सुधारणेची गडबड मागसली कीं, मानवी समानतेच्या तत्त्वानें ब्राह्मणी वर्चस्वाला लागलेलें ग्रहण टळेल, अशी ब्राह्मण समाजाची अटकळ असल्यास आश्चर्य नाहीं. जिल्हा, तालुके, महाल या ठिकाणीं वकील, डॉक्टर किंवा सरकारी अंमलदार हे सगळे तेव्हां ब्राह्मणच असत. महाराष्ट्रांत आणि विशेषतः ब्राह्मण समाजांत टिळकांचें कौतुक विशेष केलें जात असे, या विधानाची स्पष्टता प्रस्तुत विवेचनानें होईल.

## स्वराज्य कुणाचें ?—ब्राह्मणांचेंच कां ?

सामाजिक सुधारणेच्या चळवळीनें बुद्धिभेद होतो, समाज दुभंगतो, त्याची संघशक्ति फुटून राजकारणाला चढावी तशी तेजी चढत नाहीं, या समजुतीनें टिळकांनीं राजकारणाच्या झेंडयाखालीं संघटना करण्याची आशा धरली. स्वराज्य मिळालें कीं समाजसुधारणा चुटकीसरशी पार पडेल अशा धोरणाचा अभिप्राय त्यांच्या अनेक लेखांतून सुचविला गेलेला आहे. स्वराज्य सर्वांनाच हवें म्हणून स्वराज्याच्या चळवळीला सगळ्यांचा हातभार लागेल या समजुतींत कांहीं मर्यादेपर्यंत सत्यांश असला तरी, ब्राह्मणांनीं चोहोंकडून व्यापलेल्या चळवळीच्या साफल्यांत आपला वांटा किती व स्थान कोणतें हा प्रश्न उपस्थित व्हावयाचाच होता. ब्राह्मणांच्या पुढाकारानें साधणारें स्वराज्य केवळ ब्राह्मणांचें कीं त्यांत ब्राह्मणेतर जनतेलाहि महत्त्वाचे

अधिकार हटकून प्राप्त व्हावयाचे आहेत, असे सवाल मनांत संचरण्या-इतका जाणतेपणा, कुणाच्या चिथावणीनें म्हणा किंवा स्वयंप्रेरणेनें म्हणा, उत्पन्न झाल्याबरोबर ब्राह्मणांविरुद्ध महाराष्ट्रांत वादळ उठलें. सत्यशोधक समाजानें या वादळाची उठावणी केली होती. या समाजाचे संस्थापक जोतीबा फुले यांची ब्राह्मणांकडून कशी संभावना झाली याचें प्रत्यंतर विष्णु-शास्त्री चिपळुणकरांच्या निबंधमालेंत आहे. फुल्यांच्या विचारसरणींत पायाशुद्ध पांडित्य नसलें किंवा आडदांडपणा असला तरी त्यांनीं ब्राह्मणनिषेधाच्या निमित्तानें प्रत्येक माणसाचा दर्जा सारखा समजून प्रत्येकाला जास्तींत जास्त उन्नति करून घेण्याला संधी असावी, जातीजातींतील उच्चनीचत्वाच्या भावनेनें कुणाच्याहि आशा आकांक्षेचा कोंडमारा होऊं नये, या तत्त्वांचें अब्राह्मण समाजांत जें भक्कम व खोल बीजारोपण केलें, त्याची ब्राह्मण पुढाकाराच्या चळवळींत कधीं दादच नव्हती. ब्राह्मणेतर समाज शाळाकॉलेजांतील पुस्तकी शिक्षणानें कितीहि शहाणा झाला तरी त्याचा दर्जा राष्ट्रीय कर्तबगारींत दुय्यमच राहणार अशी ठाम समजुत महाराष्ट्रांत होती. महाराष्ट्रांत म्हणण्याचें कारण इतकेंच कीं, ब्राह्मणाचें श्रेष्ठत्व जसें पेशवाईमुळें या प्रांतीं राहिलें तसें तें अन्यत्र [ मद्रास वगळल्यास ] कुठेंहि नव्हतें व नाहीं. ब्राह्मणेतर मराठ्यांनीं पेशवाईच नव्हे तर शिवाजीच्या पूर्वींहि पराक्रम व अधिकार गाजविला असून शिवाजीनें स्वतंत्र राज्याच्या रूपानें त्यावर कळस चढविला. या प्रांतामध्यें त्यांची संख्या प्रचंड आहे हें ध्यानांत वागवून बरोबरीच्या नात्यानें त्यांना वागवूं इच्छिणारी व त्यांस तशी संधि देणारी लोकहितवादी, रानडे प्रभृतींची चळवळ होती. टिळकांकडे पुढाकार गेल्यावर हें विचारसरणीचें औदार्य नाहींसें झालें. फुल्यांची संस्था, चळवळ, आणि विचारसरणी हीं जणूं काय त्यांच्याबरोबरच गेलीं असा देखावा दिसूं लागला. १९०१–२ सालीं कोल्हापुरांतील वेदोक्त प्रकरणानें फुल्यांचें कार्य जिवंत असल्याचें चिन्ह प्रगटलें. परंतु मागील महायुद्धानंतर त्या कार्याच्या उठावणीनें महाराष्ट्र दणाणून गेलें. राज्यसुधारण्याच्या वाटाघाटींचा तो काळ होता. राज्यसुधारणा म्हणजे स्वराज्याची पूर्वतयारी असा प्रकार ओळखून, जे पुढारी आपल्या हक्कांचा विचारच करीत नाहींत त्यांच्या पाठीशीं राहिल्यास लोण्याचा गोळा ते उपटतील व ताकाच्या

पाण्यावर आपल्याला गुजारा करण्याची पाळी येईल, असें भय अब्राह्मण बहुजनसमाजाला वाटलें. टिळकांच्या पुढारीपणाचा तो परिणाम होता. गांधींच्या चळवळीनें त्या परिणामाला आवरलें. त्याची झळ लागण्याचा प्रसंग कधीं आलाच तर तो हिंदुत्वनिष्ठ नांवाच्या नव्या पंथाला येतो. कारण ह्या पंथांत साधारणपणें इतर कोणत्याहि जातीपेक्षां ब्राह्मणांची संख्या किती तरी पटीनें जास्त आहे. टिळक आणि त्यांचे गांवोगांवचे ब्राह्मण अनुयायी यांनीं ब्राह्मणेतर समाजामध्यें होत असलेल्या जागृतीची बुद्धिपुरस्सर उपेक्षा केली असें सुचविण्याचा हेतु नाहीं. त्यांनीं देवाधर्माच्या, पेशवाईच्या व्यवहारावर भिस्त ठेवून जी विचारपरंपरा स्वीकारली तिचें तें स्वाभाविक फळ होतें. देवाधर्माविषयींच्या जुन्या आदरमूलक कल्पनांचा झपाट्यानें ऱ्हास होत आहे, इकडे त्यांनीं पुरवावें तेवढें लक्ष पुरविलें नाहीं. त्यांना वाटलें कीं, गणपति, शिवाजी यांच्या स्मरणोत्सवानें समाजांतली दुही नष्ट होऊन सर्व-जण स्वराज्यासाठीं एकवटतील. स्वराज्यासाठीं जातिभेद मागें पडून जूट निर्माण व्हावी ही अपेक्षा सयुक्तिक आहे, पण स्वराज्य मिळवायचें कुणी व भोगायचें कुणी याचा पक्का निकाल समजण्यासारखी स्पष्टता टिळकांच्या चळवळींत नव्हती. गांधीजी व टिळक यांची एकरूपता ठरवितांना अशा एकंदर परिस्थितीकडे दृष्टिक्षेप करणें अवश्य आहे.

## सनदशीर चळवळीचा सनातनी पाया

हिंदुस्थानांतील धार्मिक चर्चा समन्वय पद्धतीनें करण्याचा प्रघात फार प्राचीन आहे. टिळकांच्या बुद्धींत या पद्धतीचा पगडा होता. धार्मिक वचनें कितीहि परस्परविरोधी अर्थांचीं असलीं तरी तीं समानार्थक आहेत असें दाखविणें हें समन्वयाचें ध्येय आहे. हें ध्येय लटपटीशिवाय साधणें शक्य नाहीं. जें रूढ किंवा मान्य असेल त्याची तरफदारी करण्याची संवय माणसाला क्रांतिवादी होऊं देत नाहीं. कालानुसार जें निरुपयोगी असेल तें गाडून टाकावयाचें व जें उपयोगी वाटेल तें अपूर्व किंवा अपरिचित असलें तरी उभारावयाचें असा क्रांतीचा स्वभाव आहे. वेगवेगळ्या काळीं भिन्न कारणांनीं प्रचलित होणाऱ्या गोष्टींतील विरोध किंवा इष्टानिष्टता न पाहतां ह्या ग्राह्यच आहेत [कारण लोकमताला त्या सोडवत नाहींत–मग तें लोकमत कितीहि अडाणी वा अंध असो], असा आग्रह धरणारी बुद्धि

केवळ समाजसुधारणेलाच विरोध करून थांबत नाहीं. श्रुतिस्मृतींना ती जो मान देते तोच मान तिच्याकडून इंडियन पीनल कोडालाहि मिळतो. धर्मशास्त्र जसें लोकव्यवस्थेचें नियमन करणारें, तसेंच इंग्रजी राज्यांतील फौजदारी कायदेहि लोकनिग्रह करणारे आहेत. एकाच्या मान्यतेला जपणारी बुद्धि दुसऱ्याच्या पायमल्लीला बिचकावी, हें सरळ आहे. गांधी हे सामाजिक बाबतींत जसे क्रांतिवादी आहेत, तसेंच राजकारणांतहि क्रांतिकारक आहेत. ज्या तर्काला धर्माचीं अनिष्ट बंधनें तोडावीशीं वाटतात, त्या तर्काला कायद्यासारखीं राजकीय बंधनें अडवूं शकत नाहींत. टिळक आणि गांधी यांच्या आचारविचारांची एकरूपता ठरवितांना अशा कितीतरी गोष्टी लक्षांत घेणें अवश्य आहे.

## महात्माजींच्या तपस्येची पूर्व पीठिका !

गांधींच्या चारित्र्याचें व कर्तृत्वाचें निरीक्षण करूं लागल्याबरोबर त्यांचा सगळाच खाक्या टिळकांहून अगदीं निराळा दिसूं लागतो. त्यांची विचाराची व कामाची पद्धत पूर्वींच्या एकाहि पुढाऱ्याशीं जुळणारी नाहीं. त्यांनीं हिंदुस्थानांतील विद्यापीठाचें शिक्षण घेतलेलें नाहीं. त्यांचा जन्म वैश्य कुळांत झाला. त्यांच्या आयुष्याचीं पहिलीं १७ वर्षें संस्थानांत गेलीं असून पुढचा काळ विलायतेस गेला. कुळ, संस्थान आणि विलायत हीं तिन्हीं प्रकरणें त्यांच्या बुद्धिविकासाच्या अभ्यासाला उपयोगी आहेत. मातापित्यांच्या ममत्वानें त्यांच्या स्वभावाला लहानपणींच कडक शिस्त लागली होती. सत्यवादित्व हें त्या शिस्तीचें प्रमुख अंग म्हणतां येईल. विलायतेस बॅरिस्टरीचा अभ्यास करतांना संगदोषानें त्यांच्या शिस्तीचा थोडासा भंग झाला, परंतु वचनपूर्तीच्या ध्येयानें ते ताळ्यावर येण्याला वेळ लागला नाहीं. जीवन आणि धर्म यांचें कोडें व त्यांचा परस्पर संबंध जाणून घेण्याकडे त्यांचा या दिवसांत मनस्वी ओढा होता. ख्रिस्ताचें चरित्र त्यांनीं वाचलें, थिआसफीचे ग्रंथ पाहिले, शेवटीं श्रीमद्भगवद्गीतेनें त्यांच्या चित्ताची धर्म-जीवनाविषयींची तळमळ शांत केली. पण टिळकांप्रमाणें भाष्यें, टीका, वृत्ति, वाचण्याच्या उरस्फोडींत ते गीतेचा अभ्यास करतांना पडले नाहींत. धर्माच्या अभ्यासाचा एक परिणाम त्यांच्यामध्यें दिसतो तो हा कीं. धर्मतत्त्वांचा आदर त्यांच्यामध्यें उत्पन्न झाला; पण रूढ धर्माचारांना

त्यांच्या अंतरंगांत कांहींच किंमत उरली नाहीं. परंतु आफ्रिकेचा रहिवास घडेपर्यंत आपलें आयुष्य कोणत्या कार्यांत वेंचावयाचें याचा साक्षात्कार त्यांना झाला नव्हता. दक्षिण आफ्रिकेंतील हिंदी जनतेची राजकीय दीन दशा दूर करण्याच्या कर्तव्याकडे वळल्यानंतर त्यांनीं पुढारीपणाची विद्या संपादन केली. अन्यायाचा निषेध, त्याविरुद्ध वरिष्ठाकडे अर्ज व शिष्टमंडळें पाठविणें, स्वतंत्रपणें आपल्या स्थितीविषयीं इतरेजनांत सहानुभूति उत्पन्न करणें, या पद्धतीचा प्रयोग वाया जातो असें दिसतांच, गांधींनीं निःशस्त्र-प्रतिकाराचा उपाय अंमलांत आणला. निःशस्त्रप्रतिकाराला गांधींनीं 'सत्याग्रह' असें नांव दिलें आहे. सविनय कायदेभंग हें या उपायाचें आणखी एक नांव आहे. हें नांव ऐकतांच कांहीं युरोपियन गृहस्थांचें स्मरण होणें स्वाभाविक आहे. सविनय कायदेभंग [ Civil disobedience ] या शब्दाचा प्रणेता थोरो हा अमेरिकन होता. पुढें निःशस्त्रप्रतिकाराची भाषा टॉलस्टायच्या उपदेश-संग्रहांत व लोकांच्या परिचयक्षेत्रांत आली. गांधींनीं हें ऋण कबूल केलेलें आहे. त्यांचा अर्थशास्त्राचा गुरु रस्किन असल्या-चेंहि लोकांना माहित आहे. हीं तत्त्वें याप्रमाणें युरोपियन इसमांच्या विचारसृष्टींत जन्मलेलीं असलीं तरी त्यांना गांधींनीं अस्सल देशी रूप देऊन त्यांची परंपरा प्राचीन भारतीय इतिहासापर्यंत नेलेली आहे. प्रल्हाद, रामचंद्र हे सत्याग्रही पुरातन प्रवर्तक होत, असें गांधीजी सांगतात. मनुष्याला आपलें जीवित निर्दोष व उन्नत करावयाचें असेल तर त्याला सत्याग्रह हा एकच उपाय असून तो सर्व-व्यापी आहे, असें गांधींचे 'निश्चितं मतमुत्तमम्' आहे.

### गांधींचें अनन्य साधारण व्यक्तिमत्व

दक्षिण आफ्रिकेंत त्यांनीं जी चारित्र्यविषयक तपश्चर्या केली, तिची तुलना करण्यासारखी व्यक्ति अर्वाचीन हिंदी इतिहासांत एकहि सांपडणें कठीण आहे. सामान्यतः चारित्र्याची उज्ज्वलता पैशाच्या व स्त्रियांच्या बाबतींतील निरपवाद वर्तनाच्या कसोटीवर ठरविण्याची रीत आहे. टिळ-कांच्या शीलाची परीक्षा प्रायः या दोन गोष्टींनींच केली जात असते. परंतु गांधींनीं चारित्र्यशुद्धीची व्याख्या अतिशय विशाल मानली असून त्या व्याख्येप्रमाणें आचरण करण्याचा त्यांचा यत्न अहर्निश अव्याहतपणें

चालत असल्यामुळें त्यांच्याशीं त्यांच्या कट्ट्या विरोधकांनाहि निराळ्या रीतीनें वागावें लागतें. सत्य, अहिंसा, ब्रह्मचर्य, अस्तेय, अपरिग्रह इत्यादि धर्मतत्त्वांची जर आजच्या युगांत चालतीबोलती मूर्ति पहावयाची असेल तर गांधींचें दर्शन घ्यावें अशी अनन्यसाधारण योग्यता फार मोठ्या जनसंख्येनें त्यांना दिलेली आहे. [ या जनसंख्येंत बुद्धि, विद्वत्ता, संपत्ति, कर्तबगारी या दृष्टीनें अतिशय थोर योग्यतेचीं माणसें आहेत व तीं देशोदेशींचीं आहेत, हें ध्यानांत ठेवणें बरें ! ] कुणालाहि शत्रु समजावयाचें नाहीं, आपल्याशी द्वेषानें किंवा वैरानें वागणाराबद्दल कधींहि चुकूनसुद्धां अपशब्द उच्चारावयाचा नाहीं, स्वतःचें मनोगत झांकून ठेवावयाचें नाहीं, विरोधकाशींदेखील मित्राच्या प्रेमळपणानें व्यवहार करावयाचा, आपणांस पूर्ण विचारांतीं जें इष्ट, उचित व अवश्य वाटेल त्याचें बेधडक आचरण करावयाचें, त्या संबंधांत लोकांच्या मताची चांचपणी करीत मागें पुढें पाहावयाचें नाहीं; चूक झाली असें वाटल्यास ती आपल्या मागील प्रतिष्ठेची दरकार न बाळगतां सपशेल कबूल करावयाची, अशा किती तरी गोष्टी गांधींच्या चारित्र्याचा व शीलाचा विचार करतांना सहज डोळ्यांपुढें येणाऱ्या आहेत. चारित्र्यसंवर्धनांत या गोष्टींचा कटाक्षानें अंतर्भाव करणारा दुसरा हिंदी पुढारी [ रानडे, गोखले सोडल्यास ] चटकन् तर नाहींच,पण प्रयत्नानें-सुद्धां दिसेल कीं नाहीं याची शंका वाटते.

## लोकमान्य आणि महात्मा साम्य–विरोध

टिळक व गांधी यांच्यांतील तारतम्याचा निर्णय करतांना कांहीं बाबतींत या दोघांचा सारखेपणा वाटतो. पण तो वरवरचा ठरतो हें ध्यानांत येणें अवघड नाहीं. गांधी व टिळक हे दोघेहि गीतेचे भक्त हा त्यांच्यांतील सारखेपणाचा एक पुरावा म्हणतां येईल. परंतु एकानें ‘ शठाशीं देखील सत्यानें वागावें ’ असें गीतेचें तात्पर्य स्वीकारलें तर दुसऱ्यानें ‘ शठाशीं शाठ्यानें वागावें ’ असें त्याच ग्रंथाचें रहस्य ग्रहण केलें. टिळकांचा व गांधींचा यासंबंधांतला १९२० सालांतील खटका पुष्कळांच्या ध्यानांत असेल. रहाणीचा साधेपणा हें दोघांतील साम्याचें आणखी एक लक्षण दाखविणें शक्य आहे. परंतु या साम्याच्या देखाव्यामागें जसा दृष्टि नेली कीं दोघांतला फरकच जास्त उत्कट वाटूं लागतो. उदाहरणार्थ टिळक व

गांधी यांच्या धार्मिकतेचा विचार करावा. टिळक ब्राह्मण्याचीं संध्यादि कृत्यें नियमानें प्रति दिवशीं वेळच्या वेळीं करीत होते कीं नव्हते याबद्दल शंका आहे. पण गांधींची सकाळसंध्याकाळची प्रार्थना कधींहि चुकत नाहीं. अशाच आणखी कांही गोष्टी सुचणाऱ्या आहेत. गांधींनीं पोशाखाचे प्रयोग करतां करतां आतांचा पोशाख कायम केला आहे. टिळकांनीं एकदां जो पेहराव घेतला तोच जन्मभर कायम ठेवला. टिळकांची खाण्यापिण्याची व्यवस्था निराळी नव्हती. गांधी आहाराचेहि प्रयोग करीत असतात. शरीर ही ईश्वरानें दिलेली ठेव आहे. तिची जास्तींत जास्त कार्यक्षमता दीर्घकाल टिकून रहावी, हा त्यांचा आहाराच्या प्रयोगामागील हेतूहि प्रसिद्ध आहे. टिळक पुणें शहरांत चारचौघा सुखवस्तु गृहस्थांच्या धर्तीनें एका जुन्या वाड्यामध्यें रहात होते. गांधींनीं सत्याग्रहाश्रम नदीच्या कांठीं नव्या जागीं स्थापून त्यांत वस्ती केली. गरीब हिंदी शेतकरी ज्या पद्धतीनें आपलें आयुष्य घालवितो त्या पद्धतीचा गांधींनीं अवलंब केला. इतकेंच नव्हे तर आपल्या वागणुकीची जवळच्या लोकांनाहि दीक्षा दिली. टिळकांनीं कधीं आपल्या अनुयायी परिवारानें आपल्या रहाणीचा कित्ता गिरवावा अशी अपेक्षा धरली नव्हती. हिंदी गिरण्यांतून निघणाऱ्या मालाला 'स्वदेशी' मानून टिळक स्वस्थ राहिले तर गांधींनीं हातकांतणीच्या व हातविणीच्या खादीची जोड देऊन 'स्वदेशी'च्या कल्पनेला जास्त भरीवपणाचें वजन आणलें. टिळकांनीं सामाजिक सुधारणेच्या कार्याविषयीं औदासिन्य धारण केलें तर गांधींनीं सामाजिक सुधारणेचीं जुनीं कामेंहि उचलून धरलींच, पण नवीं हाताशीं घेऊन उजागरीला आणलीं. काँग्रेस व सामाजिक सुधारणा यांना अलग ठेवण्याचा टिळकांचा अट्टाहास होता. गांधींनीं काँग्रेसच्या राजकारणांत सामाजिक, औद्योगिक अशा सर्व तऱ्हेच्या सुधारणांच्या कल्पना आणून सोडल्या. बुद्धिमान्, ध्येयवादी तरुणांनीं स्वार्थत्यागाच्या बाण्यानें देशाच्या कार्यास वाहून घ्यावें, अशी तळमळ वेळोवेळीं टिळकांनीं व्यक्त केली, तर गांधींनीं अशा बाण्याच्या शेंकडों नव्हे हजारों तरुणांना (वृद्धांनासुद्धां) देशसेवेस जुंपलें. टिळकांनीं देशांतील असंतोष वाढता ठेवला असला तर गांधींनीं त्याला पाट फोडून वहाता केला व त्याच्या जोरावर देशकार्यांची अनेकविध लागवड अंमलांत आणली.

## अहिंसेसह कायदेभंग

गांधी हिंदुस्थानांत आले ते बरोबर दक्षिण आफ्रिकेंतील कामगिरीची भरीव कीर्ति घेऊन आले. ही कीर्ति त्यांनीं ज्या शास्त्राच्या व तंत्राच्या द्वारें संपादन केली तें शास्त्र व तंत्र त्यांच्या बरोबर होतेंच. यामुळें त्यांना हिंदुस्थानात आपलें निशाण उभारून त्याच्यासाठीं माणसें गोळा करण्याला विलंब सोसावा लागला नाहीं. प्रजेची गांजणूक किंवा नड जेथें दिसेल तेथें उपस्थित होऊन तेथील प्रजेला प्रतिकारार्थ सिद्ध करावयाचें असा पुरुषार्थ त्यानीं आरंभिला. त्यांतलीं कांहीं कामें स्थानिक स्वरूपाचीं होतीं. तर कांहीं जास्त भौगोलिक व्यापाचीं होतीं. सरळ अर्ज-शिष्टाईच्या मार्गांनीं दुःख मिटत नाहीं असें दिसतांच दुःख निर्माण करणारे कायदेकानू धाब्यावर बसवावयाचे, त्यापायीं कायदेकानूच्या पुरस्काराची दडपशाही निमूटपणें सोसावयाची, या शिकवणीचे धडे गांधींनीं, स्वतः पुढाकारानें दडपशाहीच्या क्लेशांत शिरून, लोकांना पढविण्याला आरंभ केला. कायदेभंग हा धोक्याचा मार्ग आहे. सरसकट कायदे मोडीत सुटल्यास देशांत अव्यवस्था माजेल म्हणून कायदेभंगाचें शासन तावडतोब भोगण्याचीहि जबाबदारी त्यांनीं कायदे मोडणारावर लादली व एकप्रकारें अव्यवस्थेचा धोका कमी केला. अहिंसा हें कायदेभंगाचें आणखी एक जबरदस्त पथ्य त्यांनीं या इलाजाबरोबरच लोकांच्या मागें लावून दिलें.

## महात्मा गांधींचा सर्वदेशी विचार

वर जें गांधींचें शास्त्र म्हटलें तें केवळ पुस्तकी ज्ञानाचें नाहीं. तें त्यांच्या नानाविध अनुभवांच्या मननातून निघालेलें शास्त्र आहे. त्या शास्त्रावर अलीकडे इतिहासाचे आधार दाखविणारीं पुष्कळच भाष्यें झालेलीं आहेत. तंत्राची उभारणी त्यांच्या अनुभवांतूनच झालेली आहे. आपलीं प्रमेयें सिद्ध करणारा तीक्ष्ण तर्कवादहि त्यांच्या बुद्धीनें सिद्ध केलेला आहे. अहोरात्र त्यांचा विचारविनिमयच चाललेला असतो. पुनः हा विचारविनिमय एकदेशी नसतो. त्यांच्या विचारविनिमयाचा दरबार सर्व प्रकारच्या प्रश्नांना सदैव खुला असतो, हें ज्यांनीं त्यांच्या अफाट लिखाणावर नजर टाकली असेल त्यांना सांगायला नको. आपल्या शारीरिक व मानसिक व्यापारांचा अजस्र

पसारा आवरण्याची व जरूरीप्रमाणें वेळच्या वेळीं कामें उरकण्याची शक्ति त्यांच्या ठिकाणीं आहे. त्याच्या अनुभवांची विविधता विलक्षण असून तितक्या अनुभवांचीं राजसुखें किंवा प्राणांतिक दुःखें पाहिलेला पुरुष हिंदी पुढाऱ्यांत दुसरा कोणीच नाहीं असें म्हटल्यास, वस्तुस्थितीशीं अप्रामाणिक झाल्याचा दोष घडणार नाहीं असें वाटतें.

## देशदुःखनिवारण हाच गांधींचा उत्सव

हिंदुधर्माच्या उच्च तत्त्वांचा गांधींचा अभिमान सक्रिय असला तरी ज्याला 'सनातनी' वळणाचें राष्ट्रीयत्व म्हणतां येईल तसें वळण त्यांच्या अभिमानांत मुळींच नाहीं. सनातनी म्हणविणारीं माणसें हिंदु धर्मांतील सण, वार, तिथी, उत्सव इत्यादिकांचा गौरव बोलण्यात धन्यता मानतात. आपल्या धर्माचें सारसर्वस्व या प्रकारांत सांठविलेलें असून त्याच्या द्वारें समाजाची संघटना होऊं शकेल, असा समज या वर्गांत आढळतो. गांधी या प्रकाराकडे बिलकुल पाहात नाहींत. हिंदुस्थानांत आल्यावर महाराष्ट्रांतील शिवाजी, गणपति यांच्या उत्सवासारखे उत्सव त्यांनीं आपल्या कामासाठीं धरले नाहींत किंवा सुरू केले नाहींत. राम-कृष्णजयंति किंवा दिवाळी, दसरा असले सण चळवळीला मदत करतील अशी भावना मनांत येऊं दिली नाहीं. वैष्णव तत्त्वज्ञानाचा पाढा त्यांच्या दैनिक प्रार्थनेंत वाचला जातो. परंतु एकादशी, शिवरात्र, प्रदोष, तीर्थयात्रा, श्राद्धसंकल्प, प्रायश्चित्तें या विधींना त्यांच्या व्यवहारांत थारा नाहीं. हिंदुस्थान परतंत्र आहे. त्यांतील जनतेचीं दुःखें अनंत आहेत. त्या दुःखांच्या निवारणाचा यत्न हाच गांधींचा उत्सव असून त्यासाठीं हवीं तेवढीं माणसें गोळा होतात. आपलींच दुःखें नाहींशीं करावयाचीं असल्यानें उत्साह किंवा श्रमसातत्य या गुणांची साहजिकच उणीव पडत नाहीं. राजकीय दुःखाच्या निवारणाचा उद्योग हें एक पराक्रमाचें क्षेत्र असल्यानें त्यावर चालू राज्यव्यवस्थेसारख्या बलाढ्य प्रतिपक्षाबरोबर झटापटी करणाराला योजकता, साहस, धैर्य, कंटकपणा, सहकारिता, इत्यादि गुणांच्या विकासाचा लाभ आपोआपच घडतो. वाचाळतेऐवजीं कर्तृत्वाचीं आवड वाढते. गांधींनीं असले उद्योग आपल्या प्रेरणेनें उत्पन्न करून त्या उद्योगांच्या मैदानावर लक्षावधि माणसांचे जमाव जुटीच्या शिस्तीनें खेळविलेले आहेत. असे जमाव

उभारून प्रतिकूल राज्यव्यवस्थेच्या सामर्थ्याशीं त्यांना झुंजवीत असतांना गांधी ह्या जमावापासून दूर नसतात. लोकांच्या सुखदुःखाशीं समरस होऊन त्यांच्या जमावांत रहावयाचें, जमावापेक्षां वेळ पडल्यास जास्त श्रम करावयाचे, जमावाच्या चुका ह्या आपल्याच चुका अशा एकजीवाच्या भावनेनें त्या चुकांचें प्रायश्चित्त भोगायला आघाडी मारून सादर व्हावयाचें, असा त्यांचा पुढारीपणा आहे. देशांतील राजकीय पारतंत्र्याविरुद्ध लोकांना उठावणी करून लढवितांना अहिंसा, सत्य वगैरे सद्‌गुणांची शिस्त लोकांनीं चोख रीतीनें पाळली पाहिजे. या गांधींच्या श्रद्धामूलक अपेक्षेची मीमांसा केल्यास ते हिंदी जनतेच्या माणुसकीची सुधारणा करूं इच्छिणारे एक महान् ध्येयवादी सत्पुरुष आहेत, याचा बोध होण्याला उशीर लागत नाहीं.

### राजकारणाचे प्रेरकत्व

अर्वाचीन संस्कृति हें ज्या परिस्थितीला नांव दिलें जातें तिनें माणुसकीचा भ्रष्टाकार मांडला आहे, असा गांधींचा ठाम सिद्धान्त प्रसिद्ध आहे. माणसाचें पारतंत्र्य हें केवळ बाहेरच्या कारणांनीं उत्पन्न होत नाहीं. माणसाच्या स्वभावांतले दोष, ही पारतंत्र्याची खरी बळकटी,या स्वभावदोषांतच असते, असा त्यांचा दुसरा सिद्धान्त आहे. हिंदी माणुसकीची गांधींनीं परीक्षा केली तेव्हां त्यांना दिसून आलें कीं, हिंदी जनता बाहेरून जरी पाश्चात्यांच्या संगतीनें व शिक्षणानें निराळी दिसली तरी तिचें अंतःकरण जुन्या कल्पनांचाच आदर करणारें आहे. शहरांतील कांहीं लोक युरोपियन इतिहासाचे, तत्वज्ञानाचे व अर्थशास्त्राचे अभ्यासी असले तरी शहराबाहेरील जनता गीता, भागवत, रामायण, भारत, तुलसीकृत रामचरितमानस, सूरसागर, ज्ञानेश्वरी, गुरुचरित्र यांचीं पारायणें करून मानसिक समाधान प्राप्त करून घेणारी आहे. प्राचीन स्वार्थत्यागाच्या म्हणजे वैराग्याच्या अर्थात् शारीरिक व मानसिक गरजा शक्य तेवढ्या कमी करण्याच्या कल्पनेला हिंदी जनता मानते, असें त्यांना दिसून आल्यामुळें त्यांनीं युरोपियन संस्कृतीचीं सारीं लक्षणें आपल्या व्यवहारांतून झाडलीं. वाड्याऐवजीं निवाऱ्यापुरती झोंपडी; टेबल खुर्च्यांऐवजीं बसकरें व बैठी मेजें; पलंगाऐवजीं खाटा; कोट, ज्याकिट, पाटलुणीऐवजीं देह झांकेल इतकींच धोतर सदऱ्यासारखीं वस्त्रें; फेटापागोट्याऐवजीं टोपी; असे प्रकार गांधींच्या कारभारांत दिसतात. याचें मूळ जुन्या हिंदी

संस्कृतीमधील स्वावलंबनाच्या तत्त्वाकडे लोकांना नेण्याच्या महत्त्वाकांक्षेत आहे. टिळकांच्या पोषाखांतला साधेपणा, त्यांच्या तरुणपणीं क्वचित् शिल्लक असलेल्या जुन्या शिष्टाचाराचा दर्शक होता. गांधींनीं प्राचीन स्वावलंबनमूलक देशाचारांतून आपल्या पोषाखाचा साधेपणा निवडलेला आहे. टिळकांनीं विलायतेस आपल्या पोषाखांत बदल केला. पण गांधी आपल्या चालू पोषाखांतच विलायतेस गोलपरिषदेच्या वेळीं राहिले, इतकेंच नव्हे तर बादशहासहि भेटले. पोषाख सोडल्यास टिळकांच्या घरांत युरोपियन थाटाचीं टेबलें, खुर्च्या, कोचें, पलंग, इत्यादि वस्तूंना मजाव नव्हता असें ध्यानांत येईल. दोघांच्या स्वदेशीचा हा भेद लक्षांत घेणें चांगलें. येथें एक इषारा मुद्दाम देऊन ठेवणें जरूर आहे. 'देशी' या शब्दाच्या उच्चारासरसें जे तरंग मनांत उठतात, त्यांचा मागमूसहि गांधींच्या या कारभारांत सांपडणार नाहीं. 'देशी' हा शब्द अव्यवस्थितपणाला लावला जातो. वक्तशीरपणाचा अभाव म्हणजे देशीपणा; हयगय, दिरंगाई, चालढकल, हलगर्जीपणा, यांचें समर्थन 'देशी' या एका शब्दानें केलें जातें. जें ओबडधोबड, अस्ताव्यस्त, बेडौल, खरखरीत, राकट, अस्वच्छ, बावळट, बेशिस्त, त्याचा बोध 'देशी' या शब्दानें होतो व त्याच शब्दानें या दुर्गुणावर सारवण घालून त्याची क्षम्यताहि सुचविली जाते. परंतु गांधींच्या 'देशी' कारभारांत असला कोणताच दोष राहूं न देण्याची खबरदारी शक्य तेवढ्या कडकपणानें घेतली जाते. दुर्दम्य उत्साह, विलक्षण तडफ, विस्मयकारी उरक, कांटेतोल वक्तशीरपणा, अविश्रांत कर्तव्यतत्परता, उत्कट दक्षता, अटळ आशावाद, कुशल योजकता, जबर चिकाटी, दुर्धर तार्किकता, कमालीचा सोशिकपणा इत्यादि गांधींच्या स्वभावांतील सद्गुण पाहिल्यास त्यांच्या ठिकाणीं अर्वाचीन युरोपियन सद्गुणांचें व परंपरागत भारतीय सद्गुणांचें कसें सुंदर मिश्रण झालें आहे, याची कल्पना होण्याला हरकत नाहीं. याचा एक परिणाम असा स्पष्ट दिसतो कीं, गांधींच्या पूर्वीं हिंदी राजकारणाचें प्रेरकत्व (initiative) इंग्रज राज्यकर्त्यांकडे होतें. ही स्थिति जाऊन आतां तें गांधींच्या पुढाकारानें कॉंग्रेसकडे आलेलें आहे. ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या हातून अनिष्ट कृत्यें घडलीं कीं, हिंदी पुढाऱ्यांनीं त्याची प्रतिक्रिया अंमलांत आणावी, असें पूर्वींचें

हिंदी राजकारणाचें स्वरूप होतें, तर आतां गांधी व कॉंग्रेस काय करतील इकडे राज्यकर्त्यांना डोळे लावून बसावें लागतें. राजकारणाच्या प्रगतीचा हा फरक ध्यानांत घेतला नाहीं तर गांधींजी व टिळक अथवा इतर पुढारी यांची तुलना योग्य रीतीनें करतां यावयाची नाहीं.

## एक राष्ट्रीयत्वाचा आदर्श

राष्ट्र या दृष्टीनें अवश्य असलेला एकजिनसीपणा हिंदुस्थानांत धर्म, पंथ, आचार, जात यासारख्या घटनांतील भेदामुळें नष्ट झाला असून त्याचें कारण परक्यांचें आक्रमण हेंच फक्त खास नव्हे, अशी गांधींजींनीं आपल्या मनाशीं खूणगांठ बांधून आपल्या उद्योगाशीं या घटनांचा संपर्क त्यांनीं येऊं दिला नाहीं. उद्यांच्या स्वराज्यांतील हिंदी नागरिक कसा असावा, याचा मनाशीं निश्चय करून तशा नागरिकत्वाचें शिक्षण तें आपल्या कार्यानें व शिकवणीनें हिंदी जनतेला देत आहेत.

## स्वराज्य हवें तें स्वकष्टाचें !

त्यांनीं आपल्या राजकीय पुरुषार्थाचा पाया अशाच विचारसरणीनें बनविलेला आहे. ब्रिटिश राजकर्तृत्व एखाद्या युरोपियन किंवा आशियांतील राष्ट्राच्या बलाढ्यतेपुढें कमकुवत ठरण्याचा योग उत्पन्न व्हावा आणि मग आपण उठावणी करून ब्रिटिशांचें वर्चस्व संपुष्टांत आणावें, जोंवर ब्रिटिश राज्यकर्तृत्वाला बाहेरून धक्का बसण्याचा संभव नाहीं, तोंवर हिंदी राजकीय चळवळींना यश लाभण्याची आशा नको, असले विचार गांधींच्या मनाला कधीं शिवूनसुद्धां जात नाहींत. ब्रिटिशांचें हिंदुस्थानांतील राज्यकर्तृत्व कितीहि मजबूत असलें तरी त्याचें खरें बळ हिंदी जनतेची स्वाभिमानशून्य निष्क्रियता हेंच होय असा खणखणीत अभिप्राय त्यांच्या शिकवणींत भरपूर दिसतो. क्षुद्र स्वार्थाच्या मोहानें हिंदी जनता आपली बुद्धि, शक्ति, विद्या वगैरे गुण ब्रिटिश राज्यकारभारांत वेंचीत आहे; राजकीय पारतंत्र्याला पुष्ट करणारा स्वार्थ हिंदी लोकांनीं लाथाडल्यास त्यांचें स्वराज्य दूर नाहीं, असें गांधीजींनीं कितीदां तरी मोठ्या कळकळीनें निदर्शनास आणलेलें आहे. स्वार्थ सुटावा म्हणून त्यांनीं असहकारितेची चळवळ सुरू केली होती.

लोकांनीं सामर्थ्यसंपन्न होऊन ब्रिटिशांचें आपल्यावरील वर्चस्व उठवावें, असें न झाल्यास म्हणजे कांहीं अडचणीमुळें ब्रिटिशांना हिंदुस्थानांतून जावें लागल्यास हिंदी जनतेला सहज मिळणारें स्वातंत्र्य टिकणार नाहीं; असें गांधीजींनीं कैकदां हिंदी जनतेला बजावलेलें आहे. कमाई आपल्या कष्टाची असेल तरच ती आपल्या हातीं राहील... दुसऱ्याची मात्रा तिसऱ्याच्या (आपल्या नव्हे) पराक्रमानें चालेनाशी झाल्यावर किंवा दुसऱ्याच्या मेहरबानीनें घडणारा लाभ आपल्या हातीं सदैव राखण्याची पात्रता बहुधा आपल्या ठिकाणीं असत नाहीं. इकडे लक्ष देऊन ते लोकांना आपलें बळ वाढविण्याचा उपदेश करीत असतात. प्रतिपक्षी अडचणींत सांपडल्यास त्याला अडवून आपल्या पोळीवर तूप ओढण्याची गांधींची प्रवृत्ति नाहीं. द. आफ्रिकेंत एकद त्यांनीं राज्यकर्त्यांच्या सोयीसाठीं आपली चळवळ सोडून दिल्याचें उदाहरण प्रसिद्ध आहे.

## गांधींची जागतिक कीर्ति

सगळ्या जगांतील माणसें आपापल्या राष्ट्रीय उद्धारार्थ ज्या उपायांची कास आज कित्येक शतकें धरीत आली, त्या उपायांचा गांधींजींनीं राजरोस धिक्कार चालविल्यावर सगळ्या जगाचें लक्ष त्यांच्याकडे वेधावें आणि जिज्ञासूंनीं आश्चर्यामुळें त्यांच्या शिकवणीचा अभ्यास करूं लागावें यांत आश्चर्य नाहीं. टिळकांची महती जास्तींत जास्त हिंदुस्थानांतच फैलावली होती. गांधींजींचे गुरू ना. गोखले यांची ख्याति हिंदुस्थानाबाहेर ब्रिटिश साम्राज्यांत पसरलेली होती. गांधींजीनीं आपल्याविषयींचें कुतूहल साऱ्या जगांत उत्पन्न केलेलें आहे. गांधींजीबद्दलची देशदेशांतरांतील व्यक्तिविषयक जिज्ञासा हिंदी राष्ट्राच्या उपयोगी पडत आहे, हें निराळें समजावून द्यायला नको. अलाहाबादचे सर सी. वाय्. चिंतामणि हे गांधींचे अनुयायी नव्हते, याबद्दल कोणीच शंका घेणार नाहीं. त्यांच्या तोंडून ऐकलेली एक गोष्ट येथें नमूद केल्यास वरील विषय आणखी स्पष्ट होईल. पहिल्या गोलमेज परिषदेहून स्वदेशी परत आल्यावर मुंबईच्या मुक्कामांत चिंतामणींना भेटण्याकरितां एक बडे नेमस्त तरुण गृहस्थ आले व त्यांनीं संवादाच्या ओघांत प्रसंग साधून गांधींना शिव्या देण्याची आपली होस भागवून

घेतली. आपल्याला या कामगिरीबद्दल चिंतामणीकडून शाबासकी मिळेल अशा अपेक्षेनें ते बोलतांना चिंतामणीकडे पाहात होते. त्यांचें बोलणें बंद होतांच चिंतामणींनीं उद्वेगपूर्वक आपलें मनोगत पुढीलप्रमाणें व्यक्त केलें— " कुणीहि अविचारानें जीभ टाळयाला पोंचवून गांधींबद्दल वेडावाकडा शब्द काढावा इतका तो क्षुद्र पुरुष आहे, असें समजणारांना जगाच्या वातावरणाचें ज्ञान नाहीं, असेंच म्हटलें पाहिजे. नुकताच मी गोलमेज परिषदेहून स्वदेशीं परत येत असतांना आलेला अनुभव सांगतों, म्हणजे गांधीजींनीं आपल्या थोरवीनें हिंदुस्थानाचा मान जगाच्या इतर राष्ट्रांत किती वाढविला आहे याची कल्पना येऊन त्यांच्या प्रत्येक निंदकाला आपल्या मताची फेरतपासणी करावी लागेल. मी फ्रान्स, जर्मनी, इटाली, या देशांतून आलों. माझ्याकडे पाहून मी हिंदी आहें अशी ओळख पटतांच जो तो माझ्याजवळ आस्थेनें येऊन गांधींची हाल-हवाल विचारी व त्याबरोबर सहजच हिंदुस्थानांतील ब्रिटीश राज्यकर्त्यांची नालस्ती बोलून टाकी. ज्याच्या मागें प्रचंड फौजफांटा नाहीं, केवळ शरीर सावरण्याकरितां जें कांहीं हातांत असेल तेंच ज्याचें शस्त्र, ज्यानें लष्करी दिग्विजय केलेला नाहीं, अशा अगदीं एकाकी पुरुषानें जगाचें लक्ष आपल्या देशाकडे वेधून घ्यावें, यावरून गांधींची योग्यता ध्यानांत येण्याला हरकत नाहीं. बोलतांना चिंतामणींचा गळा पुढें पुढें दाटत गेला व ऐकणारांचा चेहरा उतरला.

# सत्य आणि अहिंसा : : : ४

गांधीजींनीं हिंदी राजकारणाला अगदीं नवें वळण [ अज्ञातपूर्व असें वळण] लावलें, ही गोष्ट अगदीं निर्विवाद आहे. त्यांनीं काँग्रेस १९२० सालीं नागपुरास जिंकली व तेव्हांपासून आजतागायत काँग्रेसच्या द्वारें किंवा काँग्रेसच्या विश्वासाचे अद्वितीय पुढारी म्हणून ते हिंदी राजकारणाचे प्रश्न सोडवीत आहेत. गांधींनीं राजकारणाला नवें वळण लावतांना कित्येक तत्त्वें स्वीकारलीं असून त्यांतल्या दोन तत्त्वांविषयीं पुष्कळ ठिकाणीं मतभेद उपस्थित झाल्याचें आपण पाहातों. सत्य व अहिंसा हींच तीं तत्त्वें होत. हीं दोन्हीं नांवें सारखींच वादग्रस्त असून सामाजिक उन्नतीच्या दृष्टीनें सारखींच महत्त्वाचीं आहेत. त्या संबंधींचा वाद आजकालचा नवा नाहीं. हीं तत्त्वें जितकीं जुनीं तितका त्यांच्या आचरणाबद्दलचा वादसुद्धां जुनाच आहे. पण त्यामुळें त्यांचें महत्त्व कमी होत नाहीं. गांधींनीं या तत्त्वांच्या स्वीकारानें हिंदी राजकारण चालावें असा आग्रह धरतांना जगाच्या इतिहासाचें किती परिशीलन केलें हें सांगणें शक्य नसलें तरी मानवी स्वभावाची त्यांनीं अत्यंत सूक्ष्म परीक्षा केली असली पाहिजे असें विचार करणारांना पटायला हरकत नाहीं. मानवी स्वभावांत जर या तत्त्वांचीं बीजें असतील तर त्यांच्या स्वीकारानें गांधींनीं कांहीं विलक्षण प्रकार हिंदी राजकारणांत मांडलेला नाहीं, याचें निराळें विवेचन नको.

## महात्माजींचें राजकारण १९१९–४२

गांधींनीं काँग्रेसचीं सूत्रें आपल्या हातीं घेण्यापूर्वीं तीन चार वर्षें कित्येक दिव्यें करून दाखविलीं. सत्याग्रहाचे त्यांनीं प्रयोग केले व १९१९ सालीं रौलट कायद्याच्या वेळीं त्यांनीं अखिल भारतीय आंदोलन उठवून एक

नवसामर्थ्य उदयास येत असल्याबद्दल जनतेची व सरकारची खात्री पटविली. या सत्याग्रहामागें कॉंग्रेसचा पाठिंबा नव्हता. त्यांनीं केवळ स्वतःच्या जबाबदारीवर त्याची प्रचंड उठावणी केली. उठावणीच्या परिणामीं कॉंग्रेसला या सत्याग्रहाशीं संबंध जोडावा लागला. या सत्याग्रहानें लोकांच्या असंतोषाची व गांधींच्या लोकप्रियतेची परीक्षा झाली. सत्याचा आग्रह अहिंसेनें साधण्यांत उणीवा दिसून आल्यामुळें गांधींनीं सत्याग्रह आवरला, आपली चूक जाहीर केली. पण सरकारनें याबाबत योजलेल्या उपायांतील अन्याय जगासमोर ओढून आणायला त्यांनीं मागें पुढें पाहिलें नाहीं. जालियनवाला बागेंतील लष्करी गोळीबाराचा अत्याचार सरकारतर्फे खुबीदार शब्दाची मखलाशी लढविली गेली तरी झांकला जाण्यासारखा नव्हता. गांधींनीं कॉंग्रेसमार्फत सदर व इतर आनुषंगिक अत्याचारांची चौकशी करविली. परंतु कॉंग्रेसचा पुढारीपणा या वेळीं गांधींकडे नव्हता. १९१९ मध्यें अमृतसरला भरलेल्या कॉंग्रेसच्या अधिवेशनांत गांधी अग्रेसरत्वानें वागले नाहींत, हें प्रसिद्धच आहे. १९२० च्या ऑगस्टमध्यें त्यांनीं असहकारितेच्या चळवळीचें शिंग फुंकलें. सप्टेंबरांत कॉंग्रेसचें जादा अधिवेशन भरलें तेव्हां त्यांचाच विजय झाला. १९२० च्या डिसेंबरांत नेहरूंचें अधिवेशन भरल्यावेळीं दासनेहरूसारखीं आधीं किंकर्तव्यमूढ दिसणारीं माणसें पूर्णपणें गांधींच्या पुढाकाराखालीं गेलीं. गांधींनीं दोन वर्षें असहकाराच्या चळवळीनें देश हादरून सोडला व लोकजागृतीकडून पराक्रम घडविण्यासाठीं बारडोली तालुक्यांत सारावंदीच्या प्रयोगाचें ठाण मांडलें. हा प्रयोग अंमलांत येण्यापूर्वीच चौरीचौरा येथील हत्याकांडामुळें गांधींना तीं गुंडाळून टाकण्याची आवश्यकता भासली. लोकांमध्यें निराशा पसरली व सरकारनें त्यांना राजद्रोहानिमित्त खटला भरून सहा वर्षांची कैद फर्मावली ! त्यांच्या गैरहजेरींत कॉंग्रेसच्या अनुयायांमध्यें दुफळी होऊन दास–नेहरूंच्या पक्षाची सद्दी उंचावत असल्याचा अनुभव आला.

सहा वर्षें पुरी होण्याच्या आधींच गांधी १९२४ मध्यें अवघ्या दोन वर्षांनीं सुटले. दास–नेहरूंच्या राजकारणाला मैदान खुलें सोडून गांधींनीं खादीच्या कार्यास स्वतःला वाहून घेतलें. दास–नेहरूंचें राजकारण १९३० पर्यंत चाललें होतें. गांधींनीं या पांचसहा वर्षांत खादी–चरख्याची संघटना

भक्कम बनविली. १९३० मध्यें कायदेभंगाच्या चळवळीचें तुफान गांधींच्या नेतृत्वानें उठलें. गांधी पुनः तुरुंगांत पाठविले गेले. पण आतां त्यांचें तुरुंगांतूनदेखील राजकारणाला गति देण्याइतकें सामर्थ्य वाढलें होतें. १९३२ मध्यें त्यांनीं हरिजनवर्ग हिंदु समाजांतून फुटून जाऊं नये म्हणून केलेला यशस्वी उपवास त्यांच्या सामर्थ्याची साक्ष देणारा आहे. १९३३ मध्यें त्यांची सुटका झाली. कॉंग्रेसचें राजकारण पुढाऱ्यांच्या तुरुंगवासामुळें व इतर दडपशाहीमुळें मंदावल्यासारखें झालें होतें. कायदेमंडळाचा मोह न आवरणारा वर्ग कॉंग्रेसमध्यें कायमचाच आहे. गांधींनींच त्याविषयीं या-प्रमाणें एकदां अभिप्राय दिला होता. या वर्गानें कायदेमंडळांत जाण्याची उत्सुकता दाखविण्याचें काम चालू ठेवलें होतें. गांधी त्यांच्या उत्सुकतेआड आले नाहींत. त्यांची वाट कॉंग्रेसच्या मान्यतेनें मोकळी झाली. इतक्यांत राज्यसुधारणांचा नवा कायदा पसार होऊन कायदेमंडळवाल्यांना राज्याधि-कार घेण्यांत पुरुषार्थ असल्याची जाणीव झाली व निवडणुकीनंतर थोडा विलंब लावून त्यांनीं आपली जाणीव क्रियेंत उतरविली. गांधी या काळांत हरिजनांच्या व खेड्यांच्या उद्धाराचें कार्य करूं लागले होते. १९३९ मध्यें नव्या महायुद्धाचा वणवा पेटतांच कॉंग्रेसनें राज्याधिकार सोडला, कारागृह-वासाचा रस्ता धरला ! १९४२ सालच्या ऑगस्टपासून कालपरवांपर्यंत काय घडलें याचा वृत्तान्त अगदीं ताजा म्हणून सर्वांच्या परिचयाचा आहे. १९२० च्या नंतर गांधींनीं हिंदी जनतेची किती प्रकारें सेवा केली याचा हा ठोकळ आढावा आहे. या आढाव्यांतून पुष्कळ उलटसुलट प्रश्न निघ-णारे आहेत, तूर्त त्यांची चर्चा बाजूस ठेवून गांधींच्या तत्त्वज्ञानाचें दर्शन घ्यावें हें विषय–संगतीच्या दृष्टीनें उचित वाटतें.

## सत्य, अहिंसा आदींचें सनातनत्व

सत्य, अहिंसा हीं तत्त्वें मानवसमाजाच्या इतिहासांत अनादि आहेत. एकेकट्यानें स्वतःच्या बळावर जगण्याची अवस्था सुटून मनुष्य जेव्हां संघटनेच्या किंवा समाजाच्या अवस्थेंत शिरला, तेव्हां त्याला ही अवस्था टिकविण्याला व मजबूत करण्याला सत्य, अहिंसा प्रभृती तत्त्वांची कांस धरावी लागली; नव्हे या तत्त्वांना आपल्या स्वभावांत कायमचें स्थान देणें

माणसाला भाग पडलें. सत्य, अहिंसा, अस्तेय, ब्रह्मचर्य इत्यादि तत्त्वांवांचून माणसांची 'समाज' या नात्यानें ओळखली जाणारी स्थिति टिकली आणि वाढली नसती, हें समजण्याला वस्तुत: फारसें कठिण नाहीं. पण कालान्तरानें हीं तत्त्वें व्यावहारिक नसून आध्यात्मिक व पारमार्थिक असल्याचा भ्रम उद्भवल्यानें व तोच बळावल्यानें वरील तत्त्वांविषयीं चमत्कारिक विपरीत ग्रह माणसाच्या स्वभावावर असे चिकटून बसले आहेत, कीं तो त्यांकडे फक्त शाश्वत मूल्याच्या योग्यतेनें पाहात असतो. अधिक विचार केल्यास 'आध्यात्मिक' 'आध्यात्मिक' म्हणून ज्यावर शिक्का मारला जातो त्यांतलें एकहि तत्त्व सामान्य मानवी व्यवहाराच्या बाहेरचें नाहीं, हें पटण्यास हरकत नाहीं. गीता जास्त परिचित एवढ्यासाठीं तिच्यांतील आध्यात्मिक मानलेल्या सद्गुणांची तपासणी केल्यास त्यांतील प्रत्येक सद्‌गुण मनुष्याच्या व्यवहाराशीं संबंध असल्याबद्दल शंका उरणार नाहीं. 'तुल्य—निंदा—स्तुति:' 'यदृच्छा—लाभ संतुष्ट:' 'मानापमानयोस्तुल्यं' यांपैकीं एकहि सद्गुण असा नाहीं, कीं ज्याला मनुष्याच्या व्यवहाराबाहेर कांहीं मोल असेल. मनुष्याचा व्यवहार शुद्ध होऊन प्रत्येकाला सुखाचा उपभोग घेतां यावा असा या सद्गुणांचा उद्देश स्पष्ट असतां ते सद्गुण केवळ व्यक्तीच्या समाजनिरपेक्ष उन्नतीसाठीं आहेत, सर्वांसाठीं त्यांचा उपदेश केलेला नाहीं, व उपयोगहि नाहीं, अशी त्याबद्दल कल्पना आढळते.

## सर्वं सत्ये प्रतिष्ठितम्

'सत्य' या तत्त्वाची दशा अशीच झालेली आहे. सृष्टीचीं सगळीं कामें ज्या नियमानें चालतात, त्यांना 'सत्य' ही संज्ञा दिल्यास चुकीचें ठरणार नाहीं. सृष्टीचा अढळ नियमितपणा माणसाच्या कारभारांत असता तर सत्याची मीमांसा करून महती सांगण्याचें कारण नव्हतें. पण तितका अढळ नियमितपणा नाहीं, म्हणून त्याच्या कारभारांत सत्याचें अस्तित्वच नाहीं, व असलेंच तर तें सक्तीमुळें किंचित् आहे, अशी समजूत करून घेण्याची जरूर नाहीं. महाभारतांत अनेक स्थळीं सृष्टीचा क्रम दाखवल्यासाठीं घेऊनच सत्याची माणसाच्या दृष्टीनें थोरवी गाइलेली आहे. उद्यां आपण उगवूं असा आज मावळतांना सूर्य करार करीत नाहीं; उन्हाळा, पावसाळा, हिंवाळा

असें ठरल्या वेळीं बिनचूक अनुभवास येणारें ऋतुमान शपथेच्या, कराराच्या किंवा साक्षीदारांच्या आधारावर चाललेलें नाहीं; गहूं पेरल्यास गव्हाचें पीक हातीं आलें पाहिजे याबद्दल माणसाला जो विश्वास वाटतो, याचें कारण सृष्टिनियमांच्या सत्यतेशिवाय दुसरें काय सांगतां येणार? महाभारतांत हाच मुद्दा लक्षांत घेऊन 'सर्वं सत्ये प्रतिष्ठितम्' अशा उपक्रमानिशीं वायूची चंचलता, सूर्याचें उगवणें, अग्नीची दाहकता हीं सारीं सत्येंच होत—सत्येन वायुरभ्येति, सत्येन तपते रविः। सत्येन चाग्निर्दहति—असें सांगितलें आहे. ज्याला धर्म म्हणतात, तेथें सत्य असतेंच—सत्यानेंच उत्कर्ष होत असतो, सर्वं सत्येन वर्धते—असा या प्रकरणाचा उपसंहार केलेला आहे.

## सत्यानेंच समाजधारणा होते.

सृष्टींतील घटना मनुष्याच्या कारभारांत पाहावयास जाणें हा अविचार आहे, व मनुष्याच्या टिकाणीं बुद्धीची शक्ति असून तिच्या कमजास्तपणानें चालणाऱ्या खटाटोपांत सत्याची अपेक्षा बाळगणें हें अवस्त्वारोपाप्रमाणें मूर्खपणाचें दिसतें, असें म्हणणारासाठीं महाभारतकारानें एक मार्मिक उदाहरण नमूद केलेलें आहे. समाजव्यवस्थेचे नियम धाब्यावर बसवून स्वैरवर्तन करणारे भयंकर गुन्हेगार लोक सत्याची आराधना करीत असतील असें कोणाच्या स्वप्नींही यावयाचें नाहीं. पण तेसुद्धां आपसांत सत्यानें वागतात, ही विचारानें कळणारी गोष्ट महाभारतकारांनीं आपल्या विवेचनांत दाखल करून सत्याचा प्रभाव निदर्शनास आणला आहे! त्यांचीं कामें एकमेकांबद्दलच्या विश्वासानें चालतात; त्यांनीं परस्परांशीं जे कराररमदार केलेले असतात, ते त्यांच्या हातून चोख पाळले जाण्याचा संभव नसेल तर गुन्हेगारीच्या कामांत त्यांना यशस्वी पाऊल टाकणें अशक्य होईल. गुन्हेगारांना जर सत्याचा आश्रय करावा लागतो तर इतरांना त्याशिवाय गत्यंतर नाहीं, हें कळण्याला सोपें आहे. समाजाचीं जीं कामें रोजच्या रोज पार पडतात, तीं सत्याविषयीं न कळत असणाऱ्या आदराचा परिणाम म्हणावा लागतो. व्यापारांत प्रत्यक्ष रोकडीहून पतीची किंमत जास्त मानली जाते. व्यापारांतली पत हें सत्याचेंच एक रूप आहे. शील, अब्रू, इभ्रत, हे सर्व शब्द सत्याचेच पर्याय आहेत. समाजाची स्थिरता किंवा संघटना—सर्वांचा

व्यवहार गुण्यागोविंदानें चालण्याला सत्याशिवाय दुसरा मार्गच नाहीं. समाजाचीं कामें सत्याच्या प्रभावामुळें फार मोठ्या प्रमाणामध्यें पार पडतात, परंतु त्यांच्यामागें सत्याचें अधिष्ठान असल्याचें मनुष्याला भानच नसतें. कारण हीं कामें त्याच्या इतक्या परिचयाचीं असतात व त्याबद्दल त्याला इतकी खात्री असते, कीं त्याच्या कार्यकारणभावाचें स्वतंत्र संशोधन करण्याची त्याला गरजच वाटत नाहीं. अशी ही व्यवस्था अंगवळणीं पडली असतांहि जेव्हां तिच्यांत कोणी विघ्न उत्पन्न करतो तेव्हां तो समाजाचा गुन्हेगार समजून त्याला शासन दिलें जातें. समाज सुरक्षित व उत्कर्षोन्मुख राहावा म्हणून जे नियम अस्तित्वांत असतील ते नियम म्हणजे सत्याचा प्रकार असून त्याला बाधा करणारीं कृत्यें करून माणसाकडून सत्याची पायमल्ली घडते. व तशी पायमल्ली घडूं दिल्यास समाजाचा पायाच खिळखिळा केल्यासारखें होईल, मग समाजांत त्राण उरणार नाहीं, अशा विचारानें गुन्हेगारांना शिक्षा देण्याचें शास्त्र निर्माण झालेलें आहे. ज्यानें त्यानें आपपल्या बळावर एकेकटें राहून आयुष्य कंठण्याची रानटी आद्यावस्था जाऊन माणसें एकमेकांच्या आधारानें जेव्हां समुदाय करून राहाण्यास शिकलीं तेव्हां त्यांच्या व्यवहारांत सत्याचा प्रादुर्भाव झाला. कोणी कोणाचा घातपात करणार नाहीं, असा विश्वास एकमेकांबद्दल वाटूं लागल्याशिवाय माणसें निश्चितपणें एकत्र राहणारच नाहींत. ह्या विश्वासालाच सत्य हें व्यापक, तात्त्विक दृष्टीनें दुसरें नांव प्राप्त झालेलें आहे. समाजाची एकजूट अशा तऱ्हेच्या सत्याखेरीज संभवत नाहीं. गांधींना हिंदी समाजांत सत्याच्या व्यवहाराचा अभाव दिसला, तो त्यांच्या प्रत्ययाला कोणकोणत्या स्वरूपानें आला असेल याचा पाढा वाचूं लागल्यास अतिशय विस्तार होईल. हिंदुस्थानांतील माणसामाणसाच्या वागणूकींत सत्याची लाज मुळींच उरलेली नाहीं असें ध्यानांत घेऊन गांधींनीं येथील जनतेला राष्ट्र या नात्यानें अवश्य असलेल्या गुणांची शिकवण देण्याला सुरुवात केली. जगांतील बलाढ्य देशांतून सत्याचा जो आदर व अंमल आहे, तो येथें दिसूं लागला तर हिंदी जनतेची ऊर्जितावस्था दूर नाहीं, असा गांधींचा निश्चय झाल्यामुळेंच त्यांनीं सत्याला स्मरून प्रत्येक कार्य करावें असा आपल्या अनुयायांना नियम घालून दिला.

## अहिंसेचा बागुलबुवा

सत्याहून जास्त वाद अहिंसेच्या संबंधांत चाललेला दिसतो. त्यांतल्या त्यांत राजकारण व अहिंसा यांची सांगड घालण्याचा गांधींचा प्रयत्न अतिशय चमत्काराचा वाटतो. राजकारण म्हणजे दोन परस्परविरोधी सामर्थ्यांचा—झगडा, या झगड्यांत जीव देण्याघेण्याची क्रिया सदैव चालते. जीव देण्याला कोणी हिंसा समजत नाहीं, परंतु दुसऱ्याचा जीव घेण्याच्या कृतीला हिंसा म्हणतात. दोन देशांत अनावर बेबनाव माजला कीं, त्याचा निकाल त्या दोन्ही देशांतील लोक एकमेकांच्या संहारास प्रवृत्त होऊन लावून घेतात. असल्या कथानकांनीं जगाचा इतिहास भरलेला असतां, राजकारणांत हिंसा नसावी, असें प्रतिपादन करणाराला वेड्यांत ढकलण्याला कोणी सिद्ध झाला तर तें सकृद्दर्शनीं सरळच वाटतें. लहानपणापासून जगाच्या पाठीवर सर्वत्र 'अरे तर कारे', 'ठोशास ठोसा', 'जशास तसें', अशा अर्थाच्या म्हणींच्या वातावरणांत माणसें वाढत असल्यामुळें 'हिंसा' वृत्ति हा माणसांच्या स्वभावाचा अपरिहार्य घटक आहे, अशी कल्पना स्वीकारणें भाग पडतें; व या कल्पनेच्या आधारावरच हिंसेची तरफदारी केली जाते. परंतु बारकाईनें या विषयाच्या मुळापर्यंत जाऊन पाहिल्यास हिंसा हा मनुष्याचा स्वभाव नसून 'अहिंसा' वृत्ति हीच त्याच्या संबंधांत स्वाभाविक असल्याचें दिसून येईल. हिंसावृत्तीला प्राधान्य असेल तर मनुष्यांना समुदायानें सहकारपूर्वक एकत्र शतकानुशतकें नांदणेंच अशक्य होऊन जाईल. सहकार, सहानुभूति, साह्य, संरक्षण, इत्यादि तत्त्वांच्या पायावर जुटीनें एकत्र वसणाऱ्या मानवसमुदायाला समाज ही संज्ञा देण्यांत आलेली आहे. हिंसावृत्तीच्या शेजारीं वरीलपैकीं कोणतेंच तत्त्व टिकणारें नाहीं व माणसाला सामाजिकता लाभणार नाहीं. हिंसा आणि संघटना यांचें साहचर्य निसर्गात नसल्यामुळें मनुष्याला समाजासाठीं अर्थात् संघटनेप्रीत्यर्थ अहिंसेला शरण जावें लागलें. दोन माणसांनीं एकोप्यानें राहावयाचें ठरविलें, कीं त्यांना आपल्या स्वभावांतील पुष्कळशा खांचाखोचा बुजविण्याशिवाय गत्यंतरच नाहीं. त्या खांचाखोंचा साफ करतांना अहिंसेचा प्रभाव कसा माणसाच्या मनाचा नकळत कबजा घेतो, याची कल्पना येण्यासाठीं थोडा विस्तार करणें जरूर आहे.

## हिंसेची भावना आणि कृति

'जशास तसें', 'ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहम्', 'ठोशास ठोसा' या म्हणी—सुभाषितांच्या साह्यानें हिंसेच्या स्वाभाविकतेची तरफदारी करण्यांत येत असते. परंतु अनुभव निराळाच दिसतो. रस्त्यांत दोन माणसें बाचाबाचीवरून मारामारीवर आल्यास, आजूबाजूला पुष्कळ माणसें तमासगीर वृत्तीनें जमणारीं असलीं तरी, कांहीं माणसें मध्यें पडून मारामारी सोडविण्याचा यत्न करतात व त्यांच्या प्रयत्नाला तमासगिरांकडून तर अडथळा होत नाहींच, पण खुद्द मारामारी करणारेदेखील त्या प्रयत्नाचा आपल्यावर अनुकूल परिणाम घडूं देतात. हिंसा स्वाभाविक असती तर तंटा तोडण्याच्या उद्योगाला विरोध झाला असता. तो ज्या अर्थी होत नाहीं त्या अर्थी हिंसेपेक्षां मानवी स्वभावांत अहिंसेचा पगडा जास्त असल्याचें उघडच सिद्ध होतें. 'ठोशाला ठोसा' चा प्रयोग चालला असतां तो स्वाभाविक म्हणून त्याला उत्तेजन देण्याचा प्रकार कुठेंच आढळत नाहीं, उलट हा प्रयोग थांबविणारालाच उत्तेजन मिळतें, याचें रहस्य मनुष्याच्या समाजव्यवस्थेंत आहे. सामाजिक जीवनाला हिंसा बाधते हें लक्षांत घेऊन तिचें दमन समाजव्यवस्थेनें केलेलें आहे व तें जगांत सर्वत्र केलेलें आहे. हिंसा हा मनुष्याचा स्वभाव असता तर तिला कायद्यानें प्रतिबंध करण्याचें कारण नव्हतें. परंतु कायद्याच्या व्यवहारांत हिंसा व अहिंसा यांचें तात्पर्य नीट गळीं उतरविणारीं उदाहरणें आढळतात. ज्याला 'खुनी' म्हणतात तो हिंसा करतो व न्यायाधीश या नात्यानें या 'खुनी' इसमाला जो फांसावर चढविण्याची शिक्षा सुनावतो व शेवटीं जो त्याच्या गळ्याला फांस बांधतो तो, हें सुद्धां बरवर पाहिल्यास हिंसकच ठरतात. परंतु न्यायाधीशाला कोणी खुनी म्हणत नाहीं. हा भेद कशानें पडतो? ज्याला खुनी म्हणतात तो आपल्या स्वार्थासाठीं दुसऱ्याचा जीव घेतो व या खुनी इसमाला जो शिक्षा फर्मावतो किंवा जो ती शिक्षा अंमलांत आणतो, त्याला स्वार्थ नसतो, खुनी मनुष्य समाजाचा गुन्हेगार ठरतो व त्याला प्रायश्चित देणारा समाजाचा एकप्रकारें हितचिंतक गणला जातो. म्हणजे हिंसा ही भावनेंत असते, प्रत्यक्ष कृतींत नसते, असा विवेक म. गांधींनीं प्रतिपादिलेल्या हिंसेच्या निषेधांत दृष्टीस पडतो. गांधीजींचा कटाक्ष हिंसेच्या

कृतीपेक्षां ती घडविणाऱ्या चित्ताच्या भ्रष्टतेवर जास्त आहे. तथापि हिंसेच्या निषेधाबरोबर ते भेकडपणाचाहि निषेध करतात, हें विसरणें योग्य नाहीं. किंबहुना एक वेळ हिंसा पत्करेल पण भेकडपणा मुळींच चालणार नाहीं, असें त्यांनीं वेळोवेळीं जनतेला बजावलेलें आहे. हिंसा आणि भीति यांचा परस्पर संबंध प्रसिद्धच आहे. पुष्कळदां हिंसा भीतीमुळें होत असते. एखाद्याला, तो निःशस्त्र आणि बेसावध असतांना मारून कोणी पळ काढल्यास त्या मारणाराला समाजाकडून शूरपणाची शाबासकी मिळत नाहीं. समाज त्याच्या कृत्यावर भित्रेपणाचा शिक्का ठोकूनच विचार करतो. विचार करणारांना हीं उदाहरणें पुरेशीं आहेत.

## युद्ध आणि हिंसा

हिंसा हा माणसाचा स्वभाव नाहीं हें सिद्ध होण्यासाठीं ' युद्ध ' या नांवानें जगांत झालेल्या व चाललेल्या संहारकर्मांची तपासणी बोधप्रद असल्याचें दिसून येईल. हजारों वर्षांपासून मानवी समाज युद्धें खेळत आहे. परंतु त्याला युद्ध नको असेंच वाटतें. तरीसुद्धां युद्धें होतातच. आणि यामुळें युद्धांत निष्कारण प्राणनाश टाळण्याचा प्रयत्न होत असतो. यासाठीं युरोपांतील राष्ट्रांनीं वारंवार आपापल्या प्रतिनिधींमार्फत करारमदार केल्याचें स्मरण येथें पुष्कळांना होईल. ' हेग कन्वेन्शन ' हा शब्द या बाबतींत नेहमीं ऐकूं येतो. शरण येणाराला मारूं नये; निःशस्त्र किंवा जखमी असतील त्यांच्यावर हत्यार चालवूं नये; स्त्री, वृद्ध, बाल यांना प्राणदान करावें; इत्यादि नियम करण्याचा हेतु उघड आहे. शत्रूंच्या जखमी कैद्यांना औषधोपचार करण्याची प्रथा काय सुचविते ? शत्रूचें जहाज फोडल्यावर शस्त्रें टाकून जीवाखातर समुद्रांत धडपडणाऱ्या लढाऊ खलाशांना वांचविण्याचें काम हें हिंसेचें माणसाला स्वाभाविक प्रेम नाहीं व प्रत्यक्ष संहाराच्या धडाक्यांतही शक्य तेथें तो हिंसा टाळतो, असें निदर्शनास आणून देणारें नाहीं काय ? शत्रूचीं माणसें मरत असतील तर मरूं देत, त्यांना वांचविणें आपलें कर्तव्य नाहीं, अशी भावना बाळगण्याऐवजीं शत्रूची हिंसकता नष्ट झालेली दिसतांच त्याला अभय द्यावा त्याचा जीव घेऊं नये, अशी निराळी भावना मनांत बाळगणें हें हिंसेच्या अप्रीचीतें लक्षण आहे; आणि हें लक्षण

ज्या अर्थी मनुष्य अभिमानानें स्वीकारतो त्या अर्थी स्वाभाविक काय, हिंसा की अहिंसा–या प्रश्नाचा निर्णय आपोआपच लागतो.

## सामुदायिक झुंज आणि मानवसमाज

मानवसमाजाच्या विकासाचा इतिहास पाहाणारांना असें आढळून चुकलें आहे, कीं एकदां मनुष्याला समुदायाची झुंज म्हणजे लढाई ही गोष्ट मुळींच ठाऊक नव्हती. अनें बची कांहीं आगळीक केल्यास बनें त्याच्याशीं व्यक्तिशः झगडावें आणि आपल्या आगळिकीचा निकाल लावून घ्यावा. साधारणपणें मनुष्येतर प्राण्यांत युद्ध ही संस्था आढळत नाहीं. शिकारीच्या मागें लांडगे कळपानें लागतात; पण शिकार म्हणजे युद्ध नव्हे. एका टापूंतील लांडग्यांनीं दुसऱ्या टापूंतील लांडग्यावर जमावानें हल्ला केल्याचें उदाहरण सांपडणार नाहीं. [ मुंगी हा एक अपवाद येथें दाखविला जातो. ] समाजाला स्थिरता आल्यावर बहुत काळानें शिपाईगिरीचा धंदा उदयास आला असला पाहिजे असा मानवसमाजशास्त्रज्ञांचा एक तर्क आहे. मगच समाजांत जमावानें प्रतिपक्षावर चालून जाणाऱ्या लोकांचा वर्ग निर्माण झाला. जरूरीच्या वेळीं एकत्र जमून प्रतिपक्षाशीं लढावें आणि जरूर संपल्यावर परत आपापल्या घरीं जावें, या स्थितींतून खड्या फौजा उभ्या करण्याचा प्रकार निघाला; जास्तजास्त संहार साधणारीं शस्त्रें तयार होऊं लागलीं. तथापि युद्ध किंवा सामुदायिक हिंसा हें मानवाला भूषण आहे, असें आजवर कोणीं मानलें नाहीं. युद्धामुळें लाभापेक्षां हानीच जास्त सोसण्याची पाळी ओढवते, इकडे लक्ष देऊन युद्धें थांबतील कशीं या प्रश्नांचा देशोदेशींचे कर्ते पुरुष अगदीं मनापासून नाना तऱ्हेनें अखंड विचार करीत आहेत. युद्ध थांबण्याचा सुदिन जेव्हां उगवावयाचा असेल तेव्हां उगवो, तोंवर निदान जरूरीहून जास्त तरी प्राणनाश होऊं देऊं नये, अशा उद्देशानें लढणारीं राष्ट्रेंहि शक्य तोंवर वागण्याचा यत्न करतात. सारांश हिंसा हा मनुष्याचा स्वभाव नाहीं, त्याला शांतताच प्रिय असते. पण स्वार्थाच्या मोहानें तो हिंसेला प्रवृत्त होतो. हिंसा सोडली यासाठीं स्वार्थ सुटतोच असें नाहीं म्हणून, हिंसेवांचून स्वार्थ साधण्याला उपयोगी पडणारी मनोरचना अस्तित्वांत यावी आणि दृढ व्हावी म्हणून म. गांधी

अहिंसेबरोबर इतर कितीतरी आध्यात्मिक गुणांची शिकवण देत आहेत. मनुष्याच्या मूळच्या चांगुलपणावर त्यांचा निस्सीम विश्वास आहे. त्या चांगुलपणावर शेंकडों वर्षे सांचत असलेला मळ झाडावा अशी त्यांची आकांक्षा आहे.

## क्षमा, हिंसा आणि बलशालित्व

इत्यारांची झुंज अहिंसेच्या सूत्रांत बसणारी नाहीं. शत्रूला जिंकण्यासाठीं अहिंसा हत्याराची कांस धरीत नाहीं. अहिंसेच्या शास्त्राप्रमाणें अहिंसा हेंच शत्रूला जिंकण्याचें शस्त्र ठरतें. विजय संपादण्यास लागणारी बलाढ्यता ज्याच्या ठिकाणीं असेल तोच अहिंसा आचरूं शकतो, असें अहिंसेचें आणखी एक अंग आहे. अहिंसा दुर्बळाकरितां नाहीं. शत्रूचा तडाखा बसल्यावर आपल्या उलट तडाख्यानें शत्रूला लोळविण्याला जो समर्थ असेल त्यानें आपला हात आवरल्यास त्याच्या या कृत्याला क्षमा म्हणतां येईल. शत्रूला उलट मार देण्याची शक्ति नसलेल्यानें ' जा मी तुला क्षमा करतों ' असें म्हटल्यास हा उद्गार साहजिकच हास्यास्पद गणला जाईल. जो न्याय क्षमादि गुणांचा तोच अहिंसेचा. अहिंसेंत आत्मक्लेशाला प्रतिबंध नाहीं. दुसऱ्याचा मार सहन करावयाचा हें वरून दुबळेपणाचें लक्षण वाटलें तरी या मार सहन करण्याच्या क्रियेनें फार लोकजागृति सिद्धीस जाते, हें विसरणें योग्य नव्हे. आपला सत्पक्ष आहे, या खात्रीनें जो पुरुष अन्यायाचे क्लेश सहन करतो, तो आपल्या क्लेशांच्या द्वारें त्या अन्यायाचा तिटकारा उत्पन्न करतो याची साक्ष अनेक संप्रदायांच्या इतिहासांतून भरपूर दिसते. म. गांधींनीं अहिंसेचें निशाण हिंदी राजकारणांत उभारल्यावर या चमत्काराचा विचार देशोदेशीं होऊं लागला व गेल्या २५ वर्षांत याबद्दल कितीतरी पुस्तकें इंग्रजीमध्यें प्रसिद्ध झालेलीं आहेत.

### ऐतिहासिक दृष्टीचें महत्त्व.

हिंदी राजकीय तपस्येच्या सिद्धीला अडवून धरणारें आजचें जबरदस्त विघ्न हिंदु–मुसलमानांतील भांडणाचें आहे. कॉंग्रेसची भूमिका राष्ट्रीय म्हणजे कुणालाहि सहज मान्य होण्याजोगी असतां आज मुस्लीम–लीगनें मतान्तरें करीत, मुसलमान समाज हें एक स्वतंत्र राष्ट्र असल्याचा दावा अतिशय दुराग्रहानें मांडण्यापर्यंत मजल मारली आहे. ब्रिटिश राजकर्त्यांचा या बाबतींतला तटस्थपणा लीगच्या हट्टाला पोषक ठरत आहे. इतर कित्येक पक्ष लीगच्या बाजूस झुकतांना दिसतात, तर कित्येक लीगचा द्वेषाच्या व त्वेषाच्या वृत्तीनें विरोध करतांना आढळतात. हिंदु–मुसलमान व ब्रिटिश अशा तीन पक्षांनीं हें कोडें उत्पन्न केलें आहे. गेल्या चार वर्षांत हिंदु–मुस्लीम प्रश्नावर २५–३० पुस्तकें लिहिलीं गेलीं आहेत. त्याशिवाय लहान लहान चोपडीं किती असतील त्याची गणती करणें तूर्त थोडें कठिण आहे. हीं पुस्तकें केवळ आजच्या तंट्याचा विचार करणारीं आहेत. परंतु या तंट्याला फुटणारे नवे नवे फांटे मोडून काढावयाचे म्हटल्यास हिंदु–मुसलमानांच्या संबंधाचा सगळा इतिहास पाहणें अवश्य ठरतें. मुसलमान म्हणजे एक निराळेंच राष्ट्र आहे, असें दाखविण्याच्या अट्टाहासांत जो तपशील पुढें येतो त्याचें परीक्षण इतिहासांत शिरल्याखेरीज होणारें नाहीं. नुकतीच गांधी–जीना वाटाघाट झाली, तिच्यामध्यें मुसलमान राष्ट्राची कल्पना देतांना जीनांनीं कित्येक मुद्दे सुचविले आहेत. त्यांना इतिहासांत आधार नाहीं, हें इतिहासाकडे नजर टाकल्याशिवाय गळीं उतरणार नाहीं. सुदैवानें अलीकडे हिंदु–मुसलमान विद्वानांनीं इतिहासाच्या समालोचनाची अनेक पुस्तकें

लिहिलीं असून त्यांत हिंदुस्तानांतील वेगळया मुस्लीम राष्ट्राच्या कल्पनेचें खंडन व्हावें अशा थाटाचें भरपूर विवेचन सांपडतें. हीं पुस्तकें चालू वादाचीं प्रत्यक्ष फळें नसली तरी अप्रत्यक्षपणें या वादांतूनच त्यांचा जन्म झाला, असेंच म्हणावें लागतें. हिंदु-मुसलमानांचें संबंध इतिहासांत कसे होते, हें पाहिल्यानें आजचा प्रश्न सुटतो असें सुचविण्याचा हेतु येथें नाहीं; त्याला भरीवपणा आणण्यासाठीं इतिहासाचें नांव घेतलें जातें. इतिहासाचा हल्लींच्या वादाला पाठिंबा नाहीं, या वादाचीं बीजें ब्रिटिशांच्या हिंदी राजकारणांत आहेत, असें ज्ञान होऊन इतिहासाचें भय जावें, एवढाच इतिहासाच्या निरीक्षणाचा उद्देश आहे. इतिहासाच्या अज्ञानानें जसे सध्या लीगचे पुढारी आपल्या मताची तरफदारी करीत असतात तशीच स्थिति त्यांच्या विरोधी पक्षाचीदेखील दिसते; हिंदुस्थानांत मुसलमानांनीं दिग्विजयी या नात्यानें प्रवेश केला. येथे शिरतांच त्यांनीं स्वधर्माभिमानानें हिंदूंचीं देवळें लुटलीं, जमीनदोस्त केलीं, हिंदूंच्या कत्तली उडविल्या, हिंदु बायकापोरांना गुलाम बनविलें आणि हा धुमाकूळ पुढें सतत पांचशें वर्षें चालू होता, अशी एक समजूत मुसलमानासंबंधांतील विरोधाच्या बुडाशीं फार भक्कमपणानें वसत असल्याचा अनुभव येतो. या समजुतीसारख्याच दुसऱ्या कितीतरी समजुती असल्यानें त्यांचा परामर्ष घेणें श्रेयस्कर आहे.

## दर्यावर्दी अरबांची इस्लामी वस्ती

मुसलमान हा अरबस्तानचा रहिवासी या नात्यानें फार प्राचीन काळापासून हिंदुस्थानांत ये-जा करीत होता. पुढें अरबस्तानला इस्लाम धर्माचीच दीक्षा मिळाल्यावर तो मुसलमान या नात्यानें इकडे जाऊं येऊं लागला. अरब लोक दर्यावर्दी आणि म्हणूनच देशोदेशींच्या मालाची ने-आण करणारा व्यापारी अर्थात् एक प्रकारें कोणत्याहि राज्याच्या उत्पन्नाला हातभार लावणारा यासाठीं ते जसे अन्यत्र तसे हिंदू राजांनाही जवळ करण्यालायक वाटावे यांत नवल नाहीं. मात्र अरब लोक इस्लामी बनल्यानंतर इकडे आल्यावर आपल्या नव्या धर्माप्रमाणें रहातां यावें म्हणून त्यांनीं हिंदु राजाकडून कांहीं विशेष हक्क मागून घेतले व हिंदु राजांनीही आढे वेढे न घेतां ते हक्क देऊं केले. अरबांची आवजाव प्रायः हिंदुस्थानच्या

पश्चिम किनाऱ्यावर साहजीकच जास्त होती. मलबारपासून खंबायतपर्यंतच्या समुद्रकिनाऱ्यावर त्यांच्या वसाहती निर्माण झाल्या व त्यांना कबरस्तान, मशीद बांधण्याची हिंदुराजांनी परवानगी दिली. न्यायनिवाड्याकरितां काजींच्या नेमणूकी हिंदुराजांनी केल्या. हे दर्यावर्दी व्यापारी अरब येथें राहूं लागल्यावर खालच्या जातींतील स्त्रियांशी लग्नें करीत असत. त्या पासून होणारी संतति मुसलमानच समजली जाई.

हिंदुराजांनी त्यांच्या संबंधांत कसल्याच हरकती उपस्थित केल्याचा दाखला नसला तरी त्यांना समाजानें दूरच ठेवलें. ह्यांना हिंदु समाज आपल्याच पोटांत जिरवूं शकला नाहीं व यामुळें त्यांची वस्ती निराळेपणानें तेथें वाढूं लागली. शक, हूण, इराणी व अरब हे यापूर्वी येथील समाजांत गडप झाले नसतील असें नाहीं. शक व हूण हिंदु–समाजांत बेपत्ता होऊन गेले. जोंवर इस्लाम सारख्या धर्माचा उदय झाला नव्हता तोंवर असे बाहेरचे समाज हिंदु समाजांत मिसळून जाण्याला प्रत्यवाय नव्हता. कोणी सूर्याचे तर कोणी अग्नीचे उपासक असल्यामुळें हिंदूंना त्यांच्याकडे भेदवृत्तीच्या तीव्र कटाक्षानें पाहाण्याची गरज नव्हती. ख्रिस्ती धर्माचा जन्म होण्यापूर्वी मूर्तिपूजा, यज्ञ इत्यादि प्रकार सार्वत्रिक होते. ख्रिस्ती धर्मानें इतर धर्मांच्याविषयींचें असहिष्णुत्व प्रथम सर्वांच्या प्रत्ययास आणून दिलें. इस्लामनें या असहिष्णुत्वाला आणखी तीक्ष्ण धार चढविली. तथापि हिंदुस्थानाकडे स्वधर्मप्रसारक दिग्विजयाच्या प्रेरणेनें मुसलमानांची चढाई होण्यापूर्वी केवळ व्यापारा खातर येणाऱ्या मुसलमांनांनी आपल्या धर्माच्या गरजा भागतील अशा सवलती येथील राजाकडून मिळवून सुखानें रहाण्याची पद्धति अवलंबिली होती. त्यांची संख्या कशी वाढत गेली याचें दिग्दर्शन वर केलें आहे. व्यापारी मुसलमान धर्मप्रसार करीत नसले तरी इस्लामचे मिशनरी हिंदुस्थानांत लवकरच आल्याचा पुरावा आहे.

## हिंदी मुसलमानांतिल तट आणि हिंदूंची धर्मशिथिलता

हिंदी मुसलमानांत पुष्कळ तट आहेत. त्यांतले कांहीं इस्लामी धर्म–प्रसारकांनीं उत्पन्न केलेले आहेत. सर्वांत जुनें मुसलमान या धर्मप्रसारकांचे अनुयायी असून ते आजसुद्धां इतरांहून आपला थोडासा निराळेपणा राख-

ण्याला जपतात. कांहीं तट जसे फार जुने आहेत तसेच कांहीं अर्वाचीन आहेत. मुंबईतील 'खोजा' या नांवानें ओळखले जाणाऱ्या लोकांचें इस्लामी धर्मांतर अगदीं अलीकडच्या काळांतील आहे. पण बोहरी समाज त्यांच्याहून फार जुना आहे. वहाबी व अहमदीया पंथ गेल्या शतकांतील आहेत. सरहद्दीवरील हिंदु समाजांत त्या काळीं धर्माचा अभिमान इतका शिथिल होता कीं, सिंध प्रांतांच्या बाजूस बऱ्याच छोट्या छोट्या राजांनीं सरहद्दीपलीकडील मुसलमान राजकर्त्यांच्या स्नेहाखातर नवा धर्म स्वीकारल्याचा पुरावा इतिहासांत आहे. महमदखान कासिमानें सिंधच्या दाहीर राजावर हल्ला केला तेव्हां या हिंदू राजाच्या सैनिकांत मुसलमान असल्याचें इतिहास सांगतो. हे मुसलमान वर सांगितलेल्या प्रकाराचे प्रतिनिधि होत. सातव्या शतकांत या देशामध्यें धर्मविषयक अनास्था इतकी माजली होती कीं, एकाच कुटुंबांत बाप वैदिक धर्माचा अभिमानी असल्यास त्याच्या मुलांपैकीं एक बौद्ध तर दुसरा जैन असण्याला प्रतिबंध नव्हता. मुसलमानी तवारिखांतून अशा स्वरूपाचे निर्देश आहेतच, पण 'कथा-सरित्सागर' या ग्रंथांतहि या धार्मिक अव्यवस्थितपणाचे दाखले आहेत. धर्मांतर हा ज्याच्या त्याच्या सुखसोयीचा किंवा लहरीचा खेळ होऊन बसल्यावर इस्लामला चंचुप्रवेश करण्याला कसलीच अटक नव्हती. एकाद्या इस्लामी साधूनें हिंदुस्थानांत येऊन आपल्या धर्माचा उपदेश सुरू करतांच तो धर्म लोकांना एकदम प्रिय व्हावा, याचा अर्थ त्यांत हिंदु धर्माच्या तुलनेनें जास्त ग्राह्यांश दिसण्याइतका येथील धर्म गंजलेला होता असाच तर्क करावा लागतो. ही वेळ बौद्धांच्या अपकर्षाची होती. वेदाभिमानी ब्राह्मणांनीं त्यांचा हात धुऊन पिच्छा पुरविला होता. सिंध, अफगाणिस्तान हे बौद्धांच्या प्रभावाखालचे प्रदेश असून तेथून ते मध्य आशियांत संचार करीत असत. अरबांना त्यांचा परिचय होता. सिंधांत जेव्हां ब्राह्मणांनीं त्यांची लांडगेतोड चालविली तेव्हां त्यांनीं मुसलमानांना मदतीची हांक दिल्याची आख्यायिका आहे. दुसरी आख्यायिका दाहीरच्या राज्यांतील चांचे लोकांनीं सिंहलद्वीपाकडून इराणांत जाणाऱ्या मुसलमानांचीं तारवें पकडून तीं लुटल्यामुळें इस्लामी अरबांनीं दाहीरच्या राज्यावर चढाई केली अशा रोखाची आहे. दाहीर हा जातीनें ब्राह्मण होता, हें लक्षांत ठेवणें बरें.

## इस्लामी आक्रमण आणि 'जीझिया'

हिंदुस्थानांत राजकीयदृष्ट्या विजय मिळविण्याच्या इच्छेनें ८ व्या शतकाच्या प्रारंभीं इस्लामच्या सेना धावून आल्या. त्यानंतर शें-सव्वाशें वर्षे हिंदुस्थानांत सामसूम राहिली. ११ व्या शतकांत महम्मद गझनीच्या धाडींनीं उत्तर हिंदुस्थानचा बराच भाग सतावून सोडला. या प्रसंगीं महम्मदाच्या सेनेंत मुसलमानांप्रमाणेंच मुसलमानेतरांचा फारच मोठा भरणा होता. महम्मदाच्या काळांत सगळे अफगाण मुसलमान झालेले नव्हते. महम्मदाचे नंतर त्या देशाची सारी प्रजा इस्लामच्या ताब्यांत गेली. महम्मदानें पंजाबाचा कांहीं भाग आपल्या ताब्यांत ठेवला होता. त्यांतील मुसलमान अंमलदारांनीं आपली जबाबदारी नीट न पाळल्यामुळें त्यांना शिक्षा देण्याकरितां एका 'तिलक' नांवाच्या हिंदू सरदाराची नेमणूक झाली व त्यानें अपराधी मुसलमानांचे हात पाय कापून शिक्षा केल्यामुळें कडव्या मुसलमानांना या काफराचा अतिशय राग आला व त्यांनीं गझनीच्या दरबारांत गाऱ्हाणें पोंचविलें. त्या वेळीं 'तिलका'चें कृत्य योग्य होतें असा दरबारानें निकाल दिला व काफराची बाजू राखली ! महम्मदानें देव फोडण्याचा व देवळें लुटण्याचा धडाका लावला होता. महम्मद कासमानें देव देवळांची नासधूस व लूट केली; पण हिंदू समाजानें 'प्रजा' होऊन राहाण्याचें कबूल केल्यावर महम्मद कासम कोणत्याहि प्रकारें त्यांच्या वाटेस गेला नाहीं. परधर्मी लोक जर 'धिमी' ( प्रजा ) होण्याला तयार असतील तर त्यांच्याकडून 'जीझिया' कर घ्यावा व त्यांचें संरक्षण करावें, असें इस्लामी राज्यकर्तृत्वाचें एक कलम होतें. धिमींच्या धर्माला उपद्रव देऊं नये, असा दंडक मुसलमान राज्यकर्ते पाळीत असत. महम्मद कासमानें या कलमाप्रमाणें वागणूक केली. महम्मद गझनीला धनाची अपेक्षा असल्यामुळें त्यानें 'धिमी' व शत्रुत्वानें वागणारे हिंदू असला प्रपंच मनांत फारसा येऊं दिला नाहीं. देवळें लुटण्याचा व देव फोडण्याच्या प्रघाताचा पाया त्यानें घातला. व यावरून अरबी व इतर ठिकाणाचे मुसलमान यांमधील फरक लक्षांत येणार आहे. अरबी मुसलमान महम्मद पैगंबर व त्याचे सहकारी यांच्या खास परंपरेंत वाढलेले असल्यामुळें ते स्वधर्माचें आचरण ज्या चोखपणानें करीत होते, तो चोखपणा इतर देशांतील मुसल-

मानांत उतरलेला नव्हता. तुर्कांमध्यें त्याची जाणीव फारच कमी होती. महम्मद कासम अरब व महम्मद गझनी तुर्क यामुळें दोघांच्या व्यवहारांत भेद दिसतो. या भेदाचें ज्ञान पुढील इतिहासाचें निरीक्षण करतांना उपयोगी पडल्याशिवाय रहात नाहीं. त्या इतिहासाकडे वळण्यापूर्वीं इतर कांहीं गोष्टींचा उलगडा करणें प्राप्त आहे.

मुसलमानांनीं देवदेवळांचा विध्वंस केला, ही घटना हिंदूंना उद्वेगजनक वाटते. मुसलमान हिंदूंच्या कत्तली करीत, त्यांच्या बायकापोरांना लुटीच्या मालाबरोबर गुलाम म्हणून घेऊन जात; या गोष्टी चीड आणणाऱ्या ठरतात. जीझिया कराविषयीं जेव्हां विचार केला जातो, तेव्हां हिंदूंच्या विटंबनेचा तो पुरावा समजून निष्कर्ष काढण्यांत येतो. जीझियाचें खरें स्वरूप वर सांगितलेंच आहे. मुसलमानांकडून संरक्षण होण्यासाठीं तो कर भरण्याची पाळी हिंदूंवर आली. हिंदूंच्या कमकुवतपणाचा हा भूर्दंड होता. संरक्षणाचा मोबदला या दृष्टीनें या कराकडे पाहिल्यास 'जीझिया' हा शब्द ऐकतांच ज्या भावना सहज उद्भवतात त्या उद्भवण्याला अवकाश रहात नाहीं. लढून विजय संपादण्याचें सामर्थ्य नाहीं, धर्मांखातर मरून जाण्याची तयारी नाहीं, अशा अवस्थेंत 'जीझिया' चें त्राण हिंदूंनीं पत्करलें. या त्राणानें हिंदूंचा जीव बचावला, एवढेंच नव्हे, तर धर्मविषयक त्रास टळला. 'जीझिया' देणारांना प्रत्यक्ष मुसलमानांच्या मानानें आर्थिकदृष्ट्या कांहीं फायदे होत असत, परंतु त्यांचा विस्तार येथें नको.

## देवळांची मोडतोड आणि हिंदूंची जबाबदारी.

देव आणि देवळें यांच्यावर इस्लामची वक्र दृष्टि वळण्याचें प्रमुख कारण म्हणजे त्यांच्या ठिकाणीं सांठविलेली अफाट संपत्ति हें होय. हीं द्रव्याचीं भांडारें लुटण्याचा मोह मुसलमानांना व्हावा, यांत चमत्कार नाहीं. राजाच्या तिजोरीचा रितेपणा घालविण्यासाठीं देवळांच्या संपत्तिवर हात टाकायला प्रत्यक्ष हिंदू राजेही कचरत नसल्याचीं तुरळक उदाहरणें इतिहासांत आहेत. अरबी मुशाफरांनीं कित्येक देवळांच्या ऐश्वर्याचीं जीं वर्णनें केलेलीं आहेत, तीं आज वाचतांनाहि डोळे दिपतात. मग ज्यांनीं तें ऐश्वर्य पाहिलें त्यांची काय दशा झाली असेल तें कल्पनेवरच सोंपवि-

लेलें बरें. अगणित द्रव्याच्या राशी बिनचूक हातीं लागण्याचीं हीं स्थळें मुसलमानांच्या पदरीं दुहेरी लाभ टाकणारी होती. देवदेवळांच्या विध्वंसानें धार्मिक पुण्याई गांठीस पडून, पुनः प्रचंड द्रव्यार्जन या दुहेरी लाभाचे धनी होण्याची संधी मिळे. देवळांच्या लुटीला मुसलमानांबरोबरच्या हिंदू फौजा प्रतिकूल नसल्याचे दाखले आहेत. हिंदूंची ही अप्रतिकूलता त्यांच्या धर्माभिमानांवर प्रकाश टाकणारी आहे. फार जुनीं उदाहरणें नकोत. पेशवाईतील एक उदाहरण पुरेसें आहे. पानिपतच्या लढाईनंतर नानासाहेब पेशव्यांच्या पश्चात् राघोबा–माधवरावांचा बखेडा चालू असतां निजामाचें लष्कर पुण्याच्या रोखानें निघालें. वाटेंत गोदावरीच्या कांठीं कांहीं तीर्थस्थळें लागलीं. त्यांची मोडतोड व लूट त्या लष्करानें बिनदिक्कत केली ! त्या लष्करांत हिंदू शिपायांची व सरदारांची कमतरता नव्हती. त्यांचा या प्रकारांत हात नव्हता असें क्षणभर मानलें तरी त्यांच्या डोळ्यांदेखत हा प्रकार घडला यांत संशय नाहीं. राघोबानें याबद्दल निजामशाही लष्कराच्या हिंदूंना दोष लावून निषेध केल्याचा दाखला पेशवे–दप्तरांत आहे. देवळांच्या बाबतींत मुसलमान राजांच्या हिंदू शिपायांची एक मोठी सोय होती. देवळांची लूट मुसलमान राजाच्या नांवांवर खपून जात असे. फौजेंतील हिंदू शिपायांना त्या निमित्त मुद्दाम कोणी जबाबदार मानून त्यांची हजेरी घेईल असा संभवच नव्हता. मुसलमानी रियासतींत हिंदु मनानें किती भ्रष्ट झाले होते याचे पुष्कळ दाखले सहज ध्यानांत येणारे आहेत. देवदेवळांच्या यशस्वी रक्षणाची कुंवत हिंदूंमध्यें नव्हती हें तत्त्व महम्मद कासीमच्या स्वारीनें जें एकदां सिद्ध केलें तें कधींच बदललें नाहीं. पेशवाईत जंजिऱ्याच्या शिद्यांनीं मराठ्यांच्या राज्यांत घुसून देवळांच्या नाशाचे व ब्राह्मणांना बाटविण्याचे प्रयोग पुष्कळदां केले. हैदर टिपूंनीं खालीं दक्षिणेंत असाच धुमाकूळ घातला. शिद्दी अथवा हैदर–टिपूंच्या फौजा एकजात मुसलमानांच्या होत्या असें समजण्याला आधार नाहीं. मग हिंदू सैनिक प्रतिकार कां करीत नसत? या प्रश्नाचें उत्तर दोन तऱ्हांनीं निघतें. एक तऱ्हा जबाबदारीचा अभाव व दुसरी तऱ्हा ‘ ज्याची खावी पोळी, त्याची वाजवावी टाळी ’ या म्हणीनें स्पष्ट होणारी आहे. पाडलेल्या देवळांच्या जागीं मशीदी बांधल्या जात असत. या मशीदींचा आकार पाहिल्यास त्यांचें बांधकाम महिनोगणती

चालत असलें पाहिजे हें समजायला उशीर लागत नाहीं. असें बांधकाम ज्याअर्थी निर्विघ्नपणें शेवटास जात असे त्याअर्थी त्या मशीदींच्या आसपासचे हिंदु मुसलमानांना किती भीत असत हें निराळें सांगावयास नको.

## इस्लामी अत्याचार आणि तत्पूर्व हिंदी झोटिंगशाही

धर्मप्रसार हें मुसलमानांच्या पराक्रमाचें मुख्य ध्येय होतें. त्यांच्या पराक्रमांत क्रूरपणा होता. थोड्या लोकांनिशीं दुसऱ्या देशांत घुसल्यावर तेथील जनतेमध्यें आपल्या शौर्याची दहशत उत्पन्न करणें एकप्रकारें अवश्यच ठरतें. जिंकलेल्यांच्या अनन्वित हालअपेष्टा करून त्यांना आपली धास्ती वाटावयास लावणें व त्या धास्तीच्या जोरावर त्यांच्यांमध्यें ' आलिया भोगासी असावें सादर ' अशी अगतिकत्वाची वृत्ति निर्माण करणें, हें व्रत आज विसाव्या शतकांत सुधारलेले म्हणविणारे युरोपियन देशहि जर अंमलांत आणतात, तर ज्या काळीं गवत व मनुष्य यांची योग्यता सारखीच मानली जात होती, त्या काळीं जितांच्या कत्तली जेत्यांनीं उडविल्यास त्याबद्दल त्यांना नांवें ठेवण्यांत हंशील काय ? शत्रूशीं क्रूरपणाचा व्यवहार फक्त मुसलमानच करीत होते व हिंदूंना त्याचा परिचय नव्हता, असेंहि म्हणतां येत नाहीं. जिंकलेल्या राजांचा यज्ञ करणाऱ्या जरासंधाचें नांव जोंवर हिंदूंच्या इतिहासांत कायम राहील तोंवर हिंदूतरांच्या क्रूरपणाच्या रडगाणीं व्यर्थच होत. राक्षस, दैत्य, दानव हे अतिप्राचीन म्हणून त्यांना वगळून गेल्या हजार वर्षामागच्या मुसलमान पूर्वकाळांत नजर टाकल्यास हिंदूंच्या क्रूरपणाचीं कृत्यें कितीतरी दाखवितां येतील. मुसलमानांचीं राज्यें होण्यापूर्वी हिंदुस्थान देश कितीतरी लहानमोठ्या राज्यांनीं विभागलेला होता. हीं राज्यें आपसांत निरंतर झगडत होतीं. तो झगडा धर्माचें किंवा नीतीचें भय बाळगून चाललेला होता, असा भ्रम बाळगण्याचें कारण नाहीं. दुसऱ्याला बुडवून आपला उत्कर्ष साधण्यासाठीं जर लढाया चालत तर त्यामध्यें क्रूरपणा असावा हें सरळ आहे. पण मुसलमानापूर्वीचा इतिहास बहुतांशीं विसरलेला असल्यामुळें फक्त मुसलमानांच्या इतिहासाचाच विचार जास्त केला जातो आणि हिंदूंनीं सारखा जिकडे तिकडे भडकून मार खाण्याचें काम चालविल्यामुळें मुसलमानांच्या पराक्रमांतील क्रूरपणाची बाजू निरंतर

डोळ्यांपुढें येऊन मुसलमानांविषयीं बहुधा एकतर्फी निष्कर्ष काढण्यांत येतो. प्राचीन हिंदू अहिंसा-धर्माचे पुतळे नव्हते, एकमेकांचा पाडाव करतांना ते क्रूरपणाला कसलीच मर्यादा घालीत नसत, याचीं प्रत्यंतरें मध्ययुगीन भारताच्या इतिहासांतून हवीं तेवढीं काढून दाखवितां येतील. मासल्यासाठीं काश्मीरच्या 'राजतरंगिणी' नामक ग्रंथाचें नांव दाखल करण्याला हरकत नाहीं. राजकारणांत किंवा धर्मप्रकरणांत प्रतिपक्षाशीं क्रूरपणानें वागावयाचें हा मानवी स्वभावाचा अनादि नियम असून त्याचा अंमल हिंदू समाजाच्या व्यवहारांतहि भरपूर होता. धर्मकारणाच्या उल्लेखानें बुजण्याचें कारण नाहीं. बौद्धाशीं वागतांना वैदिक हिंदूंनीं नीतीचे धरबंद पाळले असें मानण्याला अपवाद सांपडणें शक्य आहे.

## जनानखाने—मुसलमानांचे आणि हिंदूंचेहि !

मुसलमानांनीं आपल्या जनानखान्यांत हिंदू स्त्रिया भरल्या, यामुळें मुसलमानाच्या संबंधांत फार सावधगिरीनें आणि जपून वागलें पाहिजे, असा इशारा हिंदु-मुसलमान प्रकरणांच्या चर्चेंत बोलण्याचा प्रघात आहे. मुसलमानांना स्वधर्म वाढविण्याचें हिंदू स्त्रिया हें एक साधन वाटत होतें. शत्रूंच्या स्त्रियाची धर्मासाठीं नसली तरी सूडाच्या भावनेनें विटंबना करण्याची पद्धति हिंदू इतिहासाला अपरिचित नाहीं. शत्रूंच्या स्त्रियांना आपल्या राणीवाड्यांत आश्रय देण्याचा रिवाज हिंदूंना माहीत होता. बायकांनीं गजबजलेलें अंतःपुर हें राजाच्या ऐश्वर्याचें एक अंग समजलें जात असे. राम एकपत्नीव्रतानें आमरण राहिला, पण त्याच्या पित्याचें अंतःपुर शेंकडो स्त्रियांनीं वसलेलें होतें. रामानंतरच्या अवतारानें स्त्रीसंग्रहाची पराकाष्ठा केल्याचें प्रसिद्धच आहे. पुराणांतलेच नव्हे तर मध्ययुगीन इतिहासांतील हिंदूराजे त्या अवताराचा कित्ता गिरवीत होते. आजहि हिंदू राजांचे जनानखाने एकुलत्या एक बायकोपुरतेच असतात असें म्हणतां येणार नाहीं. मुसलमान वेगळ्या धर्माचे एवढ्याचसाठीं त्यांच्या जनानखान्याबद्दल विपरीत ग्रह करून घ्यावयाचा असल्यास गोष्ट निराळी, पण त्यांच्या जनानखान्यावरून त्यांच्याविषयीं विपरीत ग्रह करून घ्यावयाचा असेल तर हिंदू

राजांच्या अंतःपुराबद्दल तसाच ग्रह करून घेण्याला हरकत कोणती? 'स्त्रीरत्नं दुष्कुलादपि'-एखादी स्त्री उत्तम वाटल्यास तिच्या कुळाची दरकार बाळगूं नये ही मनूनें हिंदू राजांना दिलेली सवलत काय सुचविते? आपल्याच वर्णांतली किंवा सत्कुळांतलीच स्त्री राजानें जवळ करावी, असें बंधन पाळण्याची राजाला आवश्यकता नाहीं, असा या सवलतीचा अर्थ आहे. वर्ण, देश, कुळ पहायला नको, सौंदर्य असलें कीं पुरें, या सवलतीचा फायदा हिंदु राजांनीं घेतल्याचीं उदाहरणें आहेत. एकाच उदाहरणानें या विषयाचा उलगडा होईल.

## राणकदेवीचा वृत्तान्त

गुजराथच्या सिद्धराज जयसिंग नामक मोठ्या विख्यात राजानें [अकरावें शतक] एका कुंभकार कन्येच्या प्राप्तीसाठीं जो पराक्रम केला तो लोकश्रुत आहे. राणकदेवी ही जुनागडच्या [गिरनारच्या] राज्यांतली एका कुंभाराची मुलगी, तिचें सौंदर्य सिद्धराजाच्या चारणांनीं एकदां वाखाणलें. 'तुझ्या अंतःपुरांत राण्यांचा तोटा नाहीं, पण राणकसमोर त्या सगळ्या अगदीं तुच्छ वाटतात,' हा चारणांचा अभिप्राय ऐकून राजा तिच्या प्राप्तीसाठीं अत्यंत आतुर झाला! तिकडे चारणांच्या उपद्व्यापाची बातमी लागतांच त्या कुंभारानें ही मुलगी आपल्या राजाला अर्पण केली. सिद्धराजानें गिरनारचा राजा रायखेंगर याच्याशीं त्या मुलीसाठीं युद्ध आरंभलें. बारा वर्षे हें युद्ध चालून शेवटीं रायखेंगर धारातीर्थी पडला व राणकदेवी सिद्धराजाला मिळण्याचा मोका आला. युद्धाच्या बारा वर्षांत तिला दोन मुलगे झाले होते. सिद्धराजाला राणकदेवीच्या लेंकुरवाळेपणाची पर्वा वाटली नाहीं. तिनें आपलें अंतःपुर शोभवावें ही त्याची आकांक्षा कायम होती. राणकनें वश व्हावें म्हणून त्यानें तिचे दोन्ही मुलगे तिच्यासमोर ठार मारले किंवा मारविले. तरीहि तिचें मन वळेना. तिला तो आपल्या राजधानींत घेऊन आला तरी तिचें मन बावचळलें नाहीं. स्वतःविषयीं ती पूर्ण विरक्त असल्याचें पाहून राजानें तिला यथेच्छ वागण्याची परवानगी दिली. तेव्हां ती सती गेली! हिंदूंच्या परस्त्रीविषयक अनासक्तीची, दाक्षिण्याची, सदयतेची याहून जास्त परिणाम-

कारक साक्ष कोणती सांपडणार ? इतिहासज्ञांना अशा आणखी बऱ्याच हकीकती आठवतील. सिद्धराजाचा कथाभाग हिंदु नरेश सद्गुणसंपन्नतेचे पुतळे नव्हते, इतकें पटविण्यासाठीं नमूद केला आहे.

## हिंदुंच्या इस्लामी स्त्रिया

इस्लामधर्म हिंदू धर्माच्या अगदीं उलट. वास्तविक असल्या धर्मांतील स्त्रियांच्या संसर्गानें हिंदूंच्या वैदिक पवित्रतेला काळोखी लागली पाहिजे. कुणी असें समजत असतील कीं, मुसलमान बायकांचा वारासुद्धां हिंदु पुरुष आपल्या अंगाला लागूं देत नसावेत. पण इतिहासाच्या पोटांत विलक्षण सत्यें सांठविलेलीं आहेत. पुष्कळ हिंदु राजे व जहागिरदार मुसलमान स्त्रियांना आपल्या महालांतून अतिशय आपुलकीनें आश्रय देत असत. मुसलमान बादशहांना याचा सुगावा लागला म्हणजे ते या राजे–जहागिरदारांना पकडून आणून तंबी देत असत. तंबी मिळाल्यावर मुसलमान बायकांना सोडून द्यावें लागे. एका प्रसंगीं एका हिंदु ठाकुरानें मुसलमान बायकांना सोडण्याचें नाकारलें तेव्हां बादशहानें त्यास ठार मारलें. राजेरजवाड्यांतच नव्हे, तर सामान्य जनतेमध्यें देखील मुसलमान स्त्रिया पदरीं बाळगण्याची रीत कांहीं जागीं रूढ होती. जहांगीरच्या दृष्टोत्पत्तीस ही रीत आल्यावर त्यानें मुसलमान स्त्रियांना सोडून देण्याचा हुकूम फर्माविला. ज्यांना या बायका सोडावयाच्या नसतील त्यांनीं इस्लामची दीक्षा घ्यावी अशी या हुकुमांत सवड ठेवलेली होती. पुष्कळांनीं स्त्रीत्यागाऐवजीं इस्लामचा स्वीकार केला. स्त्रीत्याग केला नसता तर प्राणत्यागाची पाळी ओढवणार होती. इस्लामला शरण जातांच स्त्री व प्राण हीं दोन्हीं जागच्या जागीं राहिलीं. या उदाहरणाचें एक तात्पर्य फार उघड आहे. इस्लाम धर्माचा व त्याशीं संबंध असणाराचा तिटकारा हिंदूमध्यें उत्कट नव्हता असें तें तात्पर्य आहे.

मुसलमानांच्या कारकीर्दीतील हिंदु मुसलमानांच्या संबंधांत आणखी किती तरी वरच्यासारख्या गोष्टी सांगतां येतील. परंतु त्यांचा मोह सोडून शतकवारीनें कसकसें उभयपक्षीं स्थित्यंतर होत गेलें याची थोडक्यांत माहिती देऊन चालू प्रश्नाकडे वळणेंच स्थलसंकोचास्तव योग्य आहे.

## इस्लामी राजवटीचा प्रारंभकाल

मुसलमानांचें राज्य स्थापन झाल्यावर पहिलीं पन्नास पाउणशें वर्षें त्यांनीं स्वधर्माचा जो उन्माद व्यक्त केला तो पुढें मंदावत गेला. हिंदूंचीं देवळें पाडणें व लूट करणें हा प्रकार प्राय: हिंदूंना जिंकून त्यांना निपचीत पाडण्याच्या उपायांतला होता. तथापि हिंदूंनीं या उपायासमोर कायमचें नमतें कधींच घेतलें नाहीं हें सुद्धां तितकेंच खरें आहे. या धुमाकुळांत पुष्कळ हिंदू बाटून जात असत व तेवढें मुसलमानांचें बळ वाढत असे. राज्याची मालकी याप्रमाणें मुसलमानाकडे गेली तरी सगळा कारभार चालविण्याची धमक मुसलमानांत नव्हती. यामुळें बहुतेक सर्व जमाबंदीचें खातें हिंदूंच्या हातीं राहिलें, अर्थात् या खात्याचा लेखनव्यवहार देवनागरी लिपींत व्हावा, हें स्वाभाविक आहे. दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे नाण्यावरील देवनागरी मजकूर हा होय. कडव्यांतले कडवे समजले गेलेलें सुलतानसुद्धां आपल्या नाण्यांचा हिंदू प्रजेंत मान रहावा यासाठीं नाण्याच्या एका बाजूस श्रीपूर्वक आपलें नांव आणि इतर मजकूर कोरीत असत. न्यायखात्यात हिन्दूंच्या भाषेंत [ हिंदींत ] वादीप्रतिवादींचें म्हणणें टिपलें जात असे व काजींच्या निकालांतून हिंदीचा उपयोग होई.

## जातीपेक्षां प्रांताभिमान बळावला !

दिल्लीच्या सुलतानशाहीचे १३५० च्या सुमारास तुकडे होऊन बंगाल, माळवा, गुजरात, महाराष्ट्र, खानदेश या प्रांतामधून स्वतंत्र मुसलमान राज्यें उदयास येऊन जेमतेम दीडशें वर्षें टिकलीं. उत्तरेकडून मोंगल बादशाहीच्या विस्ताराच्या लोंढ्यांत तीं नंतर बुडून गेलीं. हीं स्वतंत्र राज्यें आपसांत लढत होतीं, परंतु मुसलमानांची संख्या कमी म्हणून त्यांना हिंदूंच्या साह्यानें लढावें लागत होतें. या स्थितीनें हिंदु-मुसलमानांत प्रांतिक अभिमान जागृत झाला. जे जे हिंदू ते ते तिरस्करणीय ही वृत्ति मावळून सुलतानांच्या हिंदू बायकांचीं हिंदू नांवें कायम राहिल्याचा देखावा या जमान्यांत दिसतो. माळव्यांत जसें एका मेदिनीराय नांवाच्या रजपुताचें प्राबल्य वाढलें तसेंच अन्यत्र कांहीं हिंदूंचें वाढलें होतें. सुलतानाच्या अंगरक्षकाचें काम मोठ्या विश्वासानें हिंदूंकडे सोंपविलें जाण्याचा प्रघात पडला.

प्रांतिक अभिमानाचें उदाहरण अहमदनगरच्या निजामशाहीमध्यें बऱ्याच वेळां दिसतें. हिंदुस्थानांतील मुसलमानाला परदेशी–इराणी तुर्की मुसलमानांविषयीं प्रेम वाटत नसे. आपण अस्सल व बाटगे कमअस्सल अशा भावनेनें हे परदेशी मुसलमान हिंदी मुसलमानांना तुच्छतेनें वागवीत असत. दक्षिणेंतल्या मुसलमानांना उत्तर भारतीय व परदेशी असे दोन्ही प्रतीचे मुसलमान धोक्याचे वाटत. त्यांचें प्रस्थ माजलें कीं दक्षिणी मुसलमान बंडाळी करूं लागत व या बंडाळीला दक्षिणी हिंदूंची मदत असे. परदेशी व उत्तर हिंदुस्थानांतील मुसलमानांच्या महाराष्ट्रीय मुसलमानांनीं कत्तली उडविल्याचे दाखले आहेत. १३५० ते १५०० च्या दरम्यान हिंदु–मुसलमानांचा कलह चालू होता, पण हिंदू निराळे व मुसलमान निराळे हा विभक्तपणाचा दंश ऱ्हास पावत होता.

## फकीर–अवलिये आणि साधुसंत

धर्माच्या नांवावर चालणारा रक्तपात बंद करावा या उद्देशानें मुसलमानांचे अवलिया फकीर व हिंदूंचे साधुसंत सारख्याच स्वरूपाचा यत्न या काळांत करीत होते. या विषयाची इतिहासानें आजवर उपेक्षा केली असली तरी त्याचें महत्त्व कळूं लागलें आहे. ' मजहब नहीं सिखाता आपसमें बैर रखना । हिंदी हैं हम, वतन है हिंदोस्ता हमारा ॥ ' हें वचन सर महमद इकबाल यांचें आहे, पण त्यांत व्यक्त केलेली भावना आपला अंमल चौदाव्या शतकापासून गाजवूं लागली होती. मुसलमानी धर्मांत ध्यानयोग सूफी पंथानें आणले व हिंदू साधुसंतांनीं वेळप्रसंग ओळखून हिंदु धर्माला भक्तिमार्गावर आणलें. या मार्गांत हिंदू आचारविचारांना नवें रूप मिळालें. त्यांत पुष्कळसा भाग मुसलमानांच्या अनुकरणाचा आहे. देशभर जोडीनें राहणाऱ्या हिंदु–मुसलमानांतील वैषम्य निघून जाण्याला संत व फकीर यांचा उद्योग कारणीभूत झाला. मुसलमान राम, कृष्ण या देवतांच्या भजनीं लागले. मुस्लिम पीरांची पूजा हिंदू करीत सुटले हें निराळें सांगावयास नको. या विषयाचा तपशील पुष्कळ आहे, पण तो सांगण्याचा मोह आवरणें इष्ट आहे.

## धर्मांची धार कमी करण्याचे प्रयत्न

वर निर्देशिलेल्या कालखंडांत विजयानगरचें साम्राज्य अस्तित्वांत होतें. मुसलमानांच्या पराक्रमापुढें या साम्राज्याच्या स्वामींना पुष्कळदां खालीं मान वांकविण्याचा प्रसंग आला. तेव्हां या साम्राज्याच्या सेवेंत मुसलमानाना स्थान मिळालें. हे मुसलमान आपल्या धर्मबंधूंशीं खुशाल लढत असत. याचा अर्थ हिंदुस्थानांतील अनेक जातीपैकींच आपण एक व जो पोटास घालील त्याची नोकरी करावयाची ही वृत्ति मुसलमानांत बळावली होती, असा करावा लागतो. विजापूर, अहमदनगर येथील राज्यांच्या वतीनें हिंदु सरदार याच वृत्तीनें विजयानगरवाल्याशीं लढत होते. प्रांतिक अभिमानाचा उल्लेख वर आलाच आहे. भाषा, पोषाख आणि रोजच्या व्यवहाराचे इतर प्रकार याबाबत दोन्हीं समाजामध्यें विरोध राहिला नाहीं. मुसलमानांचा पोषाख हिंदूंनीं आपलासा केला. त्या त्या प्रांताची भाषा मुसलमानांनीं आपली मानली. कालचा हिंदू बाटून आज मुसलमान झाला कीं त्याची भाषा कशी बदलणार? तो जी भाषा बाटेपर्यंत बोलत होता तीच भाषा त्याला पुढें बोलावी लागली. यामुळें प्रत्येक प्रांतामध्यें त्या त्या प्रांताची गुजराथी, मराठी, तामीळ, बंगाली वगैरे भाषा हिंदूइतक्या सफाईनें बोलणारे मुसलमान आढळतात. बंगाली भाषेचे जनक हिंदु नसून मुसलमान असल्याचें प्रसिद्धच आहे. हिंदुस्थानी किंवा उर्दू भाषेचें जन्मस्थान महाराष्ट्र हें तितकेसें प्रसिद्ध नाहीं. ही भाषा मोंगलांच्या काळांत दक्षिणेंतून उत्तरेस गेली. हिंदी भाषेचा आदर मुगल दरबारानें चांगलाच केला. तिची प्रतिष्ठा वाढविणारा खुसरू नांवाचा अल्लाउद्दीन खिलजीच्या दरबारांतील एक अमीर होता. मोंगलाईत तिचा अभ्यास अकबरापासून औरंगजेबापर्यंत सर्वांनीं केल्याचा पुरावा आहे. हिंदू इराणी-अरबीचा अभ्यास करूं लागले. मुसलमान जिज्ञासू संस्कृत भाषेची गोडी चाखण्याची ईर्षा बाळगूं लागले. मुसलमान सरदार आपल्या स्मारकावर संस्कृत शिलालेख लिहिण्याची हौस दाखविण्याला कचरेनासे झाले. मोंगल बादशाहीच्या आधीं अशा रीतीनें परस्परांतील ऐक्य बळावत चाललें होतें. हा मनोरंजक विषय विस्तारानें मांडण्याला सवड नाहीं. अकबराच्या काळांतील मुख्य प्रधान नबाब

अबदुर्रहीम खानेखाना याच्या कवित्वक्रीडेचा एक मासला वाचकांना सादर केल्यानें थोडी कल्पना येईल :

एकस्मिन्दिवसेऽवसानसमये
मै था गया बाग में ।
काचित्तत्र कुरंगबालनयना
गुल तोडती थी खडी ॥
तां दृष्ट्वा नवयौवनां शशिमुखीं
मै मोह में जा पडा ।
नो जीवामि त्वया विना शृणु सखे !
तूं यार कैसे मिले ॥

अर्थ सुबोध असल्यानें सहज लक्षांत येईल.

## मोंगलपूर्व व इंग्रजीनंतरचा हिंदु-मुस्लीम प्रश्न !

हिंदू-मुसलमान म्हणजे जित-जेता किंवा काफर व इस्लाम हा भेद बुजवून टाकण्याच्या यत्नाचा आणखी एक दाखला हुमायुनला पळवून लावणाऱ्या शेरशहा पठाणाच्या कारकीर्दींतील आहे. त्यानें देशांत मोठाल्या सडका व त्यांच्या कडेला विश्रांतीसाठीं धर्मशाळा बांधल्या. प्रत्येक धर्मशाळेंत त्यानें हिंदु-मुसलमानांना एकत्र अविरोधानें राहतां येईल, अशी व्यवस्था केली होती. राज्यविस्ताराच्या लढाया थांबल्या नव्हत्या, पण लोकांतलें वैमनस्य लढणाऱ्या राज्यांच्याइतकें नव्हतें. औरंगजेबानंतर मोंगल साम्राज्याचे तुकडे होऊं लागले. अयोध्याप्रांत, रोहिलखंड हे नवे स्वतंत्र प्रांत उदयास आले. बंगाल, बिहार, ओरिसा, दक्षिणेंतील नवी निजामशाही मराठे, शीख, म्हैसूर, ( हैदर टिपू ), त्यांतच इंग्रजी अंमलाचा उदय अशा रीतीनें देश विभागला. हिंदू-मुसलमानांतील बेबनाव संपला. मुसलमानांच्या नोकरीची हिंदूंना लाज वाटेना. मुसलमान हिंदूंच्या तैनातींत नेकीनें राबूं लागले. एकमेकांवर विजय मिळविण्याच्या आवेशांत मुसलमानांनीं जुन्या अत्याचाराची उजळणी मधून मधून चालवावी असा प्रकार दिसतो. पण सर्वांचा स्वाहाकार करणाऱ्या इंग्रजांनीं हिंदु-मुसलमानांचें चित्त जास्त

वेधून टाकलें होतें. अखेरीस इंग्रजांच्या ताब्यांत सारा देश गेला व हिंदु-मुसलमानांच्या प्रश्नावरील पूर्वीची खपली पडून तो चिघळविण्यांत आला.

## अरबी भाषेंतील हिंदी राष्ट्रगीत

तेराव्या शतकाच्या सुरवातीपासून १८ व्याच्या प्रारंभापर्यंतच्या पांचशें वर्षांत मुसलमान राज्यांची उलथापालथ हिंदुस्थानांत सारखी चालली होती. पण आपण हिंदुस्थानचे रहिवाशी आहों, ही भावना या काळांत मुसलमानांमध्यें पक्की रुजून गेली होती. हिंदुस्थान हीच आपली जन्मभूमि असें मुसलमान समजत होता. याचे परिणाम अनेक प्रकारें अभ्यासकांच्या दृष्टोत्पत्तीस येणारे आहेत. येथें एक नवीन हिंदी-इराणी भाषा उदयास आली. इराणी अरबी शब्दांनीं नव्यानें सरसावलेल्या हिंदी प्रांतिक भाषांची शोभा वाढविली. किती नव्या नव्या वस्तूंचा हिंदुस्थानाला परिचय झाला. संगीत, चित्र, शिल्प, वास्तु [ इमारती ] या कलांना व शास्त्रांना नवें रूप आलें. शिष्टाचारांत क्रांति घडली. मुसलमानांच्या हातून ही घडामोड हिंदुस्थान देश आपलाच या बुद्धीनें झाली. हिंदुस्थानाचें मुसलमानांना किती प्रेम वाटत होतें, याचें एक अकराव्या शतकांतलें प्रमाण उपलब्ध आहे. अबू जिलअ सिंधी या नांवाच्या गृहस्थानें त्या शतकांत हिंदी मातृभूमीचें जें स्तवन केलें आहे तें पहिलें ' राष्ट्रगीत ' असें म्हणतां येईल. या कवीजवळ हिंदुस्थानाची कोणीतरी निंदा केल्यामुळें त्याचा जन्मभूमिविषयक अभिमान खवळून जागा झाला. हें स्तवन अरबी भाषेंत आहे. त्याच्या पहिल्या चरणांत स्वजन्मभूनिंदकाचा त्यानें उल्लेख केला आहे. एकजण भारत व भारतीय धनुर्विद्या यांची युद्धाच्या चर्चेंत तारीफ गात असतां दुसऱ्यानें आक्षेप घेतला, असें पूर्ववृत्त निवेदन करून अबू जिलअ सिंधी म्हणतो कीं, हा आक्षेप रास्त नव्हता. पुढें त्यानें जे उद्गार काढले ते असे—मी माझ्या प्राणांची शपथ घेऊन सांगतों कीं हा देश पाणीदार आहे. येथें पर्जन्य वेळच्यावेळीं पुष्कळ पडतो. दूध, धान्य व नानाविध रत्नें यांची प्राप्ति येथील जनतेला पावसामुळें होत असते.' यानंतर कस्तूरी, कापूर वगैरे सुगंधी पदार्थ; हस्तीदंत, सागवान, चन्दन व इतर सुगंधी वृक्ष त्याचप्रमाणें वाघ, सिंह, चित्ते, इत्यादि वन्यश्वापदें; नारळासारखीं फळें;

मोर, पोपट, कबूतर, यासारखे पक्षी, यांचा स्तुतिपाठ करून त्यानें तरवार-भाल्यांची ख्याति सांगितली आहे. भाल्यानें सैन्यें हालवितां येतात व तरवारी अशा असतात कीं ज्यांची धार कधींच बोथट होत नाहीं, अशी या हिंदची ग्वाही आहे. शेवटीं अशा गुणसंपन्न देशाची जो निंदा करायला धजेल तो महामूर्खच नको का समजायला, असा त्यानें सवाल टाकला आहे.

### बक्रे ईद व बादशहा

दिल्लीचे सुलतान व बादशहा हें हिंदु—मुस्लीम ऐक्याचें केंद्रस्थान बनलें होतें. १८५७ सालीं या ऐक्याचें जें प्रदर्शन झालें तें ध्यानांत बाळगण्याजोगें आहे. या वेळीं दिल्लीचा बादशहा केवळ नामधारी होता. इंग्रजांच्या ताब्यांत राहून तो त्यांनीं दिलेल्या तनख्यावर दिवस काढीत असतांहि हिंदु-मुसलमानांना त्याच्याविषयीं किती प्रेम व आदर वाटत होता, याची साक्ष पटविणाऱ्या १८५७ सालीं घडलेल्या अनेक विश्वसनीय गोष्टी आहेत. इंग्रजी राज्याविरुद्ध बंड करणाऱ्या चोहोंकडील फौजा दिल्लीस गोळा झाल्या व त्यांनीं बादशहाच्या नांवाची द्वाही पुकारून इंग्रजांना सामना दिला ही एकच मुख्य गोष्ट ध्यानांत आगली कीं, बाकीच्या गोष्टी आपो-आप सहज गळीं उतरतील. हा बादशहा बंडाच्या वर्षीं अतिशय वृद्धावस्थेस पोंचलेला होता. शिवाय त्याला प्रत्यक्ष राज्यकारभाराचा मुळींच अनुभव नव्हता; परंतु ज्या वंशांत तो जन्मला व ज्या परंपरेचें त्याला उत्तम ज्ञान होतें, त्या वंशाचा व परंपरेचा हिंदु—मुसलमानासंबंधांतला व्यवहार त्यानें बंडाळीच्या काळांतील लहानशा मुदतींचें हिंदुमुसलमानांचें नेतृत्व स्वीकारतांच कशारीतीनें निदर्शनास आणला याविषयीं एक उदाहरण सांगितल्यास मुसलमान राजवटींतील हिंदूंच्या स्थितीचा स्वच्छ खुलासा होईल. १८५७ च्या ३ ऑगस्टला मुसलमानांचा बक्रे ईद हा सण होता. दिल्लीच्या बाहेर इंग्रजांच्या फौजांचें जाळें पसरलें होतें व त्यांतल्या कांहीं जणांनीं बक्रेईदींतील गोवधाच्या निमित्तानें हिंदूमुसलमानामध्यें तेढ उत्पन्न करण्याचा उद्योग आरंभिला. दिल्लींत दोघां तिघां मुलांनीं गाई मारण्याची कल्पना काढली व हा प्रकार झालाच पाहिजे अशी चिथावणी मुसलमानांस दिली. बादशहाच्या कानांवर ही गोष्ट गेली तेव्हां त्यानें गोवधाबद्दल मनाईचा हुकूम जाहीर

केला. बादशाहीसाठीं मुसलमानाइतक्याच ईर्ष्येनें हिंदु फौजा तळहातावर शीर घेऊन लढत असतां त्यांचें मन दुखवणारी ही कारवाई आपल्या हुकुमानें थांबत नाहीं, असें दृष्टीस पडलें तेव्हां तो स्वतः वाड्याबाहेर निघाला. ज्या मुल्लांनीं गोवधाचा आततायी हट्ट धरला होता, त्यांना तोफेच्या तोंडीं देऊन आपल्या पुढाकारानें बादशहानें बकऱ्यांचें व उंटांचें बलिदान करविलें आणि हिंदु-मुसलमानांच्या बेबनावाचें संकट निवारलें. ही गोष्ट तत्कालीन इंग्रजांच्या आठवणींत नमूद असून, दिसायला किरकोळ असली तरी, मनन करणारांना तिचें व्यापक रहस्य समजण्याला हरकत नाहीं.

# हिंदु-मुसलमान (उत्तर रंग) : : : ४

मागिल प्रकरणीं मुसलमानांशीं इंग्रज राज्यकर्ते कोणत्या धोरणानें वागले व तें धोरण केव्हां पालटलें याचा ऊहापोह आहे. हिंदूंचें राष्ट्रीयत्व आपल्या राज्यकर्तृत्वाला बाधण्याइतकें जोरदार होऊं नये म्हणून मुसलमानाकडे ब्रिटिश राज्यकर्त्यांची कृपादृष्टि वळली. ज्यांना एकदां वाळीत टाकल्याप्रमाणें वागविण्यांत आलें त्यांची आंजारणी गोंजारणी सुरू होतांच दैन्य झाडण्याच्या स्वाभाविक इच्छेनें त्यास या आंजारणी-गोंजारणींतील कपट न कळण्याइतकें वेडावून सोडावें यांत नवल नाहीं. मुसलमानांना दैन्याचा कांच असा जांचत होता कीं, दैन्यांतून वर काढण्याचा डौल दाखविणाऱ्या राज्यकर्त्यांविषयीं त्यांना विलक्षण कृतज्ञता वाटूं लागली. इंग्रजी राज्यांत मुसलमानांनीं नव्या शिक्षणाचा सुरवातीस मुळींच फायदा घेतला नाहीं. या शिक्षणानें धर्म बुडेल असें त्यांना वाटत होतें. सर सय्यद अहमद यांचे पुढाकारानें अलीगड येथें खास मुसलमानांसाठीं कॉलेज निघालें व हें कॉलेजच मुसलमानांच्या भावना हिंदू-विरुद्ध कलुषित करण्याचें केंद्र बनलें. हिंदु-विरुद्ध मुसलमान असा डाव रचण्याची कामगिरी त्या कॉलेजाच्या तिघा इंग्रज प्रिन्सिपॉलांनीं बजाविली! हा इतिहास मननीय आहे; तो कित्येक पुस्तकांतून बाहेर आलेला आहे. यासाठीं ह्याचा अधिक विचार करण्याचा मोह टाळावा लागत आहे.

## मुसलमानांच्या राजनिष्ठा-प्रवाहाचें मूळ.

हिंदूंप्रमाणें मुसलमानांतहि इंग्रजी राज्यामध्यें दोन तीन विचारप्रवाह निर्माण झाले. सर सय्यद अहमद हे समाज सुधारणावादी होते. आर्यसमाजाप्रमाणें कित्येक मुसलमान विचारवंत पुनरुज्जीवनवादी निघाले. पैगंबराच्या

शिकवणीची मुळांतल्यासारखी अंमलबजावणी करण्याची मनीषा त्यांनीं धरली. इस्लामच्या इतिहासाचा गौरव गाण्यांत त्यांना धन्यता वाटत होती. इराण, तुर्कस्तान, ईजिप्त, येथील हालचालींचें निरीक्षण करून ह्या देशांतील अर्वाचीन पराक्रम जणूं काय आपलाच अशा भावनेनें ह्यांना पछाडलें. हिंदूंनीं पौराणिक व ऐतिहासिक महापुरुषांच्या उत्सवांना ज्या भावनेच्या तृप्तीसाठीं जन्म दिला त्याच भावनेची तृप्ति मुसलमान वरील तऱ्हेनें करून घेऊं लागले. कमालपाशा व रीझाशहा यांच्या कर्तृत्वामुळें हिंदी-मुसलमानांना वाटणारा उत्साह ह्या भावनेचा दर्शक आहे. व खिलाफतीची चळवळ आजकालच्या विक्रमादित्याच्या चळवळीइतकीच ऐतिहासिक पुराव्यासमोर पोकळ ठरणारी आहे. पराक्रम करवत नाहीं, अशा अवस्थेंत पूर्वजांच्या पराक्रमाचे पोवाडे गाणें हा एकच समाधानाचा मार्ग दिसतो. मुसलमानांनीं त्याच मार्गाचा अवलंब केला. इंग्रजी शिक्षणानें नोकऱ्या मिळूं लागल्यावर तिसरा प्रवाह राज्यनिष्ठेचा उद्भवला. या राज्यनिष्ठेनें ते ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या हातांतील बाहुलें होत चालले. हिंदूंची स्वराज्यविषयक चळवळ ही मुसलमानांच्या घाताची आहे, असली कल्पना राज्यनिष्ठेच्या अतिरेकाशिवाय संभवत नाहीं. सर सय्यद हे हिंदुस्थान म्हणजे हिंदूंचें राज्य, हिंदु या शब्दांत मुसलमानांचाही अंतर्भाव होतो, असें इंग्रजांना तोंडावर सांगणारे पुढारी होते, पण कॉंग्रेसच्या स्थापनेनंतर त्यांची विचारसरणी पालटली. त्यांनीं कॉंग्रेसपासून अलिप्त राहाण्याचा मुसलमानांना उपदेश केला!

## लिपीचें मूळ, आणि वाढलें दंग्यांचें खूळ.

अलिगड कॉलेजच्या द्वारें मुस्लिम जनतेला अलग करण्याची खटपट होत असतां संयुक्त प्रांताच्या ले० गव्हर्नराने नागरी लिपीचें प्रकरण सुरू केलें. जमाबंदी [ रेव्हिन्यू ] व न्याय या खात्यांतून उर्दू लिपीनें काम चाललें होतें. मराठीच्या मोडी लिपीप्रमाणें उर्दू लिपी जलद लिहिण्याला उपयोगी म्हणून, मुसलमानानें नव्हे तर एका महामान्य हिंदूनें-राजा तोडरमलानें तिचा वरील खात्यांतून प्रवेश करून दिला. तेव्हांपासून उर्दूविषयीं कुणालाहि दिक्कत वाटली नाहीं, ती या इंग्रज गव्हर्नराला वाटली!

हिंदूंनीं उर्दूविरुद्ध चळवळ केली, मुसलमानांना हिंदूंचा संशय घेण्याला हें एक नवें कारण उत्पन्न झालें. रेव्हिन्यू व न्याय खात्यांतून मुसलमानांची हकालपट्टी करण्याचा व्यूह नागरीच्या मागणीत आहे असें दुःस्वप्न त्यांना भेवडावूं लागलें. तावडतोब प्रतिक्रियेच्या न्यायानें त्यांनीं अंजुमने तरक्की-इ-उर्दू नांवाची संस्था जन्मास घातली. काशीच्या नागरी प्रचारिणी सभेकडून देशहिताचीं बरींच कामें झालीं असलीं तरी तिची प्रेरणा हिंदू-मुसलमानांना विभक्त करण्याच्या राजकीय भूमिकेंत आहे, हें विसरून चालणार नाहीं. याच सुमारास हिंदूंनीं गोरक्षणाच्या कार्यास हात घातला. गोरक्षण संस्था निघाल्या. गोऱ्या फौजेकरितां रोजच्या रोज देशांत हजारों गाई गुरांचा संहार कत्तलखान्यांतून होत असतां हिंदूंना मुस्लिम सणानिमित्त वर्षांतून एकदां बळी पडणाऱ्या गाईचा कैवार घ्यावासा वाटतो, ही एक विचार करण्यासारखी गोष्ट आहे. गोरक्षणावरून प्रथम हिंदु-मुसलमानांचे दंगे झाले. पुढें मशिदीपुढें वाद्यें वाजविल्यावरून मुसलमानांनीं दंगे केले; व आतां दंग्यांना कसलेंहि कारण पुरतें, अशी स्थिति आहे.

## सवत्या सुभ्याची हुंडी इंग्रजांनीं चढवली !

१८९३ सालीं राज्यसुधारणेचा जो कायदा अमलात आला त्या कायद्यांत मुसलमानाच्या हिताची व्यवस्था राजकर्त्यांनीं आपल्या हातीं राखली. कित्येक मुस्लीम सभासद त्यांच्या नेमणुकीनें कायदेमंडळांत जावें, असें या व्यवस्थेचें स्वरूप होतें. सवत्या सुभ्याचें बीज या व्यवस्थेंत आहे. प्रारंभीं इंग्रजांबद्दल मुस्लीम जनतेला वाटणारा संशय जाऊन त्याची जागा विश्वासानें भरून निघण्याकरितां कांहीं वर्षें जावयास हवीं होतीं. ब्रिटिशांचा दमदारपणा प्रख्यात आहे. आपण दाखवूं लागलेल्या प्रेमाची शंका वाटणार नाहीं, अशी त्याची खात्री झाल्यावर त्यांनीं बंगालची फाळणी मुसलमानांच्या कल्याणार्थ केली. फाळणीचे जनक कर्झन साहेब यांनीं मुस्लिम कल्याणाचा उद्देश पुकारल्यावर फाळणीचे एक व्यवस्थापक सर बाम्फील्ड फुल्लर यांनीं 'मुसलमान ही आपली लाडकी बीबी' अशी काव्याची भाषा वापरून त्या उद्देशाचा पक्केपणा सर्वांच्या लक्षांत आणून दिला. आतां मुस्लिम लीगच्या जन्माला अनुकूल स्थिति प्राप्त झाली. १९०६ सालीं मुस्लिम लीगचें पहिलें

अधिवेशन डाक्क्यास होण्यापूर्वी आक्टोबरांत या संस्थेचें शिष्टमंडळ तत्कालीन व्हाइसरॉय लॉर्ड मिंटो यांच्या मुलाखतीस गेलें. या शिष्टमंडळाच्या मागणीचें स्वरूप ठरविणारा व त्याची पुढील वाट मोकळी करून देणारा एक इंग्रजच होता. त्यानें व्हाइसरॉयच्या हुजूर चिटणिसाबरोबर आधीं कित्येक दिवस पत्रव्यवहार चालवून सरकारांत चांगला बार भरला होता. मुलाखतीच्या वेळीं तो उडाला व मुसलमानांच्या सवत्या सुभ्याचा पाया घातला गेला. त्या शिष्टमंडळाचें कर्तृत्व कळसूत्री पुतळ्यांच्या नाचासारखें होतें. [Command peformance] असा अभिप्राय म. मौ. महम्मदअलींनीं दिलेला आहे. तेव्हाचे भारतमंत्री मोर्ले यांना हा प्रकार अव्यापारेषु व्यापार वाटला. 'मुसलमानांच्या सवत्या सुभ्याची पिरपीर पुरे. मुसलमानांना आश्वासन देण्याच्या फंदांत पडला नसता तर ही कटकट चुकली असती' अशा अर्थाची मिंटोची कानउघाडणी मोर्लेच्या हिंदी आठवणींत एका ठिकाणीं आहे. सवता सुभा हा राजकीय उन्नतीच्या वाटेंतला जबरदस्त अडथळा आहे, अशी कबुली माटेग्यू चेम्स्फर्ड रिपोर्टांत आहेच, पण सायमन कमिशनच्या अहवालांतहि आहे. कबुली देणाराना या चुकीची दुरुस्ती मात्र करवत नाहीं!

## 'पाकिस्तान' चा दिखाऊपणा हा जिनांचा पराक्रम नव्हे!

१९०६ सालच्या मुस्लिम लीगचें महत्त्व १९१६ पर्यंत टिकलें. त्या वर्षीं तिचा व काँग्रेसचा मिलाफ होऊन दोन्ही संस्थांतर्फे राज्यसुधारणेची एकमुखी मागणी ठरली. पुढें मुस्लिम लीग मागसली! खिलाफतीच्या आंदोलनानें या संस्थेला पडद्यांत ढकललें. १९२४ नंतर दोन मुस्लिम लीग दिसूं लागल्या. एका लीगनें सायमन कमिशनशीं सहकार केला व दुसरीनें बहिष्कार घातला होता. बहिष्काराच्या पक्षांत कायदे आझम होते; पुढें दुसरी तोन्था लीग मोडली व १९३० पासून १९३५ पर्यंत मूळ संस्था कशीबशी जीवंत होती! १९३६ नंतर कायदे आझम जिनांनीं तिच्यांत चैतन्य भरलें. या चैतन्याची विपरीत लीला सर्वांच्या परिचयाची असल्यानें तिचा पाल्हाळ नको. मात्र 'पाकिस्तान' या नांवाच्या मागणीची पहाणी करणें जरूरीचें आहे. मुसलमान हें एक स्वतंत्र राष्ट्र आहे असें कल्पून त्या

राष्ट्राची स्थापना करण्याचा विडा जिनांनीं उचलला आहे. या शब्दाचें पितृत्व जगद्विख्यात कवि इकबाल यांच्याकडे असल्याचें मांगतात. पाकिस्तानचा पुरस्कार केल्याच्या आरोपाला त्यांनीं दिलेलें उत्तर आज उपलब्ध आहे: 'पाकिस्तान हिंदू–मुसलमान किंवा ब्रिटिश या सर्वांचें नुकसान करणारें आहे,' अशा त्या उत्तराचा भावार्थ आहे. गोलमेज परिषदेमध्यें 'पाकिस्तान ही शाळेंतल्या पोरांची कल्पना आहे' अशा मथितार्थाची माहिती मुसलमान प्रतिनिधींनीं ब्रिटिश जिज्ञासूंना पुरविली ! आतां मात्र 'पाकिस्तान' या शब्दाच्या जादूनें मुस्लिम लीगच्या पुढाऱ्यांना आणि अनुयायांना पूर्णपणें भारून टाकलें आहे. पाकिस्तानच्या अंधुक धुरकट निराकार कल्पनेला डोळेफोड दिखाऊपणा आला, या स्थित्यंतराची जबाबदारी ब्रिटिश राज्यकर्त्यांकडे आहे, हा केवळ कायदे आझमचा पराक्रम नाहीं. या दिखाऊपणाचें त्यांना प्रेम नसल्याचें सध्यांचे व माजी व्हाइसरॉय आणि भारतमंत्री यांच्या कांहीं उद्गारावरून म्हणावें लागतें.

## एकीचे प्रयत्न कां फसतात ?

१९२७ पासून पुढच्या कांहीं वर्षांत मुसलमानांच्या निरनिराळ्या पक्षांचें व हिंदू–मुसलमानांचें ऐक्य साधण्यासाठीं बरेच प्रयत्न झाले. १९२४ सालीं या कार्याप्रीत्यर्थ म. गांधींनीं दिल्लीस पहिला २१ दिवसाचा उपवास मौलाना महंमद अलींच्या घरीं केला. त्यानंतर मुंबईस एक सर्व पक्षांची परिषद भरविण्यांत आली. लखनौस मुसलमानांनीं आपसांतलें द्वैत मोडण्याकरितां दोनदां सगळीकडच्या पुढाऱ्यांना एकत्र बोलावून पाहिलें. मियाँ जीनांनीं मध्यंतरीं सवता सुभा गाडून टाकण्याकरितां चौदा मागण्यांची घोषणा केली होती. सवतासुभा जावा, अशी १९२६ नंतर कांहीं वर्षें जिनांची प्रामाणिक समजूत होती. सवता सुभा हें मुसलमानांना भूषण नसून एक प्रकारें त्यांच्या देशभक्तीचा कलंक आहे, अशी भावना लखनौच्या एका परिषदेंत सर अली इमाम यांनीं अतिशय स्पष्टपणें उघड करून दाखविली. 'आपण, १९०६ सालीं मुस्लिम लीगचें जें शिष्टमंडळ मिंटोसाहेबांना भेटलें, त्यांत होतो. तेव्हां सवत्या सुभ्याची मागणी करण्यांत आपली फार मोठी फसवणूक व चूक झाली. मुसलमान जर जात्यंधता

सोडून देतील तर जातिधर्मातीत निर्भेळ देशभक्ति त्याना सहज तारील. हिंदू समाजाचें भय बाळगण्याची जरूर नाहीं. सवत्या सुभ्याच्या ऐवजीं संयुक्त निवडणूक व राखीव संख्या ही एक युक्ति सुचविली गेली आहे. परंतु या युक्तीनें मुसलमानांचा देशभक्तीविषयक कमकुवतपणा झांकला जात नाहीं. हिंदूंचा विश्वास संपादन करून त्यांच्या बहुमतांनीं हिंदुस्थानांत राज्यकारभारामध्यें सर्वत्र मुसलमान देशभक्तांची भरती व चलती होण्याला नियमित संख्येचा अडथळा ठेवणें योग्य नाहीं. व नियमित संख्येच्या राखीव जागा म्हणजे मुसलमान हिंदुस्थानांत परके असल्याची साक्ष असून ती भूषणावह नाहीं,' अशा अर्थाची भाषा तेव्हां सर अली इमाम यांनीं वापरली. परंतु आजच्या ब्रिटिश राज्यकारभारांत विभक्तपणा हेंच कायद्याचें कलम ठरलें असल्यामुळें त्याचा लोभ मुसलमानांनी सोडूं नये हें स्वाभाविक आहे. त्या लोभाचें 'पाकिस्तान' हें एक फळ आहे. विभक्तपणानें लाभणाऱ्या महत्त्वाचें डॉ० आंबेडकर हें दुसरें उदाहरण आहे. डॉ० आंबेडकरांच्या गुणांचीं माणसें हिंदू समाजांत पुष्कळ आहेत, पण या समाजांतलि अस्पृश्य वर्गाचे म्हणून त्यांच्या वांटणिला जें महत्त्व आलें आहे, तें अस्पृश्यांना विभक्त करून राजकीय महत्त्वाच्या देणगीनें हा विभक्तपणा त्या गटाच्या पचनी पाडण्याच्या उद्योगाचें फळ आहे, असें कुणालाहि विचार केला असतां कबूल करावें लागेल.

## हिंदुमहासभेची प्रतिक्रिया आणि काँग्रेसची कोती दृष्टि.

मुस्लिम लीगची औलाद वाटण्यासारखी जी हिंदुसभा तिनें पाकिस्तानाच्या कल्पनेला बळ चढूं देण्याला मदत केली असून काँग्रेसच्या चुकानीं जीनांना पाकिस्तानच्या तारा ताणून वाजवायला संधी दिली. काँग्रेस ही राष्ट्रीय म्हणजे जातिधर्मातित राहून देशाच्या कल्याणाची काळजी वाहणारी, त्या कल्याणासाठीं हालअपेष्टा सोसणारी संस्था असली तरी तिच्या गोटांतील सारेच हिंदू गांधीइतक्या उदारवृत्तीचे नाहींत. नुकतेच सुटलेले डॉ. महमूद हे १५।१६ वर्षें अव्याहतपणें काँग्रेसच्या कार्यकारिणीचे [ वर्किंग कमेटीचे ] सभासद असतां बिहार प्रांतामध्यें त्यांना मुख्य प्रधानाच्या जागेवर बसविण्याची दानत काँग्रेसवाल्यांनीं दाखविली नाहीं ! डॉ. महमूद यांच्या मानानें

लुंग्यासुंग्या ठरणाऱ्या एका हिंदूला मुख्य प्रधानाची जागा देण्यांत आली. कॉंग्रेसचे अभिमानी मुसलमानसुद्धां ही गोष्ट जळफळाटानें सांगतात. दुसरी गोष्ट अगदीं ताजी आहे व ती अलाहाबाद म्युनिसिपालटीच्या मुख्य अधिकाऱ्याच्या [ Chif officer ] नेमणुकीची आहे. कॉंग्रेसवाल्यांच्या कोत्या दृष्टीमुळें वेळोवेळीं मुसलमानसंबंधांत जे दोष घडले त्या पराच्या कावळयांचा कलकलाट मुस्लिम लीगच्या द्वारें लोकांना सतावीत असतो. मुसलमानांच्या अंतरंगांत पेरल्या गेलेल्या संशयाचीं पाळेंमुळें खणलीं जाण्याकरितां कॉंग्रेसवाल्या हिंदूंनीं आपल्या प्रकृतीची पूर्ण दुरुस्ती न केल्यामुळेंच मुसलमान संशयमुक्त झालेला नाहीं. हिंदूबद्दल मुसलमानांना वाटणाऱ्या अढीचीं कारणें मुळांत खरीं असोत वा नसोत हिंदूमहासभा त्यांना खरेपणा आणूं पहात आहे व या विषयाची जटिलता वाढण्याला ब्रिटिशांचें संदिग्ध धोरणहि बरेंच जबाबदार आहे.

## मुसलमानांचे कायदेमंडळांतील राष्ट्रीयत्व

या संबंधांत आणखी कांहीं गोष्टी लक्षांत ठेवणें अवश्य आहे. मुसलमानांच्या सवत्या सुभ्याला १९१६ सालीं कॉंग्रेसकडून मान्यता दिली गेली. मुसलमान हें निराळें राष्ट्र असल्याची कबुली हिंदुमहासभेच्या अध्यक्षानें एकदां देऊन टाकली आहे. तथापि मुसलमानांनीं अराष्ट्रीय वर्तन केलेलें नाहीं. १९१० पासून पुढच्या काळांतील कायदेमंडळाच्या बैठकीचें अहवाल तपासल्यास मुसलमानांनीं जातवारीच्या तत्त्वान्वयें मतें दिल्याचें उदाहरण सांपडेलसें वाटत नाहीं. याची एक कसोटी म्हणजे दडपशाहीचे कायदे. या कायद्यांना पुष्कळ मुसलमानांनीं विरोध केला तर पुष्कळ हिंदूनीं त्या कायद्याच्या वतीनें हात उचलले ! हिंदु हा एकजात राष्ट्रीय बाण्याचा नाहीं, याची साक्ष आणखी कोणती हवी ?

## हिंदू स्त्रिया, देवदेवस्थानें आणि मुसलमान

मुसलमान लोक हिंदूंच्या बायका पळवितात, बाटवितात असा आणखी एक आरोप उच्चारला जातो. हिंदूंनीं या बायकांचा इतिहास पहावा. घरांतील जांचानें कंटाळून बाहेर पडलेल्या किंवा नवऱ्यानें, दीरानें हांकलून

दिलेल्या बायका मुसलमानांच्या हातीं पडतात. बंगालमध्यें ही धामधूम विशेष ऐकूं येते. कलकत्ता हायकोर्टाकडे नुकतेच असे तीन खटले आले होते. हिंदु बायकांनीं इस्लामची दीक्षा घेऊन पहिल्या हिंदु लग्नाच्या जन्मठेप काळ्या पाण्यांतून स्वतःची सुटका करून घेतली, असा ह्या खटल्यांचा निष्कर्ष आहे. हिंदूंनीं आपलें घर स्वच्छ करावें, असें या खटल्याचें रहस्य आहे. नुसती ध्येयवादाची शाब्दिक मोहिनी मनुष्याला सुखी करूं शकत नाहीं. विवाहाच्या ध्येयाचें पावित्र्य स्त्रीनें संभाळावें, मग तिचा नवऱ्याकडून किंवा दीरनणंदांकडून कितीहि छळ झाला तरी चालेल, या एकतर्फी विचारसरणीनें व्यवहार चालत नाहीं. मुसलमान बनल्यानें ह्या स्त्रीला सुखाचें राज्य मिळतें असें नसलें तरी विवाहापुरतें तिला पुष्कळच स्वातंत्र्य लाभतें. हिंदुधर्मानें बायकांना इस्लामसारखी मोकळीक ठेवलेली नाहीं. हिंदूंनीं आपल्या धार्मिक व्यवस्थेंतील दोष झाडून टाकल्यास त्याची बायका गमावण्याची आपत्ती टळेल. हिंदु बायका व त्यांना पळविणारे मुसलमान हीं दोन्हीं साधारणपणें खालच्या वर्गांतील असतात. देवदेवळांच्या भ्रष्टाकाराचा गवगवा अशाच मासल्याचा आहे. एरव्हीं देवांची व देवळांची आंच हिंदू शिक्षितांना कितीशी आहे? घरांतले देव तर पिढीदरपिढीस ब्राह्मण घरांतूनहि उठत चालले आहेत. हिंदू वैदिक विधिनिषेधांना मूठमाती देण्याचें काम चालूं आहे, व देवदेवळांच्या उपेक्षेची गुन्हेगारी जेवढ्या प्रमाणांत ब्राह्मणांच्या पदरीं बांधली जाऊं शकते, तेवढी इतर हिंदूंच्या पदरीं बांधली जाणें शक्य नाहीं. चमत्कार मात्र असा कीं, हिंदू देवांची मुसलमान विटंबना करतो म्हणून आकांडतांडव करणारा हाच वर्ग आहे. 'हिंदूंना आपल्या देवाचें भय किती वाटतें' याचें प्रत्यंतर गेल्या गणेशोत्सवाच्या मिरवणुकींतील एका प्रेतयात्रेनें पटविलेंच आहे. अगणित देव व ते कुठें पडले असतील, कोणत्या अवस्थेंत असतील याची हिंदूला बहुधा दाद नसते, तशी तऱ्हा मुसलमान पीरांची सुद्धां आहे. दगडाचा देव करण्याची हिंदू किमया आतां वाटेल त्या थडग्याचा पीर बनवितांना मुसलमानांनीं उचलली आहे. राजकीय सत्तेच्या वांटणीसाठीं दोन्ही पक्ष धर्माची कांस धरूं पाहात आहेत. दोघेही मूळच्या धर्मापासून दूर चालले आहेत. मुसलमानांच्या स्वधर्मप्रियतेची परीक्षा दाढींत आहे. दाढी ही धार्मिकतेची निशाणी आपल्या चेहऱ्या-

वर मिरविणारे मुसलमान दिवसानुदिवस कमी कमी होत असून कायदे-आझमनें तर या निशाणीला केव्हांच रजा दिलेली आहे.

## मुस्लिम लीगच्या महतीचा आलेख

जातवारीच्या चढा-ओढींचा इतिहास पाहिल्या लेखांत नमूद केला होता. ब्रिटिश राज्यव्यवस्थेचें हें एक फळ असून ती राज्यव्यवस्था असेपर्यंत त्या फळाचा विपार कमी होण्याचा संभव नाहीं, असें गांधीजी अलीकडे प्रतिपादन करूं लागले आहेत. वस्तुतः मुस्लीम लीग ही मुसलमानाची एकच एक संस्था नाहीं. मुसलमानांतिल शिया, सुनी, वहाबी, अहमदीय वगैरे धर्मपंथ सोडल्यास वायव्य सरहद्दीचा खुदाइ खिदमतगार, बलुचिस्तानांतील वतनपक्ष, पंजाबांतील अहरार, पंजाब-संयुक्त प्रांतांतील खाकसार, शिवाय जामियत उल-उलेमा, राष्ट्रीय मुस्लिम किंवा आझाद मुसलमान, मजलिस, असे त्या समाजांत किती तरी पक्ष आहेत. पंजाबांत मुस्लीम लीगचें वर्चस्व काल-परवा-पर्यंत नव्हतें. सर सिकंदर हयातखानांच्या मागून लीगचें प्रस्थ वाढलें, पण हल्लींच्या मुख्य प्रधानानें तें झिडकारलें. बंगालमध्यें कृषक प्रजापक्षानें मुस्लिम लीगच्या उमेदवारांचा निवडणूकीच्या वेळी नक्षा उतरविला, सिंधमध्यें मुस्लिम लीगला आपली मिठी घट्ट बसवितां आलेली नाहीं. वायव्य सीमा प्रांतांत शेंकडा ९५ टक्के मुसलमान आहेत तर सिंधमध्यें ९० टक्के आहेत. त्या ठिकाणीं मुस्लिम लीगची डाळ शिजत नाहीं, तरी सुद्धां मुस्लिम लीगची महति दिसते. याचें कारण तिच्या विषयींची ब्रिटिशांची मेहेर नजर हेंच होय.

## जातीय पक्षांना सरकारी मान्यता—एक डावपेंच.

महायुद्ध सुरू होतांच देशांतील पक्षोपपक्षांच्या यादींत मुस्लिम लीगचें नांव झळकलें. कायदे आझम या मान्यतेनें कमालीचा संतोष पावले. थोड्या दिवसांनीं लिनालियगो साहेबांना हिंदुमहासभेचें स्मरण होऊन त्या संस्थेचा उच्चार करण्यांत आला. मग त्या सभेच्या अध्यक्षाला स्वर्ग दोन बोटें उरला! कॉंग्रेस या लढाऊ पक्षाशीं विरोध बाळगणारांचें महत्त्व या वेळीं जगापुढें मांडण्यांत न्यायबुद्धि होती कां राजकीय डावपेंच होते हें सहज कळणारें

आहे. हे डावपेंच जुनेच आहेत. सत्तेमुळें ते यशस्वी होतात. मागें एकदां हिंदु-मुसलमानांच्या ऐक्यासाठीं उभय पक्षांच्या प्रतिनिधींची कलकत्त्यास बैठक चालू असतां मुसलमानांच्या पदरांत अनपेक्षितपणें कांहीं हक्काचें दान सरकारमार्फत पडून ती बैठक उधळली गेली. सर सॅम्युअल होर यांनीं जातवारीचा लवाद-निवाडा न्यायाचा [ Judicial ] नसून राजकीय [ Political ] स्वरूपाचा असल्याचें गोलमेजाच्या एका हिंदू व्यापारी इसमाला स्पष्ट सांगितल्याची कथा पुष्कळांना ठाऊक आहे. मुस्लीम लीगचे पाहिले पुढारी मागें ढकलून नव्या पुढाऱ्यांना सरकारनें पुढें आणल्याचे तीन चार प्रसंग आहेत. जो स्वातंत्र्याची लालसा दाखवील तो नालायक, अशा तोडग्यानें मुस्लिम पुढाऱ्याची निवड केली जात असते. उदार राष्ट्रीय विचाराच्या पापानिमित्त खुद्द जीनांना कांहीं काळ अज्ञातवासांत रखडण्याची पाळी आली होती. पण इंग्रज राज्यकर्ता स्वतःचें बळ ओळखूनच या पक्षोपपक्षांची सोयीप्रमाणें जोपासना करीत असतो. जोंवर इतर पक्ष राजकीय पारतंत्र्याला कंटाळलेले नाहींत व राज्यकर्त्यांच्या मेहेरबानीला भाळणारे आहेत तोंवर कॉंग्रेसला त्यांच्याशीं दादापुरता करीत रहाणें भाग आहे. गांधी जिनांची मनधरणी करतात ती जीनामध्यें स्वयंभू थोरपणा आहे म्हणून नव्हे तर राज्यकर्त्यांनीं त्यांच्या संस्थेला थोरवी दिली आहे म्हणून त्यांच्या मनोगताची आर्जवानें गांधी विचारपूस करतात, हा मुद्दा स्वयंसिद्ध आहे. ब्रिटिश राज्यकर्तृत्वाच्या विशिष्ट धोरणामुळें कॉंग्रेसभोंवतीं किती तरी पक्षांचीं विघ्नें उभीं झालीं आहेत. जोंवर तिसरा सत्ताधारी पक्ष उपस्थित आहे, तोंवर हें असेंच चालावयाचें.

### धर्मभेदानें भिन्नराष्ट्रत्व येत नाहीं.

एकदां हिंदूशीं पूर्ण विश्वासानें व खेळीमेळीनें वागणारा मुसलमान आज आपलें वेगळें राष्ट्र पाहिजे असा हट्ट धरण्याइतका कां बिथरलेला दिसतो, याची बरीच मीमांसा वर केली आहे. आधुनिक अर्थात ब्रिटिश हिंदी राजकारणाचा हा परिणाम आहे, पण हा परिणाम बहुतांशीं दिखाऊ आहे. पण त्यानें उत्पन्न केलेल्या कांहीं कल्पना धरून चालण्याची हिंदु प्रकृति घातुक आहे. निराळया स्वतंत्र राष्ट्राचा संकल्प गोलतांना आपल्या भेद-

भावाचा जो तपशील मुसलमानातर्फें पुढें येतो, त्यांतली एकही गोष्ट खरी नाहीं. पिंड [ Race ], धर्म, भाषा, संस्कृति इत्यादिकांतील फक्त धर्म हाच काय तो भेदभावाचा मुख्य भाग आहे. उर्दु ही एकट्या मुसलमानांची भाषा नाहीं. तिच्यासाठीं हिंदूंची बुद्धिमत्ता आजवर मुसलमानांप्रमाणेंच खपली असून आजहि तिनें उर्दूचा त्याग केलेला नाही. हिंदी मुसलमान हे बाटलेले हिंदूच असल्यामुळें त्यांचा पिंड निराळा नाहीं. हिंदु-मुसलमानांत रोजच्या व्यवहाराचे रीतरिवाज भिन्न नाहींत. धर्मांचा फरक आहे, पण धर्मांच्या फरकाची हिंदूंना जैन बौद्धांनीं ओळख करून दिलेली आहे. हे दोन संप्रदाय वेदाला मानीत नाहींत. शैव वैष्णव वेदांना मान्यता देतात, पण त्यांचें उपासनाकांड वैदिक नाहीं. जैन बौद्धांच्या मूळ धर्मसंस्थापकाची गणना हिंदूंनीं क्वचित् अवतारांतही केली आहे. अल्लोपनिषदासारखे ग्रंथ लिहून हिंदूंनीं मुसलमानांविषयीं आपुलकी दाखविली असें म्हणावयास हरकत नाहीं. केवळ धर्माच्या भेदानें कोणताही समाज राष्ट्र म्हणवून घेण्याच्या योग्यतेस चढत नाहीं. मुसलमान मूर्ति फोडतो, हिंदु मूर्ति हालवून नाहींशा करतो. जैन—बौद्धांच्या देवळांतून असा प्रकार घडला असल्याशिवाय हिंदूंच्या देवदेवता दिसल्याच नुसत्या. मुसलमानांच्या अंतरंगांतील मूळ पिंडाचें हिंदुत्व मेलेलें नसून हिंदूंच्या आचारविचारांत संसर्गानें इस्लाम शिरलेला आहे. याकरितां सूक्ष्म भेदाऐवजीं स्थूल साम्यावर दृष्टि देऊन पुढचा मार्ग आक्रमिला पाहिजे.

जातवारीचे दंगे हा एक ब्रिटिश राजवटीचा विशेष आहे. मुसलमानांचें राज्य हिंदुस्थानांत जवळ जवळ सहाशें वर्षे असतांहि हिंदु–मुसलमानांचे आजच्यासारखे दंगे झाल्याचे दाखले इतिहासामध्यें सांपडत नाहींत. ब्रिटिशांनीं सर्व धर्मांच्या रीतिरिवाजांचें संरक्षण करण्याचें व्रत स्वीकारलें व दंग्यांच्या इतिहासाचा छडा लावीत गेल्यास या व्रतामध्यें दंग्यांचें बीज असल्याचा सुगावा लागतो. मुसलमानी सत्तेखालीं बकेईदीच्या सणांत गाईची कुरबानी किती प्रमाणांत व कोणत्या स्थळीं होत असे, याचा पत्ता काढणें फारच कठीण जातें; उलट अशा कुरबानीबद्दल मोगल सम्राटांची प्रतिकूलता असल्याचा एक अगदीं अलीकडील पुरावा पाहिला म्हणजे गाईची कुरबानी होत नसावी व होत असलीच तर अगदीं तुरळक होत असावी, असें म्हणावें लागतें. १८५७ सालच्या ऑगस्ट महिन्यांत बकेईदचा सण उगवला. त्या वेळीं दिल्ली शहराच्या तटामागून हिंदु–मुसलमान फौजा एकदिलानें बादशहाच्या निशाणाखालीं बाहेर वेढा घालून बसलेल्या इंग्रज लष्कराशीं झुंजत होत्या. बकेइदीनिमित्त गोवध करवून हिंदु–मुसलमान शिपायांमध्यें दिल्ली शहरामध्यें बेबनाव उत्पन्न करावा, अशा इराद्यानें इंग्रजांतर्फेचें कांहीं माथेफिरू इस्लामी धर्मपंडित दिल्लींत गेले व त्यांनीं गोवध केल्याशिवाय ही ईद खुदाला मंजूर होणार नाहीं असा मंत्र दिल्लीच्या अनेक मुसलमानांना पढवून गोवधाची तयारी केली. ती पाहून हिंदू फौजा बिथरण्याचा योग दिसूं लागला. बादशहाच्या कानावर ही गोष्ट जातांच त्यानें तावडतोब गोवधाची चिथावणी देणाऱ्या इसमांना पकडून तोफेच्या तोंडी चढविलें आणि गोवध बंद केला. आपले पूर्वज गोवधाला प्रोत्साहन

देणारे नव्हते, हा मुद्दा या प्रसंगीं बादशहाच्या समोर होता. अलीकडे गोवधावरून पुष्कळदां दंगे झाले आहेत हें लक्षांत घेतलें, म्हणजे वरील माहितीचें महत्त्व निराळें सांगावयास नको. गोवधाच्या इस्लामी हक्काला मुसलमानी अंमलाबाहेर पडलेल्या किंवा इंग्रजांनीं काढलेल्या प्रदेशांत लष्करी संरक्षण देण्यांत येऊं लागलें व असें संरक्षणच मुसलमानांविरुद्ध हिंदूंनीं उठण्याचें कारण होऊन बसलें, अशा कथा १७८५ पूर्वीच्या इंग्रजांनीं सुरू केलेल्या हिंदी कारभाराच्या इतिहासांत आहेत.

इंग्रजाचा अंमल साऱ्या हिंदुस्थानांत पक्का झाल्यावर १८८५ नंतर गोवधानिमित्त हिंदु-मुसलमान एकमेकांच्या रक्ताचा सडा पाडूं लागल्याचीं प्रकरणें उदयास येत चाललीं. त्यापूर्वीं हिंदूंनीं गोरक्षणाची चळवळ विशेष अगत्यानें हातीं घेतल्याचा पुरावा नाहीं. '१८८५ नंतर' हा कालखंड मुद्दाम लक्षांत ठेवायला पाहिजे. कॉंग्रेसची स्थापना १८८५ मध्यें झाली. तथापि हिंदूंचा राष्ट्रवाद या वर्षाच्या आधींपासून राज्यकर्त्यांच्या अनुभवास येत चालल्यामुळें ते आपल्या राज्याचा आधार म्हणून मुसलमान समाजाला बगलेंत मारण्याचा उद्योग करूं लागले होते. गोवधाचे दंगे हा त्या उद्योगांतलाच एक भाग आहे. पुढें कांहीं वर्षांनीं मशीदीसमोर वाद्यें वाजविलीं गेल्यास मुसलमान दंगे करूं लागले. महाराष्ट्रांत असा पहिला दंगा बेळगांवास १८९० सालीं झाला. १८९१ मध्यें दंग्यांच्या लहरीनें काठेवाडात प्रवेश केला. १८९३ मध्यें ही लहर मुंबई शहरांत आली व हिंदु-मुसलमानांच्या बेबनावाचें भयंकर स्वरूप सर्वांना कळलें. याच्या आधीं १८७२ सालीं एका पारशी वृत्तपत्रांत महंमद पैगंबराचें चित्र छापल्यावरून मुसलमानांनीं पारशी समाजाची सुमारें आठवडाभर मुंबई शहरांत लांडगेतोड चालविली होती. १८९३ नंतर १९२९ पर्यंत मुंबई शहराला दंग्याच्या आगीनें पछाडलें नव्हतें, म्हणजे मुळींच दंगे झालें नाहींत असा याचा अर्थ नव्हे. १९०८-०९-१० वगैरे सालीं मुंबईच्या शिया सुनी मुसलमानांनीं ताबुताच्या मिरवणुकीवरून एकमेकांचे मुडदे पाडण्याचा तडाखा लावला होता. इतका कीं, लष्करी पहाऱ्याशिवाय तो ओसरत नसे. पण या वर्षांत केव्हां तरी गिरणीकामगारांचेहि दंगे झालेले आहेत. पण हिंदु-मुसलमानांचे दंगे ही घटना वरच्यापेक्षां निराळी असून तिनें गेल्या चाळीस वर्षांत

या देशांत चांगलीच सोय लागून घेतलेली आहे. गोवधाच्या संबंधांत हें लक्षांत ठेवणें अवश्य आहे. हिंदुस्थानांत ठिकठिकाणच्या कत्तलखान्यांतून जो गोवध किंवा पशुवध घडतो तो मुसलमानांची जिव्हा तृप्त करण्यासाठीं होत नाहीं. गाईगुरांचा दैनिक संहार गोऱ्या लष्कराच्या पोटपूजेकरितां रोजच्या रोज होत असतां गो–भक्त हिंदू फक्त ईदच्या गोहिंसेकडेच लक्ष पुरवून आपली गोभक्ति साजरी करतात.

या दंग्यांचा प्रादुर्भाव १९०७ नंतर अतिशय जोरानें हिंदुस्थानभर झाला. १९०६ मध्यें मुस्लिम लीग अस्तित्वांत येऊन तिनें मुसलमान समाजाला राजकीय दृष्ट्या निराळें महत्त्व दिलें जाईल, असें इंग्रज राज्यकर्त्यांकडून अभिवचन घेतल्यावर दंग्यांचा प्रादुर्भाव व्हावा, हा योग अगदींच यदृच्छेचा असें म्हणतां येणार नाहीं. १९०५ मध्यें बंगालची फाळणी मुसलमानांच्या राजकीय उद्धारासाठीं करावयाची आहे, असा हेतु तेव्हांचे व्हाइसरॉय लॉर्ड कर्झन यांनीं उघड उघड जाहीर केला. त्यानंतर त्यांचे हस्तक बंगालचे एक फुल्लरसाहेब यांनीं मुसलमान ही आमची लाडकी बिबी असल्याचें सांगून त्या हेतूला दुजोरा दिला. ह्यानंतर बंगालमध्यें पुष्कळ शहरांतून एकामागून एक याप्रमाणें दंगे होत राहिले. हिंदुस्थानांत अन्यत्रहि त्याचा उपद्रव बाधला. १९२२ सालीं तुर्कस्तानच्या कमाल पाशांनीं खिलाफतीची आपल्या देशांत वासलात लावल्यानंतर जणूं काय तुर्कांचा सूड मुसलमान समाजानें हिंदू बांधवांवर उगवावा अशा रीतीनें जिकडे तिकडे दंग्यांची आग पेटविली. लजपतराय व पं. मालवीय या दोघांना हिंदु महासभेची संघटना करण्याची इच्छा याच काळांत झाली. मुसलमानांची एक संस्था प्रस्तुत काळांत मुस्लिम धर्माचा प्रचार आणि मुसलमानांची एकजूट निर्माण करण्यासाठीं अवतरलेली पाहून हिंदूंनीं शुद्धि–संघटनाचें कार्य हातीं घेतलें. हिंदु–मुसलमानांमधील तेढ सर्वत्र वाढली तरी इतकें मात्र खरें कीं, मुंबई शहराकडे या तेढीची संक्रांत १८९३ नंतर १९२९ पर्यंत वळलेली नव्हती. पण या वर्षीं या तेढीचे जें जें बीजारोपण झालें त्याचें निमित्त विचित्र आहे. पठाण लोक मुलें पळवितात या संशयानें मुंबईच्या नागरिकांना झपाटलें व हिंदु, मुसलमान, ख्रिस्ती वगैरे लोक पठाण दिसला कीं, त्यावर तुटून पडूं लागले. या

धामधुमींतून हिंदु-मुसलमानांचा दंगा उत्पन्न होईल, असें त्या काळांतील प्रसिद्ध अलीबंधूंपैकीं एकानें बोलायला आणि तसा दंगा माजायला एकच गांठ पडली ! दंगा सुरू झाला. या दंग्याचें मूळ कम्युनिस्ट पक्षाच्या कारस्थानांत असल्याचा गवगवा सरकारमार्फत माजविण्यांत आला. १९२९ चा दंगा सुमारें ३६ वर्षांच्या शांततेनंतर प्रथमच कांहींशा अकल्पित रीतीनें उद्भवल्यामुळें प्राणहानि व वित्तहानी पुष्कळच झाली. तेव्हांपासून दंगा हें मुंबईच्या जीवनांतलें एक अंगच होऊन राहिलें आहे. दीड दोन वर्षांनीं दंगा व्हावा असा नियमच झाल्यासारखा दिसतो. नाहीं म्हणायला लढाईचीं वर्षें या नियमाचा थोडासा अपवाद ठरतील. पण लढाईमुळेंच दंग्याच्या युक्त्या आणि हत्यारें यांत प्रगति झालेली आढळते.

दंग्याचा बंदोबस्त कसा करावयाचा हें सुद्धां आतां ठरून गेलें आहे. रात्रीं लोकांची रहदारी बंद करावयाची, लोकांचा जमाव होऊं द्यावयाचा नाहीं, त्यांना हत्यार बाळगायला बंदी करावयाची, गुण्ड म्हणून शेंकडों माणसांची धरपकड चालवावयाची, मोटारींतून लष्कराच्या व पोलिसांच्या टोळया चोंहोंकडे फिरत्या ठेवावयाच्या. जेथें दंग्याचा जोर दिसेल तेथें लष्करी पहारा बसवावयाचा, वगैरे बंदोबस्ताचे उपाय आतां सर्वांच्या माहितीचे झालेले आहेत. दंग्याचीं कारणें मात्र अगदीं अनिश्चित आहेत. एकदां दंगा पत्ते खेळणारे हिंदु–मुसलमान आपसांत भांडल्यावरून झाला. एकदां मशिदीनजीकच्या जुन्या हिंदु देवळाचा जीर्णोद्धार करूं द्यावयाचा नाहीं, म्हणून शहरभर दंगा पसरला. एकदां देवळांतील आरतीच्या घंटांनीं नजीकच्या मशिदींत प्रार्थना करणाऱ्या मुसलमानांचें डोकें उठलें व त्यांनीं दंगा आरंभला. येथें ही गोष्ट नमूद करावीशी वाटते कीं, मुंबई शहरांत सगळीकडे मशिदी बांधण्याची योजना मुसलमानांनीं आंखली होती, परंतु म्युनिसिपालटीच्या इतर सभासदांनीं त्या योजनेमागचा डाव आगाऊ अंदाजून तो उधळून लावला. नाहींतर दंग्याची भावना दृढमूल होण्याला अधिक अवकाश सांपडणें अशक्य नव्हतें. दंगे हिंदु–मुसलमानांत होतात, हें उघड आहे. या दोन्ही पक्षांत रक्तपात होत असतां त्यांनीं एकमेकांचें रक्षण केल्याचीं उदाहरणेंही घडत असतात. या स्थितीकडे बारीक नजर पुरविली तर धर्मभेद हेंच सर्वस्वीं दंग्याचें कारण समजतां येत नाहीं.

धर्मभेद हें या अनर्थाचें कारण असतें तर शहराच्या विशिष्ट मर्यादेबाहेर हा धर्मभेद हिंदु–मुसलमानांच्या व्यवहाराला कां नडूं नये ? मुंबईत दंगा सुरू असतां मुंबईनजीकच्या उपनगरांतून हिंदु–मुसलमानांचीं कामें नेहमीं-प्रमाणें पूर्ण शांततेनें व परस्परविश्वासानें चालतात. हें कोडें कसें उलगडा-वयाचें ? हिंदु किंवा मुसलमान हा जसा मुंबईत तसाच अन्यत्रदेखील आपल्या धर्माचा असतो. मग नजीकच्या अनर्थाला तो आपल्या भागामध्यें हातभार लावण्याला कां सरसावत नाहीं ? उपनगरें हीं कांही तरी दूर असतात. खुद्द मुंबईतल्या मुंबईत जे प्रकार अनुभवाला येतात, ते केवळ धर्मभेदामुळें दंगा होतो या कल्पनेला टिकूं देत नाहींत. १९२९ सालीं एस्प्लेनेड पोलिस कोर्टाच्या तळमजल्यातील एका कोठडींत हिंदु–मुसलमान गुण्ड एकत्र कोंडलेले पहाण्यांत आले. विशेष आश्चर्य हें कीं, ते मोठ्या गुण्यागोविंदानें एकमेकांची थट्टामस्करी करीत पत्त्यांचा डाव खेळत होते. त्यांना प्रश्न केला असतां एकानें उत्तर केलें कीं, ‘आतां हिंदुमुसलमान या जातिभेदाचा संबंध काय ? येथें आम्हीं सारेजण भाई बनलों आहों. आमच्या धर्माचा, जातीचा प्रभाव या कोठडीच्या बाहेर राहिला.’ पोलिसांनीं पकडून अटकेंत डांबल्यावर हिंदु हिंदु रहात नाहीं व मुसलमान मुसलमान रहात नाहीं, या चमत्काराची मीमांसा करणें कठिण आहे. हा चमत्कार नुसत्या कैदखान्यापुरताच नसून त्यांचा व्याप कैदखान्याबाहेरहि दिसतो. करफ्यूची हद्द सोडली कीं हिंदु-मुसलमानांचें धर्मवैर दिसेनासें होतें, हा त्या चमत्काराचाच व्याप समजावा लागतो. धोबतिलाव ते क्राफर्डमार्केट या रेषेच्या उत्तरेकडील भाग करफ्यूचा असेल तर त्यांतला हिंदु–मुसलमान आपल्या जातीबद्दल अत्यंत जागरूक असतो. क्राफर्ड बाजारांत हिंदूच्या जोडीनें एकाच दुकानांत माल विकत घेणारा मुसलमान काळबादेवीच्या परिसरांत मुसलमान ठरून वेळीं प्राणास मुकण्याचा त्यावर प्रसंग ओढवतो, तर त्याचा हिंदु सोबती अबदुर्रहमान रस्त्याकडे चुकून फिरकल्यास एखाद्या माथेफिरू मुसलमानाच्या सुऱ्याला तो बळी पड-ण्याचा संभव असतो. क्राफर्ड बाजारांत उपस्थित नसणारा धर्मभेदाचा वेताळ जवळच्या रस्त्यांतून आपली घातकी लीला करूं शकतो यांचें मर्म काय असलें पाहिजे याचा शोध करणें अवश्य आहे. दंग्यामध्यें मारले जाणारे प्रायः निर-पराध गरीब लोक असतात, हें प्रसिद्धच आहे. एखाद्या माणसाला एकटा दुकटा

आड जागीं तो गाफील स्थितींत आढळल्यास ठार करण्याची भावना कशामुळें उत्पन्न होते, विचार करण्यासारखा प्रश्न आहे. मुसलमानांच्या मनामध्यें स्वधर्मानुसार कदाचित् काफराचा जीव घेतल्याचें पुण्य पदरीं पडण्याचा आशा वाटत असेल. हिंदूंच्या धर्मांत परधर्मीयांचा प्राण घेण्याच्या सुकृताचा समावेश नसतांहि हिंदू मुसलमानांचें अनुकरण करतात, ही उट्टें फेडण्याची ऊर्मी म्हणतां येईल. हिंदु मुसलमानाला आपल्याहून अधिक क्रूर व पर्यायानें शूर मानतो. आपण मुसलमानापेक्षां जास्त दयावंत व परघातविमुख असाहि हिंदू स्वतः बद्दल निर्वाळा देण्याला मागेंपुढें पाहात नाहीं. परंतु दंग्यांतल्या वर्तनाची परीक्षा केल्यास हिंदू व मुसलमान यांच्या स्वभावांत विशेष फरक नाही, असाच निष्कर्ष काढावा लागतो. हिंदूंच्या गर्द वस्तींत एकट्यादुकट्या मुसलमानाला गांठून त्याचा प्राण घेण्यांत पुरुषार्थ कसला? उलट पक्षीं मुसलमानाच्या अंगीं शूरत्व चिकटवायला जावें तर तो सुद्धां हिंदूचा घात अशाच परिस्थितींत करतो, आणि पळ काढतो, दडी मारतो, तेव्हां त्यांचे शूरत्व खरें कसें? त्यानें हिंदूला आव्हान देऊन सावध करून मग त्यांच्यावर शस्त्र चालविलें असतें तर तो 'शूर' शब्दाचा योग्य धनी समजता आला असता. हिंदू पूर्वी लाठ्यांनीं मुसलमानाना ठेंचून काढीत असत, मुसलमान सुऱ्यांचा प्रयोग करीत आले. व हिंदूंनींही आतां त्यांची विद्या त्यांच्यावर उलटविण्याचा अभ्यास चालविला आहे. हिंदू काय, मुसलमान काय, दोघेही एकाच मातीचे, त्याच मातींचें अन्न खाणारे, एकाच हवापाण्यावर पोसलें जाणारे, एकमेकांच्या दीर्घकालीन सहवासानें सारख्याच विकारविचारांच्या संस्कारांत वाढलेले, यामुळें धर्माचा भेद त्यांच्या प्रकृतींत एकमेकांमध्यें अतिशय अंतर दिसण्याजोगा फरक उत्पन्न करण्याला समर्थ नसावा यांत नवल कसलें? क्रूरपणा किंवा शूरपणा हे दोन्ही विशेष दोन्ही समाजांत सारखेच दिसावे हें वरील गोष्टी लक्षांत ठेवल्यास क्रमप्राप्तच आहे.

हिंदु आपल्या वस्तींत सुरक्षितपणें असें सांगू शकतो कीं, मुसलमान हिंदूचा वेश घेऊन येतात व हिंदूंच्या प्राणांवर उठतात. उलट मुसलमान लोक आपल्या मोहल्ल्यांत हिंदू मुसलमानांच्या बेमालूम पेहरावानें फिरतात व मुसलमानाला भोसकतात अशा बातम्या एकमेकांत पिकवितात. परिणामी संशयामुळें

हिंदूंच्या हद्दीत प्रसंगीं हिंदूच प्राणास मुकतो व तिकडे मुसलमानाला याच कारणास्तव मुसलमानांच्या शस्त्रानें मरण्याची पाळी ओढवते. मुसलमानांच्या हातीं मुंबईतलि दूध पुरवठ्याचा धंदा फार मोठ्या प्रमाणांत आहे, तो बुडविण्याकरितां दुधांत विष मिसळल्याचा बोभाटा एकीकडून उठला, तर फळफळांवळांतून विष घातल्याची हाकाटी दुसऱ्या बाजूनें ऐकूं येतें आणि मौज अशी आहे कीं, याबद्दलच्या शक्याशक्यतेचा कोणत्याहि प्रकारें विचार न करतां चांगले शिकले सवरलेला, म्हणजे ज्यांच्या बुद्धीला विवेकाची दीक्षा मिळाली असावी असें समजलें जाते, अशा थोरवीचे लोकहि वरच्यासारख्या गोष्टींवर भरंवसा ठेऊन मोठ्या चवीनें त्यांचा काथ्याकूट आपसांत करतांना आढळतात ! शिकलेले पांढरपेशा वर्ग कसल्याहि बातम्यांचा अगदीं आतुर गिऱ्हाइक बनावा हे एक इंग्रजी शिक्षणयुगाचें चिंतनीय कौतुक आहे. बातम्यांची शक्याशक्यता, युक्तायुक्तता वगैरेबद्दल एकही क्षण वाया न घालवितां कळेल त्या बातमीचें संवादांत रुचीनें रवंथ करण्याची शिकल्यासवरलेल्यांची संवय हें एक कमालीच्या भेकडपणाचें लक्षण आहे. १९२३–२४ सालांत देशांत जिकडे तिकडे दंग्यांची लाट उसळल्यावर म. गांधींनीं आत्मशुध्द्यर्थ एक उपवास केल्याचें पुष्कळांच्या स्मरणांत असेल. त्या प्रसंगीं हिंदू–मुसलमानांच्या स्वभावाची त्यांनीं जीं लक्षणें सांगितली त्यांत हिंदु सरहा भेकड (Coward) आणि मुसलमान तसाच आडदांड मूजोर (bully) अशा ऽर्थाचीं वाक्यें आहेत. वरतीं एकंदर परिस्थिति ध्यानांत घेतम्यास खरीं असल्याचें दिसून येईल. मुसलमान आडमुठा कां, याची उपपत्ति थोडीशी त्याच्या दारिद्र्यांत व पूर्वपरंपरेंत सांपडण्याचा संभव आहे. दरिद्री हा सदैव जीवावर उदार असतो. हिंदुस्थानांतील मुसलमान हा लष्करी परंपरेंत वाढलेला असून ब्रिटिश आमदानीपूर्वी देशांतील एकमेकांशीं लढणाऱ्यां छोट्यामोठ्या राज्यांतील फौजांच्या आश्रयानें तो आपली उपजीविका करीत होता. शेती आणि व्यापार याकडे त्यानें कधीं अगत्यानें लक्षच दिलें नाहीं. त्यामुळें बेकारींत होरपळून वाटेल तें कृत्य करण्याला तो नेहमीं सज्ज असतो. मागल्या एका दंग्यांतील एका तरुण मुसलमानानें आपल्या कृत्याचा खुलासा पुढील प्रमाणें केला होता : 'हातावर पोट असल्यानें दंग्यांत लूट मिळाली तरी फायदा, न मिळाली व कदाचित् मारला गेलों तर सुटलों, हिंदूंचा खून केल्यास पुण्य आहेच व भात

सरकाराच्या कचाट्यात सांपडलों तर शिक्षेच्या मुदतींत सरकार पोटाला देईल.' अशा अर्थाचा तो खुलासा होता. ज्यांना नेकीने पोट भरण्याचा निश्चित् मार्ग आहे, असे मुसलमान सहसा दंग्यांत सामिल होत नाहींत, हें देखील लक्षांत ठेवण्यासारखें आहे. त्याची मुजोरी, शिरजोरी हा सुद्धां त्याच्या सर्वसामान्य बेकारीचा परिणाम गणल्यास चूक व्हावयाची नाहीं. हिंदूंतील गुंड थोडेसे याच मासल्याचे म्हणतां येतील.

पूर्वी सुचविलेंच आहेकीं, दंग्याच्या मुळाशीं धर्म हें केवळ नांवापुरतेंच एक कारण दिसतें. मुसलमानाचा धर्म निराळा असतांहि ज्या अर्थी दंगे फक्त इंग्रजी राज्यांतच उत्पन्न झाले, त्या अर्थी धर्मभेदाच्या निमित्तानें दंग्याच्या मागें राजकारणाचे खेळ आहेत, असा निकाल द्यावा लागतो. मुसलमानांना हिंदूंहून निराळे व वरचढ असे कांहीं हक्क या देशात असले पाहिजेत, ही भावना त्यांच्या ठिकाणीं गेल्या ४० वर्षांनच जोरावली आहे. प्रथम त्यांच्याकरितां निवडणुकीचा सवता सुभा नव्हता व ज्या काळांत तो नव्हता, त्या काळांत हिंदूंच्या मतानें मुसलमान गृहस्थ वेगवेगळ्या संस्थांतून निवडले गेल्याचीं उदाहरणें थोडीं थोडकीं नाहींत. परंतु पुढें ब्रिटिश राज्यकर्तृत्वानें त्यांना सवता सुभा देऊन हिंदूंशीं विभक्तपणानें वागण्यांत आपलें कल्याण असल्याची प्रवृत्ति उत्पन्न केली. सवत्या सुभ्याचे यासारखे दुष्परिणाम लक्षांत घेऊन एकदां स्वतः मि. जीनादेखील संयुक्त मतदार संघासाठीं प्रयत्न करीत होते. पण त्यावेळीं म्हणजे सुमारें २० वर्षांमागें जीनांचें लीगच्या कारभारांत विशेष प्रस्थ नव्हतें. एकदां तर त्यांनीं राजकारणाचा संन्यास घेऊन विलायतेस आपलें बिऱ्हाड बहुत काळ ठेवलें होतें. नंतर त्यांनीं मुसलमानांच्या विभक्तपणाचा पुरस्कार इतक्या जोरानें चालविला कीं, आतां प्रचंड मुसलमान संस्थेला ते अनभिषिक्त सुलतानासारखे वाटतात व जीनादेखील या गौरवाला रेसभरसुद्धां धक्का लागूं नये अशा दक्षतेनें वागतात. आपण हिंदी आहों, असें म्हणविण्याचा त्यांना तिटकारा वाटूं लागला आहे. आपण निराळे आहों व निराळेच रहाणार किंबहुना हिंदी राज्यव्यवस्थेंतहि आपलें स्थान निराळेंच व तेंहि अनियंत्रित असलें पाहिजे, ही भावना जगाला सयुक्तिक दिसण्याकरितां त्यांनीं गेल्या ७।८ वर्षांत एक विचारपरंपरा निर्माण केली आहे. त्या विचारपरंपरेचा

खल करण्याला ते सिद्ध नसतात, ही त्यांच्या वागणुकीची आणखी एक खुबी आहे. तसा प्रसंग आल्यास उडवाउडवी, कांगावा असल्या युक्त्यांचा अवलंब करून प्रतिपक्षाला कंटाळा आणून वाद सोडायला लावतात. मुळांत विभक्तपणाचें वारें ब्रिटिश राजनीतीनें उठविलें असल्यामुळें ब्रिटिश राज्यकर्त्यांना त्या वाऱ्याचा चालू सोसाटा संभाळणें भागच पडतें. एरव्हीं मुसलमानांची मनधरणी त्यांनीं इतकी जपून का करावी हें कोडें उलगडणें शक्य नाहीं. मुसलमान लोक रक्तपाताच्या, यादवीच्या धमक्या उघड उघड देत असतां ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं तिकडे लक्ष देण्याचें टाळलें. यादवीच्या धमक्याच देऊन ते मुसलमान थांबले नाहींत, तर बंगालमध्यें हल्लीं मुसलमानाच्या पुढाकारानें रक्तपात, जाळपोळ, लुटालूट, बाटवाबाटवी, स्त्रियांसंबंधाचे अत्याचार यांचा धुमाकूळ सुरू झाल्याच्या बातम्या दृष्टीस पडतात. ब्रिटिशांच्या राज्यसत्तेविरुद्ध जराशी चळवळ दिसली, कीं आपल्या लष्करी सामर्थ्याचा रुद्रावतार प्रकट करण्यास क्षणाचाहि विलंब न लावणारे ब्रिटिश राज्यकर्ते आपसांतल्या भयंकर स्वरूपाच्या वरच्यासारख्या मारामारीबद्दल आपल्या जागीं स्वस्थ राहतात, निदान प्रतिकाराच्या जलद हालचाली करीत नाहींत, वगैरे गोष्टी कानाडोळा करण्याजोग्या नाहींत. ब्रिटिशांना इतके दिवस आपल्या राज्यकारभाराच्या बळकटीसाठीं जो प्रकार सोयीचा वाटला, तो प्रकार हिंदी स्वराज्याला धातक ठरेल याची क्षिति बाळगण्याची ब्रिटिशांना आजवर गरज पडली नव्हती. हिंदु-मुसलमानाचा आपसांतील अविश्वास हा ब्रिटिश राज्यकर्तृत्वाच्या मजबुतीचा इतके दिवस आधार होता. गेल्या महायुद्धानंतर हिंदुस्थानच्या राज्याचा भार आपल्या डोक्यावरून उतरविण्याची ब्रिटिशाना जरूर वाटूं लागली. या जरुरीची कदाचित् त्यांनाहि फारशी अटकळ नसावी. त्या भारांतला हिंदु-मुसलमानांच्या अविश्वासाचा दोष आतां त्यांनाहि एका झटक्यांत काढून टाकणें दुष्कर झालें आहे. हा दोष आपला प्रताप कांहीं काळ गाजवून मग मावळेल अशीं आजचीं लक्षणें आहेत. ब्रिटिशांची रियासत समाप्तीच्या मार्गास लागलेली आहे. ती संपल्यावर बरींच वर्षें त्यांनीं उदयास आणिलेला हा मुसलमानांच्या तीव्र विभक्तपणाचा भस्मासुर त्या रियासतीचें तापदायक स्मरण देत राहील. ब्रिटिशांनीं हिंदुस्थानचें कोणतें हित केलें व कोणतें अहित केलें याचा

झाडा घेतांना प्रस्तुत अविश्वास हा त्यांच्या राजवटीचा भयावह दोष, असाच निर्णय इतिहासकाराला करावा लागेल. सांप्रत उठल्यासुटल्या ब्रिटिशांकडे धांव घेणारा मुसलमान—समाज देखील भविष्यकाळीं याच निर्णयाला पाठिंबा देईल. दंग्यातील माथेफिरूपणा मुसलमानाला देखील नुकसानींत लोटतो, यात त्याला न कळण्यासारखें काय आहे? पण त्याला कदाचित् आशा वाटत असावी कीं हिंदूला सतत भेडसावीत राहिल्यानें तो आपणाला कायमचा दबून वागायला शिकेल. या आशेला ब्रिटिशांचें राज्य उपयोगी पडलें. स्वराज्याच्या काळीं ब्रिटिशांच्या वर्चस्वाचा अभाव त्यांच्या वेड्या आशेला लयास नेऊन परस्पर-विश्वासाच्या मार्गावर त्यास आणील.

# हिंदी संस्थानें : : : ८

हिंदी स्वराज्याच्या साधनेला विघ्नाप्रमाणें बाधणाऱ्या अनेक घटनांपैकीं हिंदी संस्थानें ही एक महत्त्वाची घटना आहे. इंग्रजी राजवटींत हिंदी जनतेनें सुरू केलेल्या स्वराज्याच्या चळवळीचा आढावा घेतांना ही घटना विसरण्याइतकी सामान्य नाहीं. हिंदी राजेरजवाडयांच्या अस्तित्वानें वेळोवेळीं ब्रिटिश प्रजेच्या नशिबाला भलेबुरे हेलकावे दिलेले आहेत. हिंदुस्थानांत इंग्रजी राज्याची वाढ कशी झाली हा प्रश्न सोडवितांना हीं संस्थानें वारंवार मनासमोर येतात.

## हे स्व-राज्याचे अवशेष कीं त्याचीं स्मारकें ?

संस्थानें म्हणजे जुन्या स्वराज्याचे अवशेष असें समजण्याचा प्रघात आहे व अवशेष हा स्मारकासारखा असतो. आजच्या संस्थानांकडे पाहिल्यास जुनीं स्वराज्यें कशीं चालत असतील व त्यांमध्यें प्रजेच्या हिताचा कितीसा बोज राखला जात असेल, याची अटकळ सहज होऊं शकते. एकाद्या पराक्रमी पुरुषानें कुठला तरी मुलूख जिंकावा, त्याव आपला अधिकार स्थापावा आणि तो अधिकार टिकून राहण्याइतकें बळ निर्माण करावें, म्हणजे त्याचें राज्य चिरस्थायी होण्याला अडचण उरत नसे. तो एकदां पहिल्या संकटांतून निभावला कीं, दुसरे राजेरजवाडे त्याच्या मदतीची आशा धरून वागूं लागत, तोहि इतरांकडे हक्कानें मदतीची याचना करी; अशा रीतीनें हिंदी संस्थानें येथें उत्पन्न झालेलीं आहेत. हिंदुस्थानांत मुसलमानांचा शिरकाव होण्यापूर्वीं सगळा देश निरनिराळ्या राज्यांत विभागलेला होता व हीं राज्यें एकमेकांत सदैव झगडा करीत होतीं. महम्मद कासमानें प्रथम कांहीं राज्यें बुडविलीं. गझनीच्या महम्मदानें पुष्कळशा राज्यांना खिळखिळें

करून सोडलें. महम्मद घोरीनें पृथ्वीराज चव्हाण, जयचंद, यांचीं राज्यें नामशेष करून सोडलीं या धुमाकुळांतून राजस्थान, काठियावाड येथील बरींच राज्यें उदयास आलीं. त्यांचा इतिहास अवघा ६।७शें वर्षांचा आहे. मुसलमानांशीं शक्य तेव्हां लढावें, निरुपाय झाल्यास शरण जावें, अशी या राज्यांची तऱ्हा होती. पुढें मोगलांच्या कारकीर्दींत असाच प्रकार चालला होता. किती तरी राज्यें मोगलांचें अंकितत्व स्वीकारून जगलीं होतीं—मोगलांनीं इमानें इतबारें सेवा करीत जगलीं होतीं. मोगलाई मोडकळीस आली तेव्हां पंजाबांत शिखांचीं राज्यें निघालीं. दक्षिणेंत मराठ्यांचीं व मुसलमानांचीं नवीं राज्यें अस्तित्वांत आलीं. उत्तरेस गुजराथ व माळवा येथें मराठ्यांनीं आपल्या वर्चस्वाचीं कांहीं केंद्रें राखलीं हें निराळें सांगावयास नकोच.

## इंग्रजी अंमलांतील संस्थानांची घडण

इंग्रजांचा अंमल वाढत चालला तेव्हां पुनः एकवार संस्थानी सृष्टींत नवें—जुनें घडूं लागलें. मोगलांच्या दरबारांतील पुष्कळसे रजपूत मानकरी राजे इंग्रजांचे दोस्त बनले. पुण्याची मराठी सत्ता डळमळूं लागताच शिंदे, होळकर, गायकवाड, पवार, पटवर्धन प्रभृतींनीं रजपूत संस्थानांचा किता गिरविला! पंजाबांतील रणजितसिंगाचें राज्य धुळीस मिळालें. तरी त्यांच्या सत्तेला न मानणारीं कित्येक शीख संस्थानें इंग्रजांच्या आश्रयानें जगलीं. इंग्रजांच्या स्नेहामुळें रणजितसिंगाच्या मुख्यांतून काश्मीरचें स्वतंत्र राज्य बनलें. साताऱ्याच्या छत्रपतींचें नवें संस्थान पेशवाईच्या राखेंतून उगवलें. इंग्रजी स्थिरावल्यावर कित्येक संस्थानें अंदाधुंदीच्या सबबीवर खालसा करण्यांत आलीं. कित्येक दत्तक-प्रकरणाबाबतच्या इंग्रजांच्या धोरणानें रसातळाला गेलीं. नागपूर, झांशी, सातारा, अयोध्या वगैरे बरींच संस्थानें याप्रमाणें इंग्रजांनीं रद्द करून टाकलीं. मोगल—मराठ्यांच्या जिंकलेल्या राज्याचा वारसा म्हणून आलेलीं संस्थानें निराळीं व आपल्या मेहेरबानीचीं संस्थानें निराळीं असा श्लेष इंग्रजी मुत्सद्द्यांनीं आपल्या मनाशीं निश्चित केला होता. कित्येक संस्थानांकडे इंग्रज राज्यकर्ते मददगार दोस्त या नात्यानें तेव्हां पाहत होते. बलाढ्यापुढें नमतें घेऊन जगणें हें आजच्या अनेक संस्थानांचें मूळ आहे.

परंतु आज आपला पूर्वेतिहास विसरून किंवा बुद्धि-पुरस्सर डोळेझांआड करून हीं संस्थानें वागत आहेत.

## तह म्हणजे विलासाचे परवाने

इंग्रजांचें कंपनी-सरकार आपलें राज्य वाढवीत असतां जेवढे शत्रू कमी करतां येतील तेवढे साहजिकच कमी करीत होतें. मराठ्यांशीं युद्ध करतांना आणखी कोणाचें भय राहूं नये म्हणून त्यानें किती तरी संस्थानांशीं मित्रत्वाचे तह केले. तहांच्या द्वारें संस्थानांच्या रक्षणाची हमी आपण घेऊन त्यांचें लष्करी बळ कंपनी-सरकारनें तोडून टाकलें. प्रजेनें दंगा (किंवा बंडाळी) केल्यास त्यापासून बचाव करण्याची जोखीम इंग्रजांनीं पतकरली, संस्थानांमध्यें आपापसांत कलह माजण्याचा संभव नाहींसा केला व परचक्राच्या निवारणाची जबाबदारी त्यांनींच स्वीकारली. संस्थानांच्या मालकांना यामुळें चैनीशिवाय दुसरा उद्योगच उरला नाहीं. इंग्रजांची मर्जी मोडणार नाहीं अशा बेतानें यथेच्छ वर्तन करण्याचा, इंग्रजांशीं तह केल्यावर, जणूं काय या संस्थानी नरेशांना परवानाच मिळाला! १८५७पूर्वी औरस संतति नसल्यास संस्थानें खालसा होण्याचें भय इंग्रजी धोरणानें उत्पन्न झालें होतें, परंतु १८५७-नंतर तें नाहींसें होऊन नरेंद्रांना कसलीच चिंता उरली नाहीं. मग मनसोक्त विलास हें त्यांच्या जीवनाचें ध्येय होऊन राहावें यात नवल नाहीं. या बाबतींत नागपूरच्या शेवटच्या राजानें इंग्रजांच्या चौकशीला दिलेलें उत्तर ध्यानांत ठेवण्यासारखें आहे.—'राज्यकारभारांत लक्ष नाहीं, जिकडे तिकडे अव्यवस्था दिसते' याचा खुलासा करतांना त्यानें सांगितलें कीं, 'राज्य-व्यवस्था नीट नाहीं म्हणून प्रजेनें दंगाधोपा केल्यास इंग्रजांचें सामर्थ्य रक्षणाला आहेच; दुसरा कोणी आक्रमण करील, अशी स्थिति उरलेली नाहीं. मग सुचतील त्या उपायांनीं मीं आपल्या जिवाला स्वर्गसुखें कां पुरवूं नये?' हा खुलासा सगळ्या संस्थानिकांना सारखाच लागू पडणारा आहे. १८७५ सालीं बडोद्याच्या श्रीमंत मल्हाररावांना इंग्रजांनीं पदच्युत केलें तेव्हां पुण्याच्या सार्वजनिक सभेकडून गेलेल्या त्याबद्दलच्या अर्जात, संस्थानिकांवर कसलीच जबाबदारी नसल्यानें ते दुर्वृत्त होतात म्हणून त्यांना अखिलभारतीय राजकारणांत गुंतवावें म्हणजे त्यांची दृष्टि फांकेल, त्यांना

शहाणे होण्याची संधि मिळेल व ते सुधारतील, अशा अर्थाचा सल्ला नमूद केला होता परंतु ब्रिटिशांचें त्या वेळचें धोरण निराळें होतें. खालसा मुलूख व संस्थानी मुलूख यांचा आपसांत संबंध येऊं नये, अशी दक्षता आजवर त्यांजकडून बाळगली गेली.

## हिंदी स्वातंत्र्याचे अडथळे

वस्तुत: संस्थानिक व खालसांतील प्रजा यांचा संबंध नाहीं. खालसांतील प्रजेच्या स्थितीकडे संस्थानिकांनीं कधींच लक्ष दिलेलें नाहीं. परंतु खालसांतील प्रजेच्या पुढाऱ्यांनीं मात्र या राजेरजवाडयांविषयीं नेहमीं आपलेपणाची भावना ठेवलेली आहे. संस्थानें राहावीं, असेंच त्यांना वाटत आलें. महात्मा गांधी सुद्धां संस्थानांकडे प्रेमादराच्या वृत्तीनेंच पाहतात. कॉंग्रेसच्या कामगिरींत संस्थानांचा समावेश बहुत काळ नव्हता याचें कारण ही आपुलकीची भावनाच होय. संस्थानांचे अधिपती मात्र खालसांतील स्वराज्यविषयक चळवळीचा विचार विशेष प्रेमानें करीत नसावे असें मानण्याला जागा आहे. त्यांना आपला वर्गच निराळा वाटतो. त्याची योग्यता जन्मत:च श्रेष्ठ असून खालसांतील पुढाऱ्यांनीं त्याशीं स्पर्श करूं नये, किंबहुना त्याच्या वाटेसहि जाऊं नये, अशा कल्पनेची भाषा पुष्कळदां या नरेशांच्या तोंडून निघत असते. नेहरू–रिपोर्टाच्या वेळीं १९२८ सालीं सर तेजबहाद्दुर सप्रू व बिकानेरचे मागील महाराज यांच्यांत झालेला पत्रव्यवहार संस्थानिकांच्या मनोवृत्तीची साक्ष पटविणारा आहे.

## संस्थानिकांची जातच निराळी ?

राजवाड्यांत 'राणी' या बहुमानाच्या संज्ञेनें ओळखल्या जाणाऱ्या एका बाईच्या पोटीं डॉक्टर–परिचारिकांच्या सरंजामांत समारंभानें जन्मास येणाऱ्या मुलांत व खेड्यांतल्या झोपडींत केवळ आईच्या देखरेखीखालीं जन्मास येणाऱ्या मुलांत काय भेद असतो हें कळणें कठिण आहे. इंदूर संस्थानचे मूळ पुरुष मल्हारराव होळकर जन्मास आले तेव्हां कुणाला त्याची दादहि नसेल. त्यांचे वंशज मात्र सध्यां इतर सामान्य बहुजनांकडे आपण इतर मानवांहून श्रेष्ठ प्रतीच्या निराळ्या रक्तामांसाचे कोणी तरी आहों, अशा

दृष्टीनें पाहत असल्यास आश्चर्य कां वाटूं नये? मोठेपणा जन्माचा नसून जन्मानंतरच्या आयुष्यांत घडणाऱ्या कर्तबगारीचा असतो. याचें भान किंवा ज्ञान समाजांतील साध्या लहान लहान गर्भश्रीमंतांनाहि असत नाहीं; मग ज्यांच्याकडे लोकावर हुकमत गाजविण्याचा वारसा येतो त्यांना तें कोठून असणार? आपल्या हद्दींतील प्रजेपुरतें अनियंत्रित प्रभुत्व व अविवेकाला उत्तेजन देणारें तारुण्य, अशा स्थितींत गादीनशीन होणारांना प्रजेविषयीं बेपर्वाई उत्पन्न न झाल्यासच आश्चर्य म्हणतां येईल. सर्वच राजे उन्मार्गवर्ती दिसत नाहींत हें खरें; पण पुष्कळ संस्थानें फार लहान व क्षुद्र अवसानाचीं आहेत, हें सुद्धां ध्यानांत ठेवणें बरें.

## संस्थानिकांचें संस्थानी स्वातंत्र्य !

आपण जन्मतः श्रेष्ठ आहों, येवढेंच नव्हे तर आपण स्वतंत्र आहों, अशीहि प्रौढी संस्थानिकांकडून पुष्कळदां मिरविली जाते. या प्रौढीची तपासणी केल्यास तिच्यांत फारसें तथ्य नसल्याचें दिसून येईल. ज्यांनीं एकदां मोगलांची किंवा मराठ्यांची नोकरी केली व ज्यांना आज ब्रिटिश अंमलापुढें नम्रता धारण करून वागावें लागतें, त्यांनीं स्वातंत्र्याची बढाई गाण्यांत स्वारस्य काय? गेल्या वीस वर्षांत संस्थानी राजांना गाद्या सोडून द्याव्या लागल्याचीं किती तरी उदाहरणें आहेत! तहनाम्यांत केव्हांहि फेरबदल होऊं शकत नाहीं, ही सदर राजेरजवाड्यांची कल्पना कींव येण्याजोगी आहे. तहनाम्यांत वेळोवेळीं इंग्रजी राज्यव्यवस्थेच्या सोयीनें फेरबदल झाले आहेत व उद्यां जरूर पडल्यास—अर्थात्च ही जरूर ब्रिटिश राज्यकर्त्यांना वाटली पाहिजे—आणखी फेरबदल होतीलहि. हिंदी राज्यकारभार खालसांतील स्वराज्यवादी पुढाऱ्यांच्या हवालीं करताना ब्रिटिशांनीं या तहनाम्यांना धक्का लावूं नये, ही राजेरजवाड्यांची इच्छा अज्ञानाची द्योतक आहे. कंपनी-सरकारबरोबर तह करतांना मोगलांशीं झालेल्या तहाच्या व्यवहाराची काळजी या राजेरजवाड्यांनीं बाळगल्याचा दाखला नाहीं. नव्या सामर्थ्या-पुढें मान लववून जिवंत राहण्याच्या पद्धतीला राजेरजवाड्यांच्या मतें इतकें पावित्र्य आज दिलें जातें याचें कारण उघड आहे हिंदुस्थानात होऊं घात-लेला स्वराज्याचा उदय परचक्रासारख्या अकस्मात् कोसळणाऱ्या सामर्थ्या-

च्या दूरें होणार नाहीं. ब्रिटिश राज्यकर्ते आणि त्यांच्या प्रजेंतील स्वराज्यासाठीं झगडणारे पुढारी यांच्यांतील तडजोडीनें तें स्वराज्य निर्माण व्हावयाचें आहे. ब्रिटिशांच्या हातून आपल्या हातीं देशाचा राज्यकारभार घेऊं पाहणारे हिंदी पुढारी संस्थानिकांना ब्रिटिशांहून जास्त परके वाटावे, ही या नरेशांची मनःस्थिति शोचनीय नाहीं असें कोण म्हणेल ?

## संस्थानी प्रजेची गुलामगिरी

संस्थानांत हिंदुस्थानची एकतृतीयांश प्रजा अडकलेली आहे. तिची हालहवाल करुणाजनक आहे. त्या प्रजेला आपला राजा देवाप्रमाणें किंवा पित्याप्रमाणें वाटतो. कित्येक संस्थानांतून प्रजेपैकीं कोणीहि राजवाड्याच्या परिसरांत घोड्यावर बसून किंवा छत्री घेऊन किंवा पायांत जोडा घालून जाऊं नये, असा रिवाज कालपरवांपर्यंत चालू होता. राजा अथवा राणी यांची गाडी येतांना दिसतांच पादत्राण बाजूस लोटून अदबीनें झुकून प्रजेनें वंदन करण्याचा प्रघात संस्थानांतून अद्यापि क्वचित् आढळतो. राजा किंवा राणी मेल्यास बाप अगर आई मेल्याप्रमाणें प्रजेंतील प्रत्येक पुरुषानें क्षौर केलेंच पाहिजे, असा दंडक पाळण्याची पद्धति कांहीं संस्थानांतून आहे—मग तो प्रजाजन कुठेंहि असो; तो संस्थानाबाहेर असला तरी त्यानें हा दंडक पाळण्याची अवश्यकता एकदां वाटत असे गुलामगिरीच्या या रीतीभातींचीं उदाहरणें आणखी पुष्कळच देतां येतील. शिक्षणाच्या अभावीं ‘ना विष्णुः पृथिवीपतिः’ या तत्त्वाची परीक्षा करण्याची प्रजेला सवडच नाहीं. संस्थानांचें मध्ययुगीन स्वरूप घालवावें यासाठीं अलीकडे खालसांतील प्रजेच्या संसर्गानें संस्थानी प्रजा उद्योग करूं लागली आहे. मागील युद्धानंतर कालमान फिरलें हें ओळखून संस्थानी नरेंद्रांनें एक महामंडळ ब्रिटिशांनीं उभारलें. आपणांला आज ना उद्यां हिंदी राज्यकारभार सोडावा लागणार आहे, तेव्हां या भवितव्याचें ज्ञान नरेशांना व्हावें, एकतंत्री हुकमत गाजविण्याचे दिवस संपत आले हें त्यांना कळावें, हा नरेंद्रमहामंडळाच्या स्थापनेचा उघड उद्देश आहे. प्रस्तुत मंडळाच्या बैठकी सुरू करतांना व्हाइसरॉयसाहेब त्यांना वारंवार या उद्देशाला धरून उपदेश करतात; कोणी नवीन राजा गादीवर बसायचा असल्यासहि, त्याला ‘अनियंत्रितपणानें वागण्याचा काळ गेला’ हा मंत्र

व्हाइसरॉयसाहेब ऐकवितात. बड्या संस्थानिकांचा पाहुणचार घेत असतां उभयपक्षीं होणाऱ्या भाषणांचे वेळीं गव्हर्नर–जनरल सौम्य शब्दांनीं 'कालमान ओळखून शहाणे व्हा' असें बोलण्याला चुकत नाहींत. परंतु संस्थानिकांचें पाऊल हलावें तसें हलत नाहीं. तेथील प्रजेची गुलामगिरी चालूच आहे. इलाज नाहीं म्हणून अनेक संस्थानांतून कायदेमंडळांचे देखावे उभे केले गेले आहेत. त्यांचा तादृश उपयोग होत नाहीं हें निराळें सांगावयास नकोच. सारांश, संस्थानें हीं मध्ययुगीन परिस्थितीचीं जिवंत स्मारकें होत असाच निष्कर्ष काढावा लागतो.

## संस्थानिकांना कालाचा इषारा

संस्थानें नष्ट व्हावीं असें म्हणणारा एक पक्ष हिंदुस्थानांत आहे. त्यांच्या सुधारणेची आशा नाहीं, तीं मोडून टाकणें हाच प्रगतीचा उपाय आहे, असें मानणारा हा पक्ष संख्येनें फार लहान आहे. कॉंग्रेसनें संस्थानांबद्दल आजवर सहानुभूति बाळगली. म. गांधीजी संस्थानें राखावीं असें म्हणणारांपैकीं एक आहेत. गांधीजींना व्यक्तिशः संस्थानिकहि मान देतात. गांधींनीं एकदां उपोषणाच्या सत्याग्रहाचा राजकोटास प्रयोग करून पाहिला; परंतु आपण चुकलों, अशी कबुली देऊन त्यांना हा फंद सोडावा लागला! कारणें कांहींहि असोत, इतकें मात्र खरें कीं, आज संस्थानिक–वर्ग स्वराज्याच्या मार्गांतील अडथळा होऊन बसला आहे, तो ब्रिटिशांनीं पतकरलेल्या अंजारणीगोंजारणीच्या धोरणाचाच परिणाम समजावा लागतो. आपण देशाभिमानांत खालसांतील लोकाग्रणींना हार जाणार नाहीं असा पुकारा संघटितपणें संस्थानिकांमार्फत अधूनमधून होत असला तरी त्यांनीं जोंवर आपला सवता सुभा कायम राखण्याचा हट्ट सोडलेला नाहीं, तोंवर त्यांचा देशाभिमान निराळ्या किंमतीनें स्वीकारणें भाग आहे. त्यांचा हट्ट सुटण्याची किल्ली ब्रिटिशांच्या धोरणांत असून, ती तशीच राहावी असा जर त्यांचा मनसुबा असेल तर हिंदुस्थानला स्वराज्य देण्याच्या इच्छेचा पोकळपणा वेगळा सिद्ध करावयाला नको. मोगल–मराठ्यांनंतर इंग्रजांच्या सत्तेशीं ज्यांनीं आपलें नशीब बांधून घेतलें त्यांना खालसांतील हिंदी प्रजेच्या पुढाऱ्यांच्या राज्यकर्तृत्वाशीं आपलें नशीब जोडण्याची इतकी दिक्कत कां वाटावी हेंच

समजत नाहीं; पण दिक्कत वाटते हें मात्र निःसंशय.

संस्थानिकांनां ब्रिटिश राज्याच्या उबेनें उत्पन्न होणाऱ्या स्वतःच्या बडेजावीबद्दलच्या कल्पना सोडून एकदां जगाकडे नजर टाकावी एकदां जर्मनींतहि पुष्कळ संस्थानें होतीं. त्यांचे भेद मोडून त्यांचा गठ्ठा केला तेव्हांच गेल्या पन्नास वर्षांतील बलाढ्य जर्मनी जन्मास आला. इटलींत संस्थानें होतीं, त्यांचा, पक्ष घेऊन आसपासचीं राष्ट्रें आपला स्वार्थ साधीत होतीं. 'अखंड इटली'ची [United Italy] मॅझिनी, कॅव्हूर प्रभृतींची चळवळ यशस्वी झाली तेव्हां बाकीचीं सगळीं संस्थानें काळाच्या उदरांत गेलीं. एका देशांतील संस्थानेंच काय पण छोटींछोटीं स्वतंत्र राष्ट्रेंहि टिकून राहण्याचा भरंवसा धरतां येत नाहीं असा काळ आलेला आहे. मोठाल्या अनेक राष्ट्रांतील एकतंत्री बादशाह्या गारद झाल्या, हा वृत्तांत जसा जुना तसाच नवाहि आहे. मानवी इतिहासाच्या घडामोडींचें तात्पर्य गळीं न उतरण्या-इतके संस्थानिक बुद्धीनें जड असतील तर त्यांच्या भवितव्याबद्दल विशेष आशा-वादानें विचार करणें शक्य नाहीं. संस्थानांची समजूत निघेना म्हणून म्हणजे ते अडून बसल्यामुळें १९३५ची राज्यघटना आजवर लटकत राहिली. कॉंग्रेसच्या प्रतिनिधींचें बहुमत झाल्यमुळें त्या घटनेचा प्रांतिक भाग कांहीं काळ अंमलांत आला. मध्यवर्ति सरकार नव्या घटनेप्रमाण अस्तित्वांत न येण्याला सर्वस्वीं संस्थानिकच जबाबदार आहेत. संस्थानी राजांना ब्रिटिश मुकुटाचा आधार कायमचा हवा आहे. या मुकुटाच्या महतीचा ब्रिटिश वसाहती व दक्षिण आयर्लंड येथील इतिहास या राजेलोकांना मोठा उद्बोधक होईल. त्यांतहि मौज अशी, कीं खुद्द ब्रिटिशांचें या मुकुटाविषयींचें अंतरंग पालटत असलें तरी शंभर वर्षांमागील त्याची महती येथील संस्था-निक आपल्या उराशीं बाळगूनच बसले आहेत! ब्रिटिश हे कर्ते व जागरूक असल्यामुळें ते तडजोडीच्या वेळीं नसत्या खुळांची मातब्बरी चालू देत नाहींत. ब्रिटिश बादशहाबद्दल निष्ठेची शपथ घ्यावी असला आग्रह सोडून जर कार्यभाग होत असेल तर ते तो आग्रहहि वेलाशक सोडून देतात संस्थानिकांनीं त्यांचें वळण घेऊन, आपल्या मनोरचनेंत बहुत काळ दबा धरून बसलेले खोट्या मानापमानाचे ग्रह हांकलून लावण्यांतच त्यांचें हित आहे. ब्रिटिश प्रजेचें स्वराज्य आतां टळत नाहीं. त्याची वाट अडविल्यास

विलंब होईल; पण विलंबानें कां होईना एकदां स्वराज्य झाल्यावर ज्यांच्या योगानें विलंब घडला त्यांचा परामर्श घेतला जाईल, हें न विसरणें संस्थानिकांच्या दृष्टीनें श्रेयस्कर ठरतें. संस्थानिकांनीं मोगलांनंतर जसे इंग्रज तसेच, इंग्रजांनंतर भावी हिंदी स्वराज्यकर्ते हेच आपले शरणस्थान आहेत असें मानावें, हें अगदीं सरळ आहे. आज तसें मानून चालण्यांतच निभाव आहे. स्वराज्याच्या इतिहासांत त्यांना विघ्न या नात्यानें आपली नोंद करून घ्यावयाची असल्यास त्यांनीं स्वतःचें नुकसान करून घेतलें, असेंच परिणामीं सिद्ध होईल.

# परिशिष्ट

## हिंदु-मुसलमान

मुसलमानांचें प्रत्येक कृत्य हिंदूंच्या अहिताचें, असा ग्रह हिंदू समाजांत दृढमूल होण्याचें एक प्रबळ कारण म्हणजे शाळांतून शिकविला जाणारा इतिहास हें होय. या इतिहासांत मुस्लिम रियासतीवर हिंदूंचा छळ—अनन्वित छळ व निरंतर छळ—या कल्पनेचा वज्रलेप शिक्का मारलेला दिसतो. लॉर्ड डलहौसी यांच्या वेळचे एक कौन्सिलर सर हेन्री ईलियट यांनीं मुसलमान राजांच्या बखरी गोळा करून त्यांच्या भाषांतराचीं आठ पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत. हा उद्योग जसा प्रचंड तसाच उपयुक्त घडला. मुसलमान राजाचा संगतवार इतिहास समकालीन बखरींच्या आधारानें या पुस्तकांत ग्रथित केलेला असून इतिहासाच्या जिज्ञासूंना त्याचा आश्रय करावा लागतो. याप्रमाणें सदर उद्योगाची थोरवी कबूल करूनहि त्यामागील प्रेरणा दृष्टीआड ढकलणें इष्ट नाहीं. डलहौसीची कारकीर्द १८४८ ते १८५६ या वर्षांतली. १८५७चें बंड अजून व्हावयाचें होतें. कंपनी-सरकारची हुकमत देशभर पसरून या सुमारास जवळजवळ पन्नास वर्षें होत आलीं असूनहि सर हेन्री ईलियट साहेबांना 'ब्रिटिशांबद्दल हिंदी जनतेला प्रेम नाहीं, आबालवृद्ध बहुजनसमाज दिल्लीच्या बादशाहीचेच गोडवे शिळोप्याच्या वेळीं रसभरित पद्धतीनें गात बसला आहे', असा प्रकार दिसत होता. ब्रिटिशांच्या मतें कंपनीचें राज्य अत्यंत सुधारलेलें होतें. त्याच्या मानानें मुसलमान-बादशाही शुद्ध रानटी ठरणारी असतांहि हिंदी प्रजा त्या बादशाहीचा बडेजाव सांगते, याचा चमत्कार आणि विषाद वाटून त्या बादशाहीचें खरें अक्राळविक्राळ स्वरूप उघड करून हिंदी जनतेच्या डोळ्यांत अंजन घालणें अवश्य असा ईलियट साहेबांचा दृढ संकल्प झाला व परिणामीं त्यांच्या संकलनाचे ग्रंथ बाजारांत आले. साहेबमजकुरांनीं आपल्या पुस्तकांच्या प्रस्तावनेंत वरील आशयाचा स्वानुभव नमूद

केलेला आहे. तेव्हांपासून शालोपयोगी इतिहासांचें एकच धोरण आढळतें. मुसलमानांची शिरजोरी व हिंदूंची मारखाऊ वृत्ति हे दोन मुद्दे मनावर ठसविणाऱ्या हकीकतींनीं मुसलमानांचा इतिहास भरून काढावयाचा अशी जणूं काय शालोपयोगी-इतिहास-लेखकाना विद्याखात्यानें शपथच घालून ठेवलेली आहे. रोजच्या रोज याप्रमाणें कित्येक वर्षें, मुसलमानानीं हिंदूंना छळलें या माहितीचा हिंदु विद्यार्थ्यांच्या मनावर पगडा बसत गेल्यास मुसलमानांबद्दल त्यांना अविश्वास वाटूं लागणें स्वाभाविक आहे.

एकीकडे शालोपयोगी इतिहासांचें वरच्यासारखें हिंदुमुसलमानांचें द्वैत कायमचें आहे, असा सिद्धांत बिंबविणारें शिक्षण चालू असलें तरी बहुजनसमाजांत या शिकवणीचें विष पसरलें नव्हतें. एकदोघांच्या यासंबंधींच्या जबान्या सादर केल्यानें वस्तुस्थिति ध्यानात येईल. मॅक्मिलन कंपनीमार्फत संस्कृतिविषयक निबंधसंग्रह छापलेला आहे त्यांतील निबंध सर अब्दुल कादर, सर जोगेंद्रसिंग, यांच्यासारख्यांनीं लिहिले आहेत. आपल्या लहानपणीं दाया, दुसरे नोकर व पुढें मित्र वगैरे सर्व प्रकारचा परिवार मुसलमानांचा होता, त्यांच्यांतच आपण वाढलों, तेव्हा [ सुमारें साठ वर्षांपूर्वीं ] मुसलमान व इतर हिंदी यांचें आपसांत बनत नाहीं असें स्वप्नहि कधीं पडत नव्हतें, अशी माहिती सर जोगेंद्र यांनीं आपल्या निबंधांत सांगितली आहे. हें पंजाबांतलें उदाहरण आहे. प० वा० बिपिनचंद्र पाल यांच्या आत्मचरित्राची कथा पूर्व बंगालमधली आहे. त्यानीं सांगितलेले अनुभव सुमारें ७५वर्षांमागचे आहेत. सिल्हट शहरांत त्यांचें बालपण गेलें. तेथें मुसलमानांची वस्ती असून त्यांचा हिंदूंशीं अगदीं मोकळेपणाचा व्यवहार होता. लग्नासारख्या कौटुंबिक समारंभातून एकमेकांना अहेर केले जात असत. हिंदूंच्या सणासाठीं मुसलमानांच्या तळ्यातून मासे नेण्याला मनाई नव्हती व त्यांच्या सणांकरतां हिंदूंचीं तळीं रिकामीं होत असत, अशी माहिती पालबाबूंनीं एका जागीं निवेदन केली आहे. दुसऱ्या ठिकाणीं मोहरमच्या धामधुमीचें वर्णन करतांना त्यांनीं म्हटलें आहे कीं, हिंदूंच्या पूजासमारंभाला मुसलमान कसलीच हरकत घेत नव्हते; उलट पुष्कळदां ते देखील जमावानें पूजेच्या सोहळ्यांत भाग घेत. हिंदु समाज मोहरमच्या सणांत सामील होण्याला कचरत नसे इतकेंच नव्हे, तर

तो बकरीदच्या सणांतील गाईची कुर्बानी शेजारधर्माला जागून सहन करी. हिंदु जमीनदारांची मुसलमान कुळें जसा आपल्या धन्याचा अभिमान बाळगीत तसाच अभिमान हिंदु कुळें मुसलमान जमीनदाराचा बाळगीत असत, असें तात्पर्य निघण्याजोगा मजकूर पालबाबूंच्या आत्मचरित्रांत आलेला आहे. हिंदुमुसलमानांच्या द्वैतानें राजकारणाच्या आखाड्यांत विचित्र वळण घेतलें असलें तरी उत्तर भारतांतील खेड्यांतून हिंदु व मुसलमान शेजारधर्माच्या सलोख्यानें आणि विश्वासानें राहत आहेत. खेड्यांतला हिंदु किंवा मुसलमान परगांवी जायला निघाल्यास तो आपल्या बायकांमुलांची रखवाली मुसलमानाकडे किंवा हिंदूकडे निर्धास्तपणें सोंपवितो हा अनुभव अद्यापि येतो. याचा एक पर्याय हिंदुमुसलमानांच्या दंग्यांतहि दृष्टीस पडतो. हिंदु वस्तींतील मुसलमानाचें संरक्षण हिंदु करतो व मुसलमान मोहल्यांतील हिंदूच्या बचावाला तेथील मुसलमान झटतो, अशा हकीकती राजकारणांतील बेबनावापेक्षां रोजच्या व्यावहारिक जीवनांतील सहृदयता अधिक प्रभावी असल्याचें स्पष्ट करणाऱ्या नाहींत काय ?

# किसान-कामगारांचें राजकारण : : ९

हिंदी राजकारणामध्यें अलीकडे ३० वर्षांपासून किसान-कामगारांचा एक नवा पक्ष उदयास आला असून त्याची चढाओढ सांप्रत बरीच बिकट बनलेली आहे. किसान-कामगारांपैकीं किसान अर्थात् शेतकरीवर्ग हा पक्षांत जमेकडे असला तरी त्याची कामगारांइतकी बळकट संघटना उत्पन्न झालेली नाहीं. शेतकरीसमाज हिंदुस्थानांत इंग्रजी राजवटीनें अगदीं पिळून काढलेला आहे. त्याच्यांत त्राण नाहीं व त्याला कोणी त्राता नाहीं अशी हाकाटी इंग्रजी राज्याच्या सुरुवातीलाच अनेक पुढाऱ्यांनीं चालविलेली होती. बंगालमध्यें कायमची शेतसारापद्धति अस्तित्वांत आल्यावर शेतकऱ्यांची कशी दुर्दशा उडाली याचीं हृदयद्रावक वर्णनें खुद्द इंग्रजांनींच त्या काळांत लिहून किंवा बोलून टाकलेलीं आहेत. बंगालमध्यें एकदां शेतकऱ्यांनीं लहानशी बंडाळी करून पाहिली; या बंडाळींत संन्याशी लोकांचा पुढाकार असल्यामुळें 'तिला संन्याश्यांची बंडाळी' या नांवानें इतिहास ओळखतो; पण वस्तुतः ती शेतकऱ्यांचीच उठावणी होती. या उठावणीचा विशेष परिणाम घडला नाहीं. यानंतर दखल घ्यावी असा प्रकार १८७५ मधील महाराष्ट्रांतील शेतकऱ्यांच्या दंग्याचा आहे. या दंग्याचा रोख सावकारांवर होता व इंग्रज अधिकाऱ्यांनीं हा रोख न बदलण्याची पुरेशी काळजी घेतली. शेतकऱ्यांच्या हिताचे कायदे करण्याचा आव आणून अधिकाऱ्यांनीं सावकार आणि शेतकरी यांची तेढ वाढणार नसली तरी कायम राहील अशी व्यवस्था अंमलांत आणली. या व्यवस्थेमागून सुमारें २० वर्षांनीं पुनः एकदां दुष्काळानें देश ग्रासला तेव्हां

दुष्काळाच्या कायद्यातील कांहीं कलमाचा फायदा घेऊन शेतकऱ्यांनीं सारा देऊं नये अशी चळवळ महाराष्ट्रांत कै. टिळकांच्या नेतृत्वानें दिसूं लागली. शेतकऱ्यांना संघटित करण्याचा व तशा संघटितपणाच्या जोरावर राज्यकर्त्यांशीं टक्कर खेळण्याचा हा पहिला प्रसंग होता. या चळवळीचा प्रारंभ चांगला झाला, परंतु सरकारच्या सामर्थ्यापुढें टिकायला जें चिकाटीचें मनुष्यबळ लागतें ते नसल्यामुळें दडपशाहीच्या दर्शनासरशी ही चळवळ कोलमडली व शेतकऱ्यांच्या संघटनेची संधि गेली. शेतकरी प्रत्यक्ष प्रतिकार करण्याइतका चवताळला नसला तरी त्याचा असंतोष हळूहळू प्रखर होत चालल्याचें लक्षांत घेऊन बरेचसे कूळ-कायदे (टेनन्सी ॲक्टस्) प्रांतोप्रांतीं निर्माण करण्याचें सत्र इंग्रज राज्यकर्त्यांनीं सुरू ठेवलें होतें. हे कायदे त्या त्या वेळची शेतकऱ्यांची अस्वस्थता थोडीशी नरम करण्याला उपयोगी पडत असत व राज्यकर्त्यांनाहि आपण कर्तव्य बजावलें असें भासवायला सापडत असे.

## महात्माजींचे प्रयोग

म. गांधींनीं कॉंग्रेसचें नेतृत्व स्वीकारल्यानंतर शेतकऱ्यांचा असंतोष कृतींत उतरविण्याचे प्रयोग सुरू झाले. १९२० नंतरच्या काळांत संयुक्त प्रांतामध्यें किसानांच्या संघटनेला कांहीं दिवस विशेष जोर होता. गांधींनीं बारडोलीस शेतकऱ्यांच्या संघटनेचा राज्यकर्तृत्वाशीं सामना व्हावा अशी योजना आखली होती. ही योजना गांधींनीं चौरीचौरा नामक संयुक्त प्रांतांतील खेड्यांत शेतकऱ्यांच्या दंगलींत पोलिस खात्याचे लोक बळी पडल्याचें समजतांच एकदम सोडून दिली व सगळ्या कॉंग्रेस-भक्तांचा रोष स्वतःवर ओढवून घेतला. गांधींनीं पुढें पांच-सहा वर्षांनीं बारडोलीचे किसान सारा-बंदीचा शस्त्रानें राज्यकर्त्यांशीं पुष्कळसा यशस्वी रीतीनें लढविले. बारडोली येथें पहिला सत्याग्रहाचा बार वायां गेल्यावर संयुक्त प्रांतांतील किसान-चळवळीला ओहोटी लागली. मात्र किसान-संघटनेच्या संस्था सपशेल नामशेष झाल्या नाहींत. संयुक्त प्रांताप्रमाणें त्याचें नांव किंवा त्याच्या सभा यांचा बोभाटा नजीकच्या इतर प्रांतांमधून सुद्धां अधूनमधून ऐकूं येतो.

हिंदुस्थानांत शेकडा ८० इतकी स्थूलमानानें शेतकऱ्यांची संख्या असतां व त्यांचीं दुःखें इंग्रजी राज्यानें विकोपास नेलीं असतां त्यांची डोळ्यांत भरण्याजोगी संघटना व कामगिरी इंग्रजी राज्याच्या दीडशें वर्षांत दृष्टीस पडूं नये ही गोष्ट आश्चर्य वाटण्याजोगी आहे. त्या मानानें कामगारांची संघटना व कामगिरी अवघी २५–३० वर्षांची असूनहि तिचा प्रभाव ब्रिटिश राजवटीला पुष्कळदां चांगलाच जाणवला. कामगारांची संख्या शेतकऱ्यांच्या तुलनेनें फार थोडी वाटण्यासारखी आहे. हिंदुस्थानांतील सारे कामगार निव्वळ कामगार नसून ते वर्षांतून कांहीं महिने आपली शेती संभाळतात म्हणजे मूळचा शेतकरीच आपल्या शेतीच्या उत्पन्नाला पैशाची धसघशीत जोड मिळावी या आशेनें मोठ्या शहरांतील एखाद्या कारखान्यांतला कामगार बनतो; पण कामगार या नात्यानें तो जी शिस्त पाळतो व आपल्या उद्धाराच्या संपसारख्या प्रसंगीं जी झीज सोसतो ती शिस्त पाळण्याचें व ती झीज सोसण्याचें त्याला शेतकरी या नात्यानें जमत नाहीं, असा शेतकरी-संघटनेचा व चळवळीचा अनुभव आहे.

## कामगारांचें पूर्ववृत्त

कामगार हा वर्ग जमावानें शहरांत सामान्यतः एकत्र राहतो व एकाच ठिकाणीं काम करतो यामुळें त्याची जूट घडवून आणायला उशीर लागत नाहीं आणि विशेष अडचणींशींहि मुकाबला करावा लागत नाहीं. हिंदुस्थानांत अर्वाचीन अर्थानें कामगारांचा उदय मुंबईपुरतें बोलावयाचें झाल्यास इंग्रजांनीं आगगाड्यांकरितां कारखाना सुरू केला तेव्हां १८४३ च्या सुमारास झाला. १८५० नंतर कापडाच्या गिरण्या स्थापन होऊं लागल्या व कामगारांच्या संख्येंत झपाट्यानें भर पडत चालली. एकाद्या शहरांत लोकांचा भरणा नव्यानें होऊं लागल्यास जो परिणाम व्हावयाचा तो मुंबईसहि दृष्टीस पडावा हें स्वाभाविक आहे. कामगार माणसें मुंबई शहराचीं नसून कोंकणांतून व मावळांतून येणारीं अर्थात् एक प्रकारें उपरीं; त्यांची वस्ती चार-सहा महिने मुंबईस तर चार-सहा महिने त्यांच्या मूळच्या गांवीं; शिवाय तीं काबाडकष्टासाठींच सांगूनसवरून मुंबईस आलेलीं, तेव्हां त्यांची काळजी मुंबईतील कारखान्यांच्या मालकांना किंवा मुंबईच्या इतर नेहमींच्या

रहिवाश्यांना कशी वाटावी ? साहजिकच त्यांच्या विपन्नावस्थेला पारावार नव्हता. जेव्हां मुंबईत कारखान्यांची धुरांडीं उभारलीं जाऊं लागलीं तेव्हां इंग्रज राज्यकर्त्यांनीं स्वदेशांतील कारखान्यांच्या अनुभवाचा शहाणपणा अंमलांत आणून इंग्लंडांतील मजूरवर्गासाठीं होणाऱ्या सुखसोयींचा कित्ता येथें गिरविला असतां तर येथील कामगारांची दुर्दशा कांहींशी टळण्याचा संभव होता. पण त्यांनीं पुष्कळ वर्षें कामगारांच्या दुर्दशेची अगदीं उघड्या डोळ्यांनीं उपेक्षा चालविली होती. कारखान्याचा मालकवर्ग 'कमी खर्च व जास्तींत जास्त नफा' या ध्येयाच्या मागें लागलेला; त्याला आपल्या उद्योगांत राबणारांच्या हलाखीकडे पहाण्याचें कारण काय ? पण मुंबईच्या साऱ्याच वस्तीकरांनीं कामगारांसंबंधांत आपले कान व डोळे घट्ट बांधून टाकलेले नव्हते, कांहीं उदार प्रकृतीचे लोक मजूरांच्या विपत्तीचा परामर्ष उपकारबुद्धीनें घेत असत. त्यांचीं उदाहरणें देण्याचें कारण नाहीं. तरी, एक नांव घेण्यासारखें आहे. नारायण मेघाजी लोखंडे या नांवाच्या एका गृहस्थानें कामगारांच्या कल्याणाची विचारपूस हा आपल्या विशेष आवडीचा विषय बनविला होता. त्याचा प्रत्यक्ष कामगारांशीं बिलकूल संबंध नव्हता; पण कामगारांच्या हिताची चर्चा करण्याची कामगिरी त्यांनीं पत्करली होती. मुंबई प्रार्थनासमाजाचे एक उत्साही कार्यकर्ते कै. सदाशिवराव केळकर यांनीं कामगारांच्या परिस्थितीकडे लक्ष पुरविण्याचा उद्योग लोखंड्यांच्या काळांतच चालू ठेवल्याचा पुरावा उपलब्ध आहे. असल्या परोपकारी तिऱ्हाइताच्या कळवळ्याला चांगलेसें फळ येऊं नये, यांत कांहींच नवल नाहीं.

सरकार व मालक यांनीं सुरू ठेवलेल्या उपेक्षेला, जसजशी कामगारांची संख्या वाढून त्यांच्या दुःखाला वाचा फुटूं लागली तसतशी, मर्यादा पडत चालली. सरकारचें काम प्रायः एकच व तें म्हणजे कमिशन नेमून चौकशी करण्याचें. कामगारांत एकजूट नसली, विशेष जागृति नसली, तरी त्याला आपलीं गाऱ्हाणीं वेशीवर टांगण्याचे उपाय अगदींच कळत नव्हते असें नाहीं. देशोदेशीं मजुरांची काय अवस्था आहे, अन्यत्र मजूर कोणत्या उपायांनीं आपल्या जीवनाचीं दुःखें कमी करीत आहे, याविषयींचें ज्ञान त्यांच्यापर्यंत पोंचत होतें. त्याला संपाचा उपाय माहीत होता व केव्हां केव्हां एकेरीवर येऊन तात्कालिक जुटीनें त्यानें संपाची कास धरल्याचे

दाखले आहेत. असे संप कार्यक्षम होऊ नयेत हें सरळ आहे. गेल्या शतकाच्या अखेरीस जी. आय्. पी. रेल्वेच्या सिग्नल खात्याच्या लोकांनीं संप केल्याचें एक ठळक उदाहरण अशांतलेंच आहे. मागल्या शतकांत त्यांची स्थिति सुधारली नसली, तरी नव्या विसाव्या शतकाच्या प्रारंभींच त्याच्या जागृतीचीं चिन्हें सर्वत्र प्रकट झालीं. १९०५ सालीं वंगभंगाच्या उद्वेगांतून जन्मास आलेल्या स्वदेशी बहिष्काराच्या चळवळीचाहि या जागृतीला उपयोग झाला. आपण काम करण्याचें नाकारलें व गाऱ्हाणीं फिटेपर्यंत चिकाटी राखली तर मालक व सरकार यांना वठणीस आणतां येतें, इतका बोध कामगारांच्या हृदयांत खोल ठसला होता. स्वदेशी बहिष्काराच्या दिवसांत भराभर आगगाड्यांचे कारखाने, कापडांच्या गिरण्या, सरकारी छापखाने यांमधील कामगारांचे संप झाले. याच दिवसांत कामगारांना सणावाराच्या सुट्टींत एकत्र जमवून त्यांना सदाचाराचें शिक्षण देण्याचे प्रयत्न चालले होते. मुंबईस भारत सेवकसमाजाचे श्री. नारायण मल्हार जोशी हे कामगार-सुधारणेच्या कामगिरींतले एक अगदीं सुरुवातीचे कार्यकर्ते असून त्यांचा निर्देश या काळाच्या हकीकतींत अवश्य आहे.

## मजुरांचें राजकारण

आपलीं गाऱ्हाणीं दूर करण्यासाठीं होणारे संप मजूरवर्ग राजकारणाशीं किती समरस झालेला आहे हें कळण्याला उपयोगी नव्हते. ठिकठिकाणीं झालेल्या टिकाऊ संपांनीं कामगारसमाज आतां मागासलेल्या स्थितींतून बाहेर पडला आहे, याची ओळख करून दिली. पण त्याच्या जीवनांत राजकीय विचाराची धार वहात असल्याची साक्ष पटेपर्यंत त्याच्या राजकारणावर लक्ष ठेवण्याची आवश्यकता उत्पन्न झालेली नव्हती. तो योग मुंबईच्या कामगारांनीं १९०८ सालीं टिळकांच्या शिक्षेचा निषेध व्यक्त करण्यासाठीं आठवडाभर चालविलेल्या संपानें निर्माण केला व त्यास अनुलक्षून लेनिन यानें कामगारांत वर्गजागृति (क्लास कॉन्शस्नेस) पुरेशी झाली असून ब्रिटिश राजवटीचें अस्तित्व संपुष्टांत आणण्याला कामगारांच्या अशा जागृतीची मदत होईल वगैरे अर्थाचे उद्गार काढल्याचें प्रसिद्ध आहे. १८९३ सालीं हिंदु-मुसलमानांच्या दंग्यांत मुंबईच्या हिंदु कामगारांनीं असाच प्रकार केल्याचें

वृत्त पुष्कळांना ठाऊक आहे. परंतु त्यांत जातीयतेचा गंध असल्यामुळें त्याकडे कोणी कौतुकानें पाहिलें नाहीं. टिळकांची शिक्षा हें प्रकरण राजकारणांत मोडणारें असलें, तरी ज्यांनीं संप केला व दडपशाहीचा गोळीबार खाल्ला ते बहुतेक हिंदू कामगारच होते. अशा जातवारीनें कामगारांच्या जागृतीचा विचार केला जात नाहीं व करूं नये हें उत्तम, पण वस्तुस्थिति सर्वस्वीं झांकून ठेवणें देखील योग्य नव्हे.

मजुरांच्या जागृतीनें व हालचालीनें जनतेचें लक्ष वेधल्यावर या वर्गाच्या हिताचें चिंतन करण्याची जबाबदारी मुंबईत कित्येक उपकारवृत्तीच्या लोकांनीं जास्त आस्थेनें स्वीकारली. या जबाबदारीप्रमाणें मजुरांच्या गाऱ्हाण्यांनिमित्त अर्ज-विनंत्यांचा मार्ग कांहीं काळ चोखाळला जात होता. हा मार्ग झटक्यासरशीं इष्ट फळ देणारा नाहीं, तथापि, त्याचा बऱ्या लोकांनीं अवलंब केलेला असल्यामुळें त्याचा थोडा उपयोग होत असतां काळानें पहिलें महायुद्ध पेटवून कामगारांच्या जागृतीला व्यापकता, खोली आणि क्रमानेंच कार्यक्षमता आणून दिली. या महायुद्धापर्यंत हिंदी जनतेच्या गरजेनें कारखाने निघत होते. सरकार त्याविषयीं बहुधा उदासीन होतें. विलायतच्या व्यापाराला हिंदी उद्योगधंद्यांनीं खो न बसण्यापुरती जागरूकता सरकारच्या ठिकाणीं निरंतर होती, पण त्या जागरूकतेचे प्रयोग करण्याची पाळी वारंवार उद्भवत नव्हती. महायुद्धानें सरकारला युद्धसाहित्याची उणीव भरून काढण्यासाठीं युद्धसाहित्याचे कारखाने वाढविण्याची जरूरी भासूं लागली. कारखान्याबरोबर कामगारांची संख्या वाढली. युद्धाच्या परिस्थितीनें सर्वांना महागाईचे चटके देण्याला सुरुवात केली. कामगारांच्या जागृतीला महागाईनें तीव्रता आणली. ह्या महयुद्धाच्या दिवसांत थिआसफीच्या अध्यक्ष असलेल्या बेझंटबाईनीं हिंदी स्वराज्याची चळवळ अंगावर घेतली होती. त्या चळवळीचें हत्यार या नात्यानें त्यांनीं मजुराच्या असंतोषाला संघटनेच्या वळणानें प्रभावशाली बनविण्याची कामगिरी केली. पण मजुरांनीं संप करून राज्यकर्त्यांची अडचण वाढविणें हें बेझंटबाईंना पाप वाटत असल्यानें मजुरांची संघटना संपाचें हत्यार उपसतें असें दिसतांच बाईंनीं संपाला विरोध केला व आपल्याच हातानें मजुरांच्या बाबतींत घडलेलें सुकृत झाडून टाकलें. बेझंटबाईंच्या विरोधानें कामगारांचा कांहीं काळ हिरमोड झाला, परंतु त्यांच्या

ठिकाणीं आपल्या कर्तृत्वाबद्दल जो आत्मविश्वास उत्पन्न होत चालला होता त्याला बाध आला नाहीं; उलट एवढेंच सिद्ध झालें कीं, संघटनेचे पुढारी बदलले पाहिजेत. जोंवर बाहेरचे पुढारी केवळ परोपकारबुद्धीनें मजुरांच्या कल्याणाचा यत्न करीत रहातील तोंवर कामगार-संघटनेची ओढाताण टळणार नाहीं. अशी ओढाताण टळण्यासाठीं केवळ कामगारांच्या हिताला वाहून घेतलेल्या नव्या दमाच्या व्यक्तींचें नेतृत्व लाभलें पाहिजे, हा मुद्दा असल्या प्रसंगांनीं स्पष्ट केला.

## कम्यूनिझमचा उदय

मुंबईमध्यें या नव्या पुढारीपणाची खाण एका धनिक गुजराती गृहस्थानें उघडली. १९१७ मध्यें रशियांत जी राज्यक्रान्ति झाली, ह्या राज्यक्रांतीनें या गृहस्थाच्या चित्ताला चटका लावून सोडला व ह्या राज्यक्रांतीमागचें तत्त्वज्ञान अभ्यासण्याकरितां प्रस्तुत धनिकानें कम्यूनिझमच्या पुस्तकाचा मोठा संग्रह करून त्याचा अभ्यास कित्येक तरुणांकरवी चालविला. सदर धनिकानें तरुणांना जमवून प्रोत्साहन दिलें व त्यासाठीं आर्थिक झीज सोसण्याची तयारी दाखविली. कम्यूनिझम ऊर्फ साम्यवादाचें वाङ्मय थोडेंथोडकें नाहीं; परंतु हिंदुस्थानांत त्या वाङ्मयाला मज्जाव होता म्हणून किंवा साम्यवाद हीं कांहीं एकान्तिक ध्येयवाद्यांची अव्यवहार्य विचारप्रणाली आहे अशा समजुतीनें साम्यवादी वाङ्मयाचा १९१७–१८ पूर्वीं हिंदुस्थानला फारसा परिचय नव्हता. रशियात राज्यक्रांति होत असतां 'कार्ल मार्क्स' या विषयावर पुण्याला कै. धर्मानंद कोसंबी यांनीं एक व्याख्यान वसंत-व्याख्यानमालेमध्यें दिलें; तेव्हा कार्ल मार्क्स या पुरुषाचें नांव निदान सामान्य पुणेंकरांनीं तरी प्रथमच ऐकलें असावें, असें म्हटल्यास चूक होणार नाहीं. अर्थशास्त्राच्या कॉलेजांतील शिक्षणासाठीं निवडल्या जाणाऱ्या पुस्तकांतून क्वचित् एकाद्या टीपेंत कार्ल मार्क्सच्या शिकवणीचा संक्षिप्त निर्देश दृष्टीस पडे, पण त्या शिकवणीमध्यें मानवी समाजाचा इतिहास विशेष दृष्टीनें वर्णिलेला असून त्या समाजाची व्यवस्था आमूलाग्र बदलून टाकणाऱ्या विलक्षण विचारांची शक्ति आहे, याचा रशियांतील राज्यक्रांतीपर्यंत हिंदुस्थानांत कुणाला स्पष्ट बोध असेल असें म्हणवत नाहीं. रशियांतील झारशाही

कोसळून जमीनदोस्त होण्यापूर्वी कार्ल मार्क्सचा साम्यवाद सुमारें पन्नास वर्षां इतका जुना होता. या अर्धशतकाच्या अवधींत देशोदेशीं राज्यक्रांत्या झाल्या; पण त्या क्रांतीच्या पुढाऱ्यांनीं कार्ल मार्क्सच्या तत्त्वज्ञानाचा अंगीकार केलेला नव्हता. या तत्त्वज्ञानाचे पुरस्कर्ते प्रामुख्यानें रशियांतच निपजले. पण पहिल्या महायुद्धापर्यंत त्या पुरस्कर्त्यांना हद्दपारींतच दिवस कंठावे लागत होते. सदर महायुद्धांत रशियाचा शह सुटण्यासाठीं जर्मन राज्यकर्त्यांनीं मार्क्सच्या शिष्यपरंपरेंतील मुख्य जो लेनिन त्याला हाताशीं धरलें. १९१७ मध्यें रशियन सेनेचा गाडा मोडकळीस आला होता व सामान्य प्रजेंत भयंकर असंतोष माजला होता. रशियाला इंग्लंडनें योजिलेलें द्रव्यसाह्य जर वेळींच मिळालें असतें तर कदाचित् त्या राष्ट्राची सेना पुनः सावरून उभी करतां आली असती व एकदां सेना राजनिष्ठेनें हालूं लागली असती तर प्रजेचा असंतोष कांहीं काळपर्यंत चिरडून टाकणें अशक्य नव्हतें. परंतु जर्मनांच्या सावधपणानें इंग्लंडचें सोनें किचनेर या सेनानायकासह समुद्रांत बुडविलें व रशियांतील क्रांतीचा मार्ग निर्विघ्न केला. जर्मनांनीं लेनिनला रशियांत सुरक्षित पोंचविलें. यामुळें मार्क्सवादी समाजव्यवस्थेची 'क्रांति लेनिन तेथें अमलांत आणूं शकला. रशियांतल्या या क्रांतीनें शेतकरी-कामकऱ्यांच्या राज्याचा रक्तध्वज आकाशांत चढवून स्थिर केलेला दिसतांच मार्क्स व त्याचें तत्त्वज्ञान या दोघांचें नांव जगभर गाजत सुटलें. हिंदुस्थानांतील अनेक तरुणांना त्यांचा मोह उत्पन्न झाला. मुंबईत पूर्वोक्त गुजराती धनिकानें अशा तरुणांच्या बुद्धीला मार्क्सवादाच्या तत्त्वज्ञानाचा खुराक पुरविला. भाई डांगे निमकर, जोगळेकर प्रभृतींचीं नांवें म. गांधींच्या असहकाराबरोबरच मुंबईत लोकांपुढें आलीं. मुंबईतील साम्यवादाची जन्मकथा स्थूलमानानें याप्रमाणें आहे.

## सरकारची पहिली झडप

रशियांतील राज्यक्रांतीला मार्क्सवाद्यांच्या नेतृत्वानें जी दिशा प्राप्त झाली ती पश्चिम यूरोपांतील सर्व राष्ट्रांना अप्रिय होती. इंग्लंड देशामार्फत ही क्रांति यशस्वी होऊं नये म्हणून जोराचा प्रयत्न झाला, तथापि लेनिनच्या पक्षानें अखेर जिंकली ! प्रत्यक्ष प्रतिकार अपेशी ठरल्यावर मार्क्सवादाच्या अंमलबजावणीचें स्वरूप विपर्यासानें जगाला सांगून त्याविषयीं सर्वत्र किळस व

भीति उत्पन्न करावी असा उद्योग अत्यंत ईर्षेनें बरींच वर्षें चालला होता. त्यालाहि रशियन क्रांतीनें भीक घातली नाहीं. रशियाविषयींच्या खऱ्या-ज्ञानाचीं साधनें हिंदी जनतेच्या हातीं जाऊं नयेत, असा बंदोबस्त ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं हिंदुस्थानांत ठेवला होता. तरीसुद्धां पुष्कळसें रशियासंबंधाचें वाङ्मय हिंदुस्थानां। येत राहिलें व रशियन राज्यक्रांतीचें कौतुक येथें वाढत चाललें. डांगे व त्यांचे समानशील तरुण मार्क्सवादी क्रांतीचें लोकांना शिक्षण देत आहेत इतकेंच नव्हे तर तशा क्रांति-संघटनेचें बीजा-रोपण करीत आहेत असें उमगल्यावर सरकारनें झडप टाकून त्यांना १९२४ सालीं राज्यविरोधाच्या गुन्ह्याखातर तुरुंगांत डांबलें. पण १९२४ पर्यंत मजुरांच्या जागृतीमध्यें व संघटनेमध्यें नवें चैतन्य संचरलें होतें; अर्थात् मार्क्सवादी तरुण पुढाऱ्यांना कैदखान्यांत कोंडल्यामुळें तें चैतन्य ओसर-ण्याचा संभव नव्हता.

## अखिल भारतीय संघटना

पहिल्या महायुद्धानें अकाळविकाळ वाढलेली महागाई व रशियन राज्य-क्रान्तीची हवा अशा दोन प्रेरणांतून १९१८ नंतर मजुरांच्या संपांना हिंदु-स्थानांत सर्वत्र ऊत आला. संपांचा उगम महागाईमध्यें असला व सामा-न्यतः १९२० पर्यंतचे संप मजुरीची मिळकत वाढण्यासाठीं असले तरी १९१९ सालांतील दडपशाहीच्या रौलॅट कायद्याच्या निषेधार्थ झालेला संप, १९०८ सालीं टिळकांच्या शिक्षेनिमित्त झालेल्या संपाप्रमाणेंच राजकीय दृष्ट्या महत्त्वाचा ठरतो. देशाच्या राजकीय आशा-आकांक्षेला मजूरवर्ग पारखा नाहीं, तोसुद्धां इतर समाजविभागाच्या बरोबरीनें राजकीय लढ्याच्या आघाडीवर उभा राहणारा आहे, याविषयींची खात्री पटवून देण्याला रौलॅट काय-द्याच्या विरोधाचा संप उपयोगी होता. कामगारांची ही जागृति आतां संघटने-च्या रूपानें अवतरावी हें क्रमप्राप्तच होतें. पुष्कळशा कारखान्यांतील काम-गारांचे संघ या सुमारास अस्तित्वांत आले. या सर्वांची मिळून एक अखिल भारतीय संस्था निर्माण होणें अपरिहार्य असल्यानें तशी ती १९२० सालीं निर्माण करण्यांत आली. इंडियन ट्रेड यूनियन कॉंग्रेसचें पहिलें अधिवेशन १९२० मध्यें मुंबईस भरलें. अध्यक्षस्थानीं प. वा. लाला लजपतराय होते. १९२४ च्या

अधिवेशनाचें अध्यक्षस्थान कै. चित्तरंजन दास यांनीं सनाथ केलें. १९२६ च्या अधिवेशनाची अध्यक्षीय धुरा श्री. गिरी यांच्या खांद्यावर होती. या देशभक्तांचा कामगारवर्गाशीं साक्षात् संबंध नसल्यामुळें कामगारांचें दैन्य मिटावें, त्यांची गांजणूक थांबावी ते निर्व्यसनी रहावे व एकंदरीनें ते सुखी व्हावे, अशा सौजन्याच्या भावनेनेंच ते कामगारांच्या जागृतीचा परामर्ष घेत होते. राजकारणांत त्यांचें कांहीं स्वतंत्र वेगळें ध्येय असावें, ही दृष्टि यांपैकीं पुष्कळशा अध्यक्षांना आलेली नव्हती किंवा मान्य नव्हती. १९२६ मध्यें सरकारनें पास केलेल्या ट्रेड यूनियनविषयींच्या कायद्यांत कामगारांनीं राजकारणापासून दूर असावें या कल्पनेचा अंतर्भाव करण्यांत आला तो वरील कामगार-सुधारणेच्या भावनेचाच एक परिणाम समजावा लागतो. परंतु असल्या परिस्थितीनें वा उपायानें कामगारांची राजकारणांत पडण्याची इच्छा मावळली नाहीं. त्यांच्यांत साम्यवादी मतांचा प्रचार जारीनें चालू होता. रशियन-पद्धतीच्या निशाणाचे कित्येक कामगार-संघ उदयास येऊन कामगारवर्ग कॉंग्रेसच्या राजकारणाला समांतर अशा निराळ्या रस्त्यानें व निराळें राजकीय ध्येय हृदयांत बाळगून चालला आहे, याची स्पष्ट खूण या निशाणवाल्यांनीं सर्वांच्या निदर्शनास आणली. हातोडा-कोयत्याच्या चिन्हांचे लाल बावटे स्वीकारणारांनीं कॉंग्रेसशीं सहकारित्व राखल्यानें त्यांचीहि लोकप्रियता वाढत होती. क्रमानें कामकरी-शेतकरी असे संयुक्त संघ बंगाल, मुंबई, संयुक्त प्रांत, पंजाब या इलाख्यांतून जन्मास आले व त्यांचीहि एक अखिल भारतीय संघटना स्थापन झाली. ( १९२८ ) या संयुक्त संघांत कॉंग्रेसमधील बरेच पुढारी प्रामुख्यानें भाग घेत होते. कामगार-चळवळीनें इतकी आघाडी मारून सुद्धां त्यांच्या ध्येयभेदाच्या लढाऊपणाला नीटसें वळण लागत नाहीं, ही रुखरुख घालविण्याकरितां १९२७ मध्यें मेच्या पहिल्या तारखेला ' कामगार-दिन ' मुंबई शहरांत प्रथमच पाळण्यांत आला. ती रुखरुख घालविण्याचा तो एक उपाय होता. १९२८ च्या प्रारंभीं सायमन-कमिशनच्या निषेधार्थ संप करण्यांत व मिरवणुकी काढण्यांत कामगारांनीं खूपच उत्साह दाखवून आपण केवळ आपल्या दैन्यनिवारणाच्या स्वार्थी विचारांतच गुरफटलेले नसून देशाच्या राजकीय स्वातंत्र्याला हातभार लावण्यास आपली सज्जता आहे याबद्दल त्यांनीं संशय राहूं दिला नाहीं.

## मीरत-खटला

१९२८ व १९२९ हीं दोन वर्षें कामगारांच्या प्रक्षोभाचीं होतीं. कामगारांनीं जिकडे तिकडे संप आरंभले. संप आवरेनात तेव्हां सरकारनें एक चौकशीमंडळ नेमलें; परंतु कामगारांच्या जागृतीचा निचरा केल्याखेरीज भागणार नाहीं, असा सरकारचा निश्चय होऊन त्यांनीं १९२८ मध्यें एक सार्वजनिक सुरक्षिततेचा कायदा करण्याचा घाट घातला. हिंदी कायदेमंडळानें तो कायदा धुडकावला. ‘ साम्यवादाच्या प्रचारानें संप माजतात; या प्रचाराला आळा घातलाच पाहिजे ’ असें सरकारी वरिष्ठ तेव्हां बोलूं लागले. राज्यकारभाराच्या अहवालांतून अशा वरिष्ठांच्या मनाचे पडसाद उठले. वजनदार हिंदी विलायती वृत्तपत्रांनीं तसाच सूर आळवायला प्रारंभ केला. सौजन्यशील कामगार-पुढाऱ्यांचीहि मनांत कालवाकालव माजून त्यांनीं भलत्याच मतांचा प्रचार करणाऱ्या बेजबाबदार लोकांची कामगारांच्या मेळाव्यांतून हकालपट्टी केली पाहिजे, असा निकाल दिला. तेव्हा सरकारनेंहि १९२९ च्या प्रारंभीं एकदम साऱ्या हिंदुस्थानांतील कामगार-शेतकऱ्यांचे साम्यवादी पुढारी निवडून काढून अटकेंत टाकले. नंतर कायदेमंडळानें लाथाडलेला सार्वजनिक सुरक्षिततेचा कायदा खास फर्मानाच्या साह्यानें अंमलांत आणला. वृत्तपत्रें आणि पुढारी ज्या अर्थी साम्यवादाच्या प्रचाराचा निषेध बोलतात त्या अर्थी आपल्या सदर धरपकडीच्या कृत्याला साधारणपणें लोकांचा पाठिंबा मिळेल असा सरकारचा अंदाज असल्यास नवल नाहीं. सरकारनें एकूण ३२ इसमांना पकडलें. या धरपकडीचें पर्यवसान ‘ मीरत-खटला ’ या प्रसिद्ध प्रकरणांत घडलें. हा खटला साडेतीन वर्षें चालला होता. शेवटीं कुणाला जन्मठेप, तर कुणाला १२ वर्षांची सक्तमजुरी अशा शिक्षा आरोपींना ठोठावण्यांत आल्या. अगदीं हलक्यांत हलकी शिक्षा तीन वर्षें सक्तमजुरी अशी होती. ‘ मीरतचा खटला ’ हा कामगार-चळवळीच्या इतिहासांतला एक महत्त्वाचा टप्पा आहे.

## सरकारी भीतीचा चमत्कार !

येथें जातां जातां ब्रिटिश राज्यकर्त्यांना साम्यवादानें किती भेवडावलें होतें किंवा साम्यवादाच्या दुष्परिणामाचें भय तें लोकांना कसें दाखवीत

होते याचा एक मासला नमूद करण्याजोगा आहे. १९२९ च्या फेब्रुवारींत हिंदु-मुसलमानांचा अतिभयंकर दंगा झाला. दंग्याचें मूळ पठाण लोक मुलें पळवितात या अफवेंत होतें. पहिल्या दोन-तीन दिवसांत हिंदु, मुसलमान, ख्रिस्ती वगैरे सारे समाज पठाण दिसला कीं, त्याला मारहाण करीत होते, त्यानंतर या मारहाणीचें रूपांतर हिंदु मुसलमानांच्या दंग्यांत होईल अशा गर्जना प्रख्यात अलीबंधूंपैकीं शौकत अलींनीं सुरू केली व ताबडतोब पठाणांचा पिच्छा सुटून हिंदु मुसलमानांची मारामारी जुंपली. या दंग्यामध्यें शहरांत प्राणहानि फार झाली. १८९३ नंतर पसतीस वर्षांनीं हा दंगा झाल्यानें बेसावधपणाचा अनिष्ट परिणाम एका समाजास विशेष भोगावा लागला. परंतु या दंग्याची सारी जबाबदारी सरकारनें साम्यवादी मतप्रसारावर ढकलून दिली! पठाणांनीं मुलें पळविण्याच्या हुलीशीं साम्यावादाचा संबंध कुठेंच लागणारा नाहीं; त्या हुलीच्या हुलडींतून हिंदु-मुसलमानांचा पद्धतशीर दंगा निपजण्याशीं, तर्कशक्ति कितीहि ताणली, तरी साम्यवादाचा संबंध जोडणें शक्य नाहीं; तरी मध्यवर्ती कायदेमंडळांत तेव्हांच्या गृहमंत्र्यांनीं आपली जीभ टाळ्यास लावून साम्यवादाच्या बागुलबोवाचा निर्देश केलेला पाहून 'नवा काळ' पत्रांत गृहमंत्र्याची 'वडाची साल पिंपळाला डकाविण्याची' हातचलाखी उघडकीस आणण्याचा यत्न झाला व मुंबई सरकारानें ताबडतोब 'नवा काळ'चे संपादक श्री. कृष्णाजी प्रभाकर ऊर्फ काकासाहेब खाडिलकर यांना गिरफदार करून राजद्रोहाचा खटला भरला व हायकोर्टाच्या न्यायमूर्तींनीं त्यांना एक वर्षाची शिक्षा फर्माविली. साम्यवादाच्या धास्तीनें तेव्हांच्या मध्यवर्ती व प्रांतिक सरकारांनीं केलेलें हें नकली प्रदर्शन अतिशय केविलवाणें तसेंच लाजिरवाणें असलें, तरी ध्यानांत ठेवण्याजोगें आहे.

## अहमदाबादची कामगार-संस्था

हिंदी कामगार-संघाची हकीकत पुढें चालविण्यापूर्वी अहमदाबाद येथील कामगारसंघाचा पाढा येथें वाचणें अवश्य आहे. या संघाशीं म. गांधींचा संबंध असल्यानें त्यास महत्त्वहि आहे. कामगारांचे संघ हिंदुस्थानांत जन्मास येऊं लागले त्याच सुमारास अहमदाबादेंत कामगारांची गिरणीमालकांबरोबर कटकट सुरू झाली. म. गांधींना ही कटकट अनाठायीं नसल्याचें दिसल्यामुळें

त्यांनीं कामगारांना संप करण्याला परवानगी दिली. म. गांधींच्या विचार-सरणींत वर्गविग्रहाच्या कल्पनेला समावेश नव्हता. कामगारांनीं संप करावा आणि कसल्याहि प्रक्षोभाच्या कारणाला बळी न पडतां तो न्याय मिळेपर्यंत चालवावा; संपाच्या दिवसांत कुणाच्याहि औदार्यावर उपजीविकेसाठीं विसंबून राहूं नये; पोटापुरतें कांहीं काबाडकष्ट करून मिळवावें; संपांतले लोक फुटूं लागले, किंवा संपवाल्यांच्या जागीं दुसऱ्यांची भरती होऊं लागली, तरी संपवाल्यांनीं बेफिकीर रहावें; असा उपदेश त्यांनीं संपवाल्यांना चालविला होता व संपवाले जमावानें हा उपदेश अक्षरशः पाळला जाईल असें दर-दिवशीं गांधींना आश्वासन देत होते. १५ दिवस ही स्थिति टिकली; परंतु हजारों कामगारांना पोट भरण्याचें साधन कसें मिळावयाचें या प्रश्नानें गांधींना भंडावलें. म्युनिसिपालिटींत त्यांची सोय लावण्याचा यत्न झाला, पण तो वायां गेला; गांधींच्या आश्रमांतलें एक काम त्यांना दिलें; परंतु त्यांची मजुरी भागवितांना आश्रमाचें द्रव्यबळ पुरें पडेना, शेवटीं १५ दिवसांनंतर काम-गारांची वृत्ति बदलून अशांतता माजण्याचीं लक्षणें दिसूं लागलीं; तेव्हां गांधींनीं उपवास आरंभला. उपवासानें मालक व मजूर यांच्या दरम्यान तडजोड घडवून आणण्याच्या उद्योगाला जोर चढला व तीन दिवसांत संप थांबविण्या-जोगी परिस्थिति निर्माण झाली. अहमदाबाद शहरीं म. गांधींची कार्य-पद्धति सफल झाली; व तेव्हांपासून त्यांनीं कामगारांसाठीं जी योजना आंखून ठेवली त्या योजनेप्रमाणें तेथील कामगारांचा संघ अखिल भारतीय कामगार-संस्थेशीं संबंध न जोडतां अलिप्तपणानें आपलें अस्तित्व राखून आहे. हिंदुस्थानांत मजूरवर्गाच्या ज्या कित्येक चळवळी झाल्या व चालू आहेत, त्यांपासून अहमदाबादचे कामगार आजतागायत दूरच आहेत. तथापि, संपावर जाणाऱ्या कामगारांना निर्वाहाचें साधन पुरविण्याचा प्रश्न विचार करण्यासारखा ठरतो. संपवाल्यांसाठीं आयत्या वेळीं पुरेसें काम वाढून ठेवलेलें सांपडणें सहसा शक्य नाहीं असेंच त्या प्रश्नाचें उत्तर निघतें.

## कामगार-संघाची फूट व जूट

मीरत-खटल्याच्या पहिल्या वर्षींच कामगारांच्या राजकीय ध्येयामुळें त्यांची संघटना फुटली व अखिल भारतीय स्वरूपाच्या दोन संस्थांचा सवता सुभा

दिसूं लागला. ट्रेड यूनियन कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांत विचारांचें ऐक्य नव्हतें; म्हणून परिणामी साम्यवादी (कम्यूनिस्ट) लोकांनीं आपली लाल ट्रेड यूनियन कॉंग्रेस अशी संस्था काढली. या फाटाफुटीनें कामगार-संघाची शक्ति अतिशय खालावली; तरी संपाचा धूमधडाका १९३१ सालापर्यंत चालून त्याचे सूत्रधार साम्यवादी गट असल्यामुळें सरकारला 'कम्यूनिस्टां'चा धोका कमी झालेला नाहीं, उलट वाढला आहे, अशी कबूली द्यावी लागली. १९३४ मध्यें संपाचें प्रचंड वादळ उठलें तेव्हां मात्र सरकारानें 'आणी-बाणी'च्या ( एमर्जन्सी ) कायद्याचें शस्त्र उपसून साम्यवादी व इतर कामगार-पुढारी भराभर पकडून अटकेंत डांबले. शिवाय कम्यूनिस्ट पक्षाला, त्याच्या कित्येक कामगार-संघांना त्याच्या तंत्रांतील कांहीं संस्थांना बेकायदेशीर ठरविलें. संप व दडपशाही यांच्या झटापटीनें वरच्यापैकीं दोन संस्था पुन्हां १९३५ मध्यें एक झाल्या. आणखी तीन वर्षांनीं उरलेल्या संस्थांनींहि आपल्या विभक्तपणाला तिलांजलि दिली. मात्र पहिल्या दोन संस्थांनीं समेट व्हायचा असेल तर वर्गविग्रहाचें तत्त्व मान्य केलें पाहिजे अशी एक अट घातली होती. प्रतिपक्षानें राजकीय ध्येय मान्य करतांना राजकारणाचे, संपाचे किंवा परदेशी संस्थेशीं संबंध जोडण्याचे ठराव चार-पंचमांश बहुमतानें पास व्हावेत अशी त्यास अट जोडली. राजकीय ध्येयाच्या भीतीनें झालेल्या फाटाफुटीचा शेवट राजकीय ध्येय मान्य केल्यामुळें झाला. एकीकडे याप्रमाणें समेट घडत असतां दुसरीकडे किसान-कामगारांचे संघ क्षीण होत चालले होते. परंतु पुनः त्यांची शक्ति वाढूं लागली. किसानांची जागृति एकदम डोळ्यांवर येणारी नसते, कारण तिचा शहरांशीं संबंध येत नाहीं. वृत्तपत्रांचा व्यवहार शहरांतून अधिक चालतो व आजचीं सारीं शहरें कारखाने आणि व्यापार यांच्या आधारावर भरारलीं असल्यानें कामगारांच्या हालचालींचे नगारे वृत्तपत्रांतून तेव्हांच दणाणतात. शेतकऱ्यांच्या संघटनेचे चढउतार कांहींसे प्रसिद्धीच्या क्षेत्राबाहेर होत राहिले व प्रसिद्धीची चमक मीरत-खटल्यानंतरच्या काळांत देखील कामगारांच्या उठावणीला मिळत गेली. ही चमक कुणाच्याहि मेहरबानीची नव्हती व नाहीं. मीरत-खटल्यानें कामगार-किसानांचे पुष्कळसे प्रमुख साम्यवादी पुढारी पांच-सहा वर्षें आपापल्या कर्तबगारीच्या मैदानांतून बाहेर ठेवले गेले, तरी काम-

गारांची जागृति थंडावली नाहीं. तिचें प्रखरत्व १९३९ या युद्धपूर्व काळांत अधिकाधिक प्रत्ययास येऊन लोकांची व सरकारची खात्री पटली कीं, कामगारांमध्यें वाढणारा साम्यवाद दडपशाहीनें मारला जाण्याइतक्या दुबळे-पणानें अवतरलेला नाहीं.

## साम्यवादाचा झगडा

१९२२-२३ मध्यें हिंदुस्थानांत मुंबई, मद्रास, कानपूर व कलकत्ता या चार शहरांत साम्यवादाचे पुरस्कर्ते उदयास आले. त्यांची संख्या थोडी होती व त्यांच्यांत जूट नव्हती. १९२४ मध्यें जुटीचा यत्न सुरु असतांच कानपुरास चौघा साम्यवादी पुढाऱ्यांवर खटला झाला, पण साम्यवाद्यांची संख्या या चौघांहून पुष्कळच जास्त असल्यानें डांगे, गुप्ता, मुजफर अहमद व शौकत उस्मानी हे चारजण तुरुंगांत खडत असतां १९२५ त सगळीकडच्या हिंदी साम्यवाद्यांना एका सूत्रांत बांधून टाकण्याचा यत्न झाला. १९२७ मध्यें त्या यत्नाला अधिक बळकटी आणली गेली व १९२८ सालीं अशा एक-सूत्रीपणाचा पाया कायमचा भरण्यांत आला. क्रांति हा साम्यवादाचा आत्मा आहे व जगाच्या पाठीवर कुठेंहि साम्यवाद मानानें व सामर्थ्यानें जगावयाचा असेल, तर त्याला कम्यूनिस्ट इंटरनॅशनेल या संस्थेशीं सलग्न व्हावें लागतें. साम्यवादी कार्यकर्ते किसान–कामगारांचे संघ स्थापून त्यांच्या कल्याणाकरितां अहर्निश निधड्या छातीनें खपत असल्याशिवाय या मध्यवर्ती कम्यूनिस्ट इंटरनॅशनेल या संस्थेशीं सलग्न होण्याची पात्रता त्यांना ( देशो-देशींच्या साम्यवादी कार्यकर्त्यांना ) प्राप्त होत नाहीं. १९२८ मध्यें या मध्यवर्ती संस्थेशीं हिंदुस्थानांतील साम्यवादी संलग्न झाल्यामुळें त्यांवर हे रशियाचे गुलाम आहेत, त्यांचें पोषण रशियांतून होत असतें, वगैरे दुरा-रोपाचें ते धनी बनले. हिंदी साम्यवादाच्या पांचवीलाच दडपशाही पुजल्या-प्रमाणें दडपशाही त्याचा गेलीं वीस वर्षें पिच्छा पुरवीत आहे. कैद, अटक, लाठीमार, गोळीबार याची मात्रा चालत नाहीं, तेव्हां १९३४ सालीं हिंदुस्थानांतील साम्यवादी पक्ष ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं बेकायदा ठरविला व त्याच्या निःशेष निःपाताकरितां दडपशाहीचा वरवंटा सर्वत्र फिरता ठेवला. १९४२ पर्यंत कम्यूनिस्ट पक्षावरील बेकायदेशीरपणाचा शिक्का निघालेल

नव्हता. मध्यंतरीं १९३७ मध्यें प्रांतिक राज्यकारभार राष्ट्रीय सभेच्या (काँग्रेसच्या) हातीं आल्यावर कम्यूनिस्टांना आपली कामगिरी चालवायला थोडीशी सवड मिळाली. पण १९३९ मध्यें दुसरें महायुद्ध सुरू झाल्यावर काँग्रेसनें राज्यसूत्रें सोडतांच दडपशाहीच्या वरवंट्यानें आपला प्रभाव दाखविला. १९४१ मध्यें चौकशीविंचून अटकेंत ठेवलेल्या एकंदर ७०० इसमांपैकीं ४८० जण कम्यूनिस्ट व कम्यूनिस्टांचे साह्यकर्ते होते अशी ब्रिटिश राजवटींतील गृहमंत्र्यांचीच मध्यवर्ती कायदेमंडळांतील कबूली आहे.

## कम्यूनिस्ट व काँग्रेस

राष्ट्रीय सभेच्या द्वारें हिंदी राजकारणांत म. गांधींच्या शिकवणीच्या व साधनांचा प्रवेश जेव्हां झाला त्या सुमारासच साम्यवादी किसान-कामगारांच्या संघटनेची हिंदुस्थानांत लावणी सुरू झाली. म. गांधी आपल्या शिकवणीनें समग्र हिंदी जनतेची ब्रिटिश राज्यकर्तृत्वाविरुद्ध म्हणजे साम्राज्यशाहीविरुद्ध उठावणी करीत आहेत व ही उठावणी क्रांतिकारक आहे असें जाणून काँग्रेसच्या कारभारांत साम्यवादी मंडळींनीहि शिरकाव करून घेतलेला होता आणि १९४५ सालापर्यंत काँग्रेसच्या पुढाऱ्यांनीं साम्यवादी तत्त्वें व साधनें यांविषयीं प्रेम नसतांहि साम्यवादी प्रतिनिधींना हाकलून देण्याचा कटाक्ष बाळगलेला नव्हता. १९४२ च्या आगस्ट ८ तारखेनंतर काँग्रेसचे बहुतेक सारे पुढारी ब्रिटिश राजवटीनें तुरुंगांत अडकविले व त्यानंतर देशांत कांहीं काळ जो अत्याचारी धुमाकूळ माजला, त्याला प्रोत्साहन व मदत देण्याऐवजीं साम्यवादी नेत्यांनीं उलट त्यावर विरजण घातलें व असें विरजण घालणें म्हणजे उघड उघड देशद्रोह ठरतो; वगैरे प्रवाद काँग्रेसच्या लोकांनीं स्वीकारले. म. गांधींसुद्धां या प्रवादाच्या प्रभावांत सांपडून त्यांनीं साम्यवादी पुढाऱ्यांसमोर कांहीं सवाल टाकले. साम्यवाद्यांतर्फे भाई पूरणचंद्र जोशी यांनीं त्या सवालांना उत्तरें दिलीं. म. गांधी व भा. जोशी यांच्यांतला पत्रव्यवहार आतां प्रसिद्ध झाला आहे. त्यावरून साम्यवादी पक्षाचा पैशाचा व्यवहार, त्याची देशसेवा व शिस्त आणि त्याचा स्वार्थत्याग यांबद्दल म. गांधींची संशयनिवृत्ति झाल्याचें स्पष्ट कळणारें आहे. " तुम्ही फार कर्तबगार तरुण-तरुणी आहांत. मी स्वतःला जितका निःस्वार्थी समजतों

तितकेच तुम्ही निःस्वार्थी आहांत. तुम्ही सर्वजण कसून मेहनत करतां, तुमच्यांत फार जोम आहे आणि तुम्ही स्वतःच्या कार्यकर्त्यांवर कडक शिस्त लादतां. या सर्व गोष्टींना मी फार महत्त्व देतों व त्यांची प्रशंसा करतों." ( गांधी–जोशी पत्रव्यवहार : मराठी आवृत्ति, पान २१ )

साम्यवादी लोक सरकारच्या प्रेमांतले, या आरोपाचें निरसन करतांना भा. जोशी यांनीं '१९४२ ते १९४४ या दोन वर्षांत चार भाई फांसावर चढविण्यांत आले, ४०० भाई तुरुंगांत आहेत व १०० जण जन्मठेपीची शिक्षा भोगीत आहेत' ही माहिती सादर केली आहे. ( कित्ता:पान १९ ) म. गांधींशीं पत्रव्यवहार करतांना भा. जोशी यांनीं अगदीं जवळच्या काळांतील दडपशाहीचीं उदाहरणें दिलीं आहेत. १९२० सालापासूनचा वृत्तांत निदर्शनास आणला, तर अशा उदाहरणांचें प्रमाण अतिशय भयानक दिसल्याशिवाय राहणार नाहीं. यांत लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे कॉंग्रेसच्या लोकांना तुरुंगवासाकरितां ज्या सवलती आहेत किंवा मिळाल्या, त्या सवलती साम्यवादी भाईच्या वांट्यास कधींच आलेल्या नाहींत. कैदखान्याच्या रानटी व्यवस्थेचाच अनुभव साम्यवादी आरोपींसाठीं वाढून ठेवलेला असतो, अशी आजवरची प्रथा आहे.

## दुरारोपांचें निरसन

म. गांधी १९४४ सालीं तुरुंगांतून सुटल्यावर त्यांच्याकडे कम्यूनिस्टांविरुद्ध ज्या तक्रारींचा वर्षाव सुरू झाला, त्यांत या पक्षाच्या सभासदांचें खाजगी चारित्र्य अतिशय गलिच्छ असल्याची एक जबरदस्त तक्रार होती. कम्यूनिस्टांच्या आहार-विहाराला कसलाच धरबंध नाहीं. आहारांत मांसाला महत्त्व असून तें खाण्यासाठीं प्रत्येक सभासदावर सक्ती केली जाते. स्त्री-पुरुषांच्या व्यवहारांत विवाहाच्या नीतीला कम्यूनिस्ट मुळींच मान देत नाहींत. हा व्यवहार अत्यंत स्वच्छंदपणानें चालतो; असें ह्या तक्रारींचें स्वरूप होतें. म. गांधींनीं ही तक्रार भा. जोशी यांना सादर केल्यावर त्यांनीं कम्यूनिस्ट खाद्यपेयांचा आस्वाद राजाजींसारख्यांनीं घेतला आहे व त्याबद्दल प्रशंसा केली आहे, तसेंच कम्यूनिस्ट हे स्त्री-पुरुषांतील स्वैराचाराला मुळींच सहन करीत नाहींत, उलट कोणाचें या बाबतींत दुर्वर्तन दिसून

आल्यास त्याला पक्षांतून हाकून लावतात; कारण एकपत्नीकत्व हा मार्क्सच्या विचारमालिकेंतील एक महत्त्वाचा सिद्धांत आहे, असा भा. जोशी यांनीं खुलासा मांडला व तसें करतांना तक्रारखोरांच्या खोडसाळ दुटप्पी मनोरचनेवर त्यांनीं झगझगीत उजेड टाकला. तथापि, म. गांधींचे सारे संशय नष्ट झाले नाहींत. कारण त्यांचे पूर्वग्रह; अर्थात् त्यांच्याकडे कम्यूनिझमची नालस्ती करणारांसंबंधाचा त्यांचा विश्वास. गांधीजी एका पत्रांत म्हणतात:—'मी जर पूर्वग्रहांनीं पछाडलेला नसतों, तर तुमचीं उत्तरें मीं बिनदिक्कत मान्य केलीं असतीं.' (गांधी-जोशी पत्र. पान २१) म. गांधींच्या ठिकाणीं जो न्यायान्यायाचा विवेक व प्रांजळपणा होता, ह्या योगानें त्यांनीं आपल्या मनावरील पूर्वग्रहाच्या पगड्याची कबूली दिली, व कम्यूनिस्टांचा उत्साह निःस्वार्थीपणा, श्रमशीलता व शिस्त वगैरे गुणांचा मोकळपणानें गौरवहि गाइला. गांधीजींच्या सहकाऱ्यांनीं मात्र कम्यूनिस्ट तेवढा देशद्रोही अशा ठाम समजुतीनें त्यांना कॉंग्रेसच्या कारभारांतून हुसकून लावलें. कम्यूनिस्ट हा कॉंग्रेसच्या छायेंत किंवा त्या संस्थेच्या तत्त्वाचें ढोंग माजवून देशांत पुष्टि पावलेला पक्ष नसल्यानें त्याला हुसकून लावलें म्हणून त्याचें नुकसान होणारें नव्हतें. १९४२ मध्यें देशद्रोही म्हणून कम्यूनिस्टांची नालस्ती जोरानें सुरू झाली व १९४६ मध्यें त्या नालस्तीपायीं हा पक्ष कॉंग्रेस-बाहेर ढकलण्यांत आला; पण या नालस्तीच्या काळांतच या पक्षाचे सभासद सुमारें ५० हजारांनीं वाढले. १९४२ सालीं सभासदांची संख्या अवघी ४ हजार होती, ती १९४६ सालीं ५३ हजार झाली. नुकतेंच या पक्षाचें अखिल भारतीय अधिवेशन कलकत्त्यास (फेब्रु-मार्च १९४८ मध्यें) भरलें असतां सभासदांची संख्या ९० हजारांच्या घरांत असल्याचें सांगण्यांत आलें. ह्यांच्या नेतृत्वाखालीं देशांतील सुमारें २० लाख किसान व कामगार आहेत.

## हिंदी राजकारणांतला रशिया

कम्यूनिस्ट पक्ष देशद्रोही या आरोपाचें मूळ सुरुवातीस तो रशियाच्या कम्यूनिस्ट इंटरनॅशनलला जोडलेला होता या स्थितींत आहे. हिंदी राजकारण व रशिया यांचा संबंध इंग्रजी राज्याच्या प्रारंभापासून आहे. ब्रिटिशांचीं अफगाण-युद्धें रशियाच्या भीतीनें झालीं. १८५७ सालीं हिंदी लष्करी

बंडाला रशियाची फूस होती, अशी माहिती त्या बंडाच्या कागदपत्रांतून पहायला सांपडते. १८७८ सालीं देशी भाषेंतल्या वृत्तपत्रांची मुस्कटदाबी करणाऱ्या कायद्याच्या समर्थनांत देशी वृत्तपत्रें रशियन—धार्जिणीं असल्याचा प्रवाद आढळतो. १८८५ मध्यें आणखी एकदां रशियन-आक्रमणाची हूल उठली होती. हिंदुस्थानचा अवाढव्य लष्करी खर्च रशियाच्या धास्तीनेंच सुरू होता. १९०५ सालीं रशियाला जपान देशानें रणांगणांत चारीमुंडे चीत पाडल्यावर ही धास्ती संपली. पण रशियन राज्यक्रांतीनंतर पुनः रशियाच्या कारस्थानाची धडकी ब्रिटिशांच्या छातींत उठली. या धडकीच्या परिणामांतून कॉंग्रेस, म. गांधी व त्यांच्या चळवळी सुटलेल्या नाहींत. बारडोली येथें सारावंदीची लढाई म. गांधींनीं चालविली, तेव्हां मुंबई-कलकत्याचीं अँग्लोइंडियन पत्रें या लढाईचा उगम रशियांत आहे असें प्रलाप काढीत असल्याचें पुष्कळांच्या लक्षांत असेल. परंतु त्याची म. गांधींनीं पर्वा केली नाहीं. कॉंग्रेस व रशिया यांचा कसलाहि संबंध केव्हांहि नसतां जर वरच्या सारखे आरोप उच्चारले गेले तर रशियन संस्थेशीं संबंध असलेल्या हिंदी कम्यूनिस्टाबद्दल त्या आरोपांच्या भाषेनें कुणीहि वाटेल तें बोलत सुटावें यांत आश्चर्य कसलें ! पण आश्चर्य हें कीं, कम्यूनिस्ट इंटरनॅशनल या संस्थेचें रशियानें दुसऱ्या महायुद्धांत पूर्णपणें विसर्जन केल्यावरहि हा आरोप शिल्लक रहावा. कम्यूनिस्टांवर लहान मोठे खटले आजवर कितीतरी झाले, परंतु सदर आरोपांचा पुरावा एकाहि खटल्यांत पुढें आलेला नाहीं. आपल्या कार्यासाठीं परराष्ट्राकडे पहाण्याची रीत इतिहासामध्यें आहे. हिंदुस्थानला आयर्लंडची मदत व्हावी, ब्रिटिश मजूर पक्षाची मदत मिळावी अशा दृष्टीचे प्रयत्न कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांनीं म. गांधींच्या उदयापूर्वी केल्याचे दाखले आहेत. दुसऱ्या महायुद्धांत जपान—जर्मनीबाबत धार्जिणेपणा दाखविणारे पुढारी कॉंग्रेसच्या गोटाबाहेरचे नव्हते, तरीसुद्धां कॉंग्रेसतर्फे त्यांचा उदो उदो करण्यांत आला, हें या संदर्भांत लक्षांत ठेवण्याजोगें आहे.

## कम्यूनिस्टांचा देशद्रोह ?

नावडतीचें मीठ आळणी म्हणतात त्यासारखा कम्यूनिस्टांवरील देशद्रोहाचा प्रकार आहे. हा आरोप १९४२ पासून फार मोठ्या प्रमाणांत

बळावला. १९४२ ऑगस्टपासून पुढें चालू असलेल्या अत्याचारांना कम्यूनिस्टांनीं हातभार लावण्याचें टाळलें म्हणून ते देशद्रोही असें मत ऐकूं येतें. काँग्रेसचे पुढारी तुरुंगांत कोंडले गेल्यावर लोकांनीं जें कांहीं केलें त्याची जबाबदारी आपल्यावर नाहीं, असें म. गांधींनीं सरकारला व पर्यायानें साऱ्या जगाला स्वच्छ सांगून टाकलें असतां त्या धामधुमीपासून आपल्या वळणांतील लोकांना दूर ठेवल्याबद्दल कम्युनिस्ट दोषी कसे ठरतात हे दोषारोप करणारांनाच ठाऊक! या चळवळीच्या जबाबदारीचा ठाव काढीत बसल्यास कांग्रेसमधील बड्या बड्या पुढाऱ्याच्या चित्ताचा गोंधळ दाखविणें अशक्य नाहीं. परंतु १९४२ ऑगस्टच्या ठरावानें म. गांधींना कांग्रेसनें सर्वाधिकार देण्यांत आल्यामुळें त्यांचें एकट्याचेंच मत जमेस धरणें प्रशस्त ठरतें. त्यांच्याकडून कसल्याहि चळवळीला संमति मिळालेली नव्हती. त्यांच्या मनांतून सरकारशीं पत्रव्यवहारानें व समक्ष विचारविनिमय करावयाचा होता; परंतु ठराव पास झाल्यानंतर दुसरा दिवस उजाडण्याच्या आंत सरकारनें सगळ्या पुढाऱ्यांना पकडल्यामुळें अशा विचारविनिमयाला सवडच उरली नाहीं; व लोकांनीं काय करावयाचें, कसें वागावयाचें या बाबतींत मार्गदर्शनहि झालें नाहीं. तथापि 'रशिया-चीनच्या बचावाला कोणत्याहि प्रकारें धोका उत्पन्न करावयाचा नाहीं. त्यांचें स्वातंत्र्य मोलाचें असून त्याचें रक्षण झालें पाहिजे. त्याचप्रमाणें संयुक्त राष्ट्रांचें संरक्षणसामर्थ्य खच्ची होऊं द्यावयाचें नाहीं' असा निर्णय ऑगस्ट ८ च्या ठरावांत आहे. तो मार्गदर्शक समजल्यास आगगाड्या पाडणें, तारायंत्रें तोडणें वगैरेसारखे जे उपद्रव सर्वत्र दिसूं लागले ते या निर्णयाची पायमल्ली करणारे सहजच ठरतात. सुरुवातीच्या असल्या उत्पातानंतर हिंदुस्थानांत कित्येक टापूंमध्यें खून, लुटालूट, जाळपोळ असल्या दुष्ट कृत्यांची लाट उसळली व बरेच दिवस चालली. हीं कृत्यें आपणच केलीं असें छातीला हात लावून अभिमानानें सांगणारा व लोकांत मिरवणारा एक काँग्रेसच्या बगलेंतील पक्ष आहे. कम्यूनिस्टांनीं असल्या कृत्यांना आळा घालण्याचा यत्न केला; मोठाल्या शहरांतून कारखान्यांचे संप होऊं दिले नाहींत. कम्यूनिस्टांच्या या धोरणानें वरच्यासारख्या कृत्यांत भर पडण्याऐवजीं अडथळा झाला, हीं कृत्यें क्रांतीचीं असल्यानें कम्यूनिस्टांचें वर्तन क्रांतीला बाधलें, म्हणून ते देशद्रोही असा युक्तिवाद

पुढें येत असतो. परंतु कम्यूनिस्टांचें समर्थन म. गांधींसकट अनेक कॉंग्रेस पुढाऱ्यांच्या शब्दांनीं करतां येतें. जी चळवळ कांग्रेसच्या पुढाकाराची नव्हती, त्या चळवळींत कम्यूनिस्ट कसे वागले, याची शहानिशा कांग्रेस-मार्फत केली जाणें अगदींच अप्रस्तुत दिसतें. तरीमुद्धां ज्या अर्थीं अशी शहानिशा करून कम्यूनिस्टांना दोष दिला जातो, त्या अर्थीं त्यामध्यें केवळ वस्तुस्थितीच्या निर्विकार अभ्यासाव्यतिरिक्त कांहीं निराळा हेतु असला पाहिजे हें उघड आहे.

## कम्यूनिस्ट व हिंसा

शेवटीं कम्यूनिस्ट हिंसावादी आहेत, या आक्षेपाचा विचार करून दुसऱ्या विषयाकडे वळणें बरें. कम्यूनिस्टांना अहिंसा—हिंसेचा विधिनिषेध नसतो, अशी कल्पना प्रचलित आहे. ते अहिंसेचे देव्हारे माजवीत नाहींत हें खरें; पण उठल्यासुटल्या ते हिंसेचें प्रतिपादन करीत नाहींत हें सुद्धां तितकेंच खरें आहे. किंबहुना हिंसेवांचून क्रांति घडण्याची जगाच्या व्यवहारांत शक्यता दिसती तर ते सुद्धां अहिंसेच्या पुरस्काराला सिद्ध झाले असते. दुर्दैवानें जगाचा इतिहास हिंसेनें व्यापलेला आहे. व कम्यूनिस्ट पक्ष जन्मास येण्याच्या आधींचीं हजारों वर्षें हिंसेच्या कृत्यांनीं रंगलेलीं आहेत. युरोपच्या गेल्या दोनशें वर्षांचाच इतिहास पाहिला तर रशिया—इंग्लंड, फ्रान्स—जर्मनी, इंग्लंड—अमेरिका, रशिया—जपान या देशांच्या लढाया किंवा पहिलें महायुद्ध यांसारख्या हिंसेच्या एकाहून एक वरचढीच्या घटना दृष्टीस पडतात. सर्वत्र जोंपर्यंत हिंसेला जिवंत ठेवणारी समाजव्यवस्था व पर्यायानें राज्यपद्धति अस्तित्वांत आहे तोंवर एकाच क्रांतीशील पक्षानें अहिंसेची शपथ घेऊन उपयोग नाहीं; तशी शपथ घेणें म्हणजे आत्महत्याच होय, असें कम्यूनिस्टांना वाटतें. जोंवर मूठभर लोकांची भांडवलशाही असंख्य जनतेला मरडून काढीत राहील तोंवर अहिंसेच्या पवित्र तत्त्वाला जगाच्या व्यवहारांत बिलकुल थारा नाहीं; भांडवलशाहीचा नाश झाल्यानंतर अहिंसा, शांति या तत्त्वांचा प्रभाव मानवांत कायमचा नांदेल असा त्यांचा दृढ विश्वास आहे व त्याप्रमाणेंच कम्यूनिस्ट वागतात. त्यांची ही विचारसरणी बाहेरच्या जगांतील नव्हे, तर हिंदुस्थानांतील परिस्थितीचेंहि निरीक्षण केल्यास चुकीची

नसल्याबद्दल खात्री पटेल. मानवसमाजाला अहिंसाच श्रेयस्कर हें कम्यू-निस्टांना अमान्य नाहीं. पण समाजांत जोंवर एकमेकांना विरोधी असे दोन वर्ग आहेत तोंवर एका वर्गानें म्हणजे आपलें नशीब काढूं इच्छिणाऱ्या वर्गानें अहिंसेची उपासना करून भागणार नाहीं, हा त्यांचा सिद्धांत गंभीर-पणानें विचार करण्यासारखा आहे. कम्यूनिस्ट आपल्या कामांत जात, धर्म देव या गोष्टींचा वासहि लागूं देत नाहींत हें प्रसिद्ध आहे. त्याची तपशील-वार झडती न घेतल्यास चालेल.

हिंदी राजकीय उद्धारासाठीं निघालेल्या कम्यूनिस्ट पक्षाच्या माहितीचा विस्तार त्या पक्षाबद्दल जीं मतमतांतरें लोकांमध्यें घुमतात, त्यांची साधार चिकित्सा होण्यासाठीं केलेला आहे. त्या पक्षाचा पुढील मार्ग निर्विघ्न नाहीं. त्याचा पुढील काळ खडतर दिसतो. कदाचित पूर्वी जसा तो एकदां बेकायदेशीरपणाच्या खाईत लोटला गेला होता तसा पुढेंहि लोटला जाईल; तथापि त्या पक्षाचा कर्तृत्वाचा इतिहास वाया जाणारा नाहीं; कारण आज तरी त्यानें कॉंग्रेसच्या खालोखाल आपली योग्यता वाढवून घेतलेली आहे.

## कॉंग्रेस-सोशॅलिस्ट पक्ष

१९३० व १९३२ च्या कॉंग्रेसच्या चळवळीनें सरकारमार्फत तुरुंगांत पोंचविलेल्या अनेक तरुण कॉंग्रेसवाल्यांची म. गांधींच्या शिकवणावरील श्रद्धा कमी झाली व कॉंग्रेसच्या तत्त्वज्ञानांत फेरफार करणें अवश्य आहे असें त्यांना वाटूं लागलें. १९३० नंतर कॉंग्रेसच्या लोकांना तुरुंगवासांत पुष्कळ सवलती असल्यानें तेथें मिळणाऱ्या रिकामपणीं सोशॅलिझम्, कम्यूनिझम् वगैरे विषयांचीं पुस्तकें वाचून खऱ्या राज्यक्रान्तीला म. गांधींचे मार्ग अपुरे पडतात, अशी या तरुण देशभक्तांची खात्री होऊन ते बाहेर पडल्या-वर त्यांनीं आपला एक स्वतंत्र पक्ष स्थापन केला. १९२४ सालीं व त्या नंतर १९२९ मध्यें कम्यूनिस्ट पक्षाचे पुढारी व कार्यकर्ते सरकारानें पकडले त्यावेळीं त्यांच्या वस्तीची झडती घेतेवेळीं लाल पुठ्याचें पुस्तक दिसलें कीं,—मग तें तुकारामाच्या गाथेचें किंवा ज्ञानेश्वरीचें असलें तरी—तें रशि-यन तत्त्वज्ञानाच्या लालरंगी राज्यद्रोहाचें असलें पाहिजे असे जे सरकारी अंमलदार समजत असत व जप्त करीत असत. त्यांना पुढें समाजसत्ता-

वादाचीं पुस्तकें तुरुंगांत वाचायला देण्याची हरकत वाटेनाशी व्हावी, हें गूढ कॉंग्रेसच्या भक्कमपणाला फटी उत्पन्न करून उतार पाडावा अशा सरकारी धोरणाचा मागोवा घेतल्याशिवाय उकलणारें नाहीं. कॉंग्रेसच्या गोटांत निराळ्या विचारांची एक नवी फळी जन्मास यावी, व ती जन्मास येण्याला समाजसत्तावादाचे अभ्यासाला सवड दिली तर उपयोगी पडेल असा तेव्हां सरकारी उद्देश असल्यास तो सफल झाला. १९३० आणि १९३२ चे कॉंग्रेस कार्यकर्ते तुरुंगांतून बाहेर पडतांच त्यांच्या हातून जें वाङ्मय लिहिलें गेलें तें पाहिल्यास म. गांधींच्या मार्गाबद्दल अविश्वास व असंतोष त्यांच्या ठिकाणीं उद्भवल्याचा पुरावा आढळतो. परंतु कॉंग्रेसमधून फुटून आपल्या पक्षाचा स्वतंत्र डेरा उभारण्याची कुवत नसल्यामुळें त्यांनीं पक्षाची स्थापना केली तरी ते कॉंग्रेसच्याच पोटांत राहिले. कॉंग्रेसच्या नेहमींच्या कारभारांत त्यांची धूसफूस चाले, पण अखेरच्या निर्णयाची वेळ आली कीं कॉंग्रेस-दळांतील इतर सामान्य होयबांच्या सोबतीनें रहावें, अशी या पक्षाच्या धुरीणांची पद्धत होती. कॉंग्रेस-सोशॅलिस्ट पक्ष स्थापन झाला तेव्हां हिंदी कॉलेज-तरुणांमध्यें आपली संघटना व्हावी अशी स्फूर्ति दिसूं लागली. जिकडे तिकडे युवकसंघांचें पीक आलें. त्यांचीं अधिवेशनें भरलीं. साधारणपणें तरुणांमध्यें गांधीवादासंबंधीं प्रेमादर तितकासा अनुभवास येत नाहीं, या परिस्थितीचा आधार कॉंग्रेस-सोशॅलिस्ट पक्षाला वाटत असला पाहिजे. परंतु युवकसंघाचें स्वतंत्र पीक लवकरच लोपलें व त्यांतल्या कांहींनीं कॉंग्रेसचें नांव सांगून काम चालविलें, तर कांहीं कम्यूनिस्टांच्या तंत्रानें राहूं लागले. कॉंग्रेसच्या नांवाचा टिळा लावणारांपैकीं पुष्कळजण अलीकडे सोशॅलिस्ट पक्ष आपल्याला जवळचा असें म्हणतांना दिसतात.

मुळांत सोशॅलिस्ट व कम्यूनिस्ट हीं एकाच विचारसरणीची सौम्य तीव्र प्रजा असल्यामुळें त्यांची कर्मभूमि कामकरी—शेतकरी यांची संघटना हीच ठरते; पण सोशॅलिस्टांनीं या संघटनेंत राबण्याचें कर्तव्य केव्हांच निष्ठेनें स्वीकारलें नाहीं; शिवाय त्या संघटनांतून कम्यूनिस्टांचें कित्येक वर्षांचें प्राबल्य असल्यामुळें सोशॅलिस्टांना या बाबतींत मोकळें मैदान उरलेलें नव्हतें. म. गांधींच्या धोरणाची एक कामगार-संघटना कम्यूनिस्टांच्या जोडीनें होती. कॉंग्रेसची पुण्याई आपल्यामागें असावी या भावनेपायीं या

काँग्रेसकामगारांच्या संघटनेची सोशालिस्टांना अडचण भासत असल्यास नवल नाहीं. पं. जवाहरलाल नेहरूंना म. गांधींनीं आपला राजकीय कर्तबगारीचा वारसा दिलेला व पंडितजी सोशॉलिझम्, कम्यूनिझम् या पंथांच्या शिकवणीचे ज्ञाते व चहाते; यामुळें त्यांच्या पुढारीपणानें काँग्रेसच्या मुख्य सूत्रधारांना केव्हांना केव्हां आपल्या मतांची वेसण पत्करावी लागेल असाहि भरंवसा सोशॉलिस्टांची उमेद टिकवीत असेल. काँग्रेसच्या संघटनेशीं जवळजवळ बरोबरीच्या मनुष्यबळानें सामना देणारा जो कम्यूनिस्ट पक्ष त्याची मजबुती पोखरण्याचें सामर्थ्य आपल्यांत आहे, ह्या सामर्थ्याचा प्रयोग विजयी झाल्यास काँग्रेसच्या गांधीवादी पुढाऱ्यांवर त्याचा प्रभाव पडून आपली मातब्बरी काँग्रेसच्या गोटांत वाढेल, असल्या समजुतीनें सोशॉलिस्टांनीं कम्यूनिस्टांविरुद्ध बरींच वर्षे आपला मोर्चा वळविलेला आहे. आपण म. गांधींच्या अहिंसा-सत्याचे परम भक्त व कम्यूनिस्ट हिंसा-असत्याचे पुरस्कर्ते, अशा तऱ्हेच्या टीकेचा मारा सोशॉलिस्टांनीं आपल्या मुख्य प्रतिपक्षावर चालविला; परंतु १९४२ ते १९४५ या तीन वर्षांत ठिकठिकाणीं जो लुटारूपणा व रक्तपात झाला त्याचें कर्तृत्व आपलेंच असा सोशॉलिस्टांनीं अभिमानानें जोराचा दावा मांडल्यापासून त्यांच्या सत्य-अहिंसेविषयींचें प्रेम खरें किती याचीहि सर्वांना ओळख पटली. सत्याचा व्यवहार अगदीं उघडा असावा ही म. गांधींची निष्ठा तर सोशॉलिस्टांनीं भूमिगत राहून वरच्यासारखे अनर्थ घडवून आणले. (जाळपोळ, लुटालूट, मारहाण वगैरे कृत्यांच्या परंपरेचा म्होरकेपणा सोशॉलिस्ट म्हणविणारांचा किती व गांवोगांवच्या पटाईत गुंडागिरीचा किती असा प्रश्न उपस्थित होण्यासारखा असूनहि तूर्त सोशॉलिस्टांचा पुढारीपणा मानायला हरकत नाहीं.) जाळपोळ, लुटालूट, हीं कृत्यें अहिंसेच्या सरहद्दीपलीकडचीं होत हें कळायला कठिण नाहीं. काँग्रेसच्या गांधीवादी पुढाऱ्यांनीं सोशॉलिस्टांच्या या कर्मांचा निषेध केला नसला तरी काँग्रेसच्या नेतृत्वाबद्दलची भाऊबंदकी काँग्रेसच्या कारभारांत धुमसत होती. कितीहि मतभेद असला तरी आपण काँग्रेसचेच, काँग्रेसचें आपण नुकसान करणार नाहीं, म. गांधी हीच आपल्या श्रद्धासर्वस्वाची व्यक्ति, अशी भूमिका सोशॉलिस्ट पक्षानें वारंवार जाहीर केलेली आहे. परंतु काँग्रेसमध्यें डाळ

शिजत नाहीं व बाहेरचे कॉंग्रेसप्रेमी आपल्याकडे संशयानें बघतात, ही स्वतःची केविलवाणी स्थिति सोशॅलिस्टांना जाणवत नाहीं असें नाहीं. या स्थितीमुळेंच कॉंग्रेसला स्वच्छ फारखत लिहून देण्याचें धैर्य सोशॅलिस्टांच्या अंगीं संचरण्याचा संभव खरा ठरला आहे. त्यानंतर कॉंग्रेस व कम्यूनिस्ट या दोन आघाड्यांवर त्यांना लढाई द्यावी लागेल. त्यापूर्वी भरपूर मनुष्यबळ आपल्या पाठीशीं उभें करणें सोशॅलिस्टांना प्राप्त आहे.

## श्री. मानवेंद्रनाथ रॉय

श्री. मानवेंद्रनाथ रॉय हे रशियन राज्यक्रांतीच्या तालमींतून बाहेर आलेले एक विशेष कर्तृत्वाचे, अधिकाराचे व अनुभवाचे कम्यूनिस्ट या नात्यानें हिंदुस्थानांत एकदां अतिशय प्रिय झाले. हिंदुस्थानांत ते वेषांतर करून आले; त्यांच्यावर ब्रिटिश राज्य उलथून पाडण्याच्या कटाचा आरोप होता. त्यांचा हिंदुस्थानांत प्रवेश झाल्याचा सुगावा पोलिसांना लागला व त्यांनीं शेवटीं रॉयबाबूंना पकडलें. त्यानंतर त्यांच्या वाटणीस तुरुंगवास यावा हें सरळच आहे. तुरुंगांतून सुटल्यावर रॉयबाबूंनीं कॉंग्रेसच्या कामगिरीचें गोडवे गाऊन तिच्या कारभारांत भाग घेण्याला सुरुवात केली. पण कॉंग्रेसचें राजकारण त्यांच्या स्वभावाला न मानवल्यानें त्यांनीं कॉंग्रेसला रामराम ठोकला. कम्यूनिस्ट म्हणून रॉयबाबू हिंदी कम्यूनिस्ट पक्षांत सामील होतील, हा अंदाज त्यांनीं खरा ठरूं दिला नाहीं. त्यांनीं निराळाच पंथ काढला. रॅडिकल डेमोक्रॅटिक पार्टी असें आपल्या पंथाला नांव देऊन किसान-कामगारांना हाताशीं धरण्याचा त्यांनीं उद्योग चालविला. त्यांना कित्येक निष्ठेचे अनुयायी लाभले असून ते आपापल्या टापूंत मतप्रचाराचें व लोकसंग्रहाचें काम करतांना आढळतात. दरसाल त्यांच्या अनुयायांचीं अधिवेशनें भरतात. दुसऱ्या महायुद्धाच्या काळांत या पंथाला सरकारांतून मिळणाऱ्या देणगीचा बोभाटा झाल्यामुळें त्याविषयीं लोकांत प्रतिकूलतेचे वारे वाहूं लागले. आतां त्या पंथाच्या तत्त्वज्ञानाचा रंगसुद्धां पालटला आहे. कम्यूनिस्ट व सोशॅलिस्ट यांच्याशीं कराव्या लागणाऱ्या चढाओढींत या पंथाला कोणती गति मिळेल तें पहावयाचें आहे.

येथवर सांगितलेले पक्ष जातीयता-वादापासून अलिप्त असे आहेत. आणखी एक कामगारांत मोडणारा पंथ म्हणजे अस्पृश्यांचा. हा पंथ हिंदु समाजांतल्या कांहीं विभागांचा असल्यानें तो आपल्या जातीच्या आग्रहानेंच काम करीत असतो. याचें नेतृत्व डॉ. भीमराव आंबेडकर यांच्याकडे आहे. हा पक्ष चांगला संघटित व शिस्तीचा आहे. त्याची संख्या साहजिकच मर्यादित आहे. परंतु त्यांनीं संपाच्या धामधुमींत आपलें अस्तित्व चांगलें निदर्शनास आणलेलें आहे.

म. गांधींच्या धोरणाप्रमाणें काम करणारा एक राष्ट्रीय शिक्क्याचा व कॉंग्रेसच्या निशाणाचा आणखी एक पंथ आहे. याच्यामागें कॉंग्रेसचें सामर्थ्य असूनहि कामगारांच्या दुनियेंत त्याचा प्रभाव फारसा दिसत नाहीं.

## स्वराज्यवादाचीं स्थित्यंतरें : : १०

### प्राथमिक आकांक्षा

१८५७ सालीं उद्भवलेल्या लष्करी बंडाळीची आग इंग्रजांनीं ' खूप शर्तीनें ' १८५९ मध्यें साफ विझवून टाकली. १८५८ मध्यें कंपनी सरकाराला तिलांजली देऊन ब्रिटिश राज्यकिरीटाचें हिंदुस्थान एक भूषण बनलें. नव्या राज्यकर्त्यांना हिंदी प्रजेचा संतोष साधण्यासाठीं कांहीं हक्क देण्यावांचून गत्यंतर नव्हतें; त्यांनीं १८६० सालीं हिंदुस्थानांत कायदेमंडळांची स्थापना करून त्यामध्यें हिंदी प्रतिनिधींना बसण्याची व सरकारी कामकाजावर बोलण्याची सवड ठेवण्यांत आली. हिंदी प्रतिनिधी लोकांनीं निवडलेले नसून सरकारी नेमणुकीचे असत हें निराळें सांगायला नको. असे प्रतिनिधी कितीहि निःस्पृह असले तरी त्यांच्या कडक स्पष्टोक्तीचा सरकारी कारभारावर मुळींच परिणाम घडत नव्हता. सरकारी कारभार हिंदी प्रतिनिधींच्या प्रतिकूलतेची क्षिति न बाळगतां आपल्या मर्जीनें चाललेला होता; लोकांचे सरकारनें नेमलेले सारेच प्रतिनिधी सरकारी राजीनाराजीचा तोल पाहून होयबाप्रमाणें वागणारे नव्हते, तरी आधीं हिंदी सभासदांची संख्या थोडी व त्यांत सरकारनें आपली वर्णी कायदेमंडळांत लावून आपल्याला नामदार बनविलें याची ओशाळगत न वाटणारे त्यांतहि थोडेच; सर्वांनाच सरकाराचा वचक बाळगण्याची जरुरी भासावी असा तो काळ होता. यामुळें सरकारला त्यांच्या प्रेम-द्वेषाची दखल घ्यावीशी न वाटल्यास नवल नाहीं. तथापि लोकशिक्षणाच्या दृष्टीनें या कायदेमंडळांचा उपयोग झाला. सरकारी कायद्यांच्या परिणामाची छाननी करण्याची संवय या प्रतिनिधींना जडली. आपल्या विचारांच्या मागें लोकजागृतीचें बळ

असलें पाहिजे, तरच आपल्या कायदेमंडळांतील कामाला वजन येईल हें तत्त्व अशा प्रतिनिधींना व त्यांच्या द्वारें शिकाऊ होतकरू देशभक्तांना कळलें; लोकमत संघटित होण्याकरितां संस्था निर्माण झाल्या, त्यांच्या विद्यमानें जाहीर सभा भरविण्याचा व त्यामध्यें सडेतोड भाषणें करण्याचा प्रघात पडला. या संस्था साहजिकच बड्या लोकांच्या प्रेरणेनें उत्पन्न होऊन त्यांच्याच तंत्रानें चालविल्या जात असत. १८५३ मध्यें कंपनी-सरकारला राज्याधिकाराची नवी सनद मिळावयाची होती. १८१३ पासून दर वीस वर्षांनीं कंपनीच्या राज्यकारभाराची बारीक चौकशी करून मग सनद द्यावयाची असा नियम ठरला होता. त्याप्रमाणें १८३३ मध्यें चौकशीमंडळापुढें साक्ष देण्याकरितां राजा राममोहन राय हे गेले होते, हें सर्वांच्या परिचयाचें आहे. १८५३ सालीं होऊं घातलेल्या चौकशींत आपली गाऱ्हाणीं सादर व्हावीं म्हणून कलकत्त्यास व पुण्यास मिळून दोन संस्था अस्तित्वांत आल्या. पुण्यास जन्मलेल्या संस्थेचें नांव 'कल्याणोन्नायक मंडळ' होतें. कलकत्त्याच्या संस्थेचें नांव 'ब्रिटिश–इंडिया ॲसोसिएशन' हें होतें. या संस्थांचें उत्पादक व चालक बडे लोक म्हणजे इनामदार, जहागिरदार, जमीनदार या वर्गाचे असल्यानें सामान्य जनतेच्या दुःखाची आंच त्यांना बेतानेंच होती. कंपनी-सरकारनें इनामदारांच्या मिळकतीच्या कायदेशीरपणा तपासतांना कित्येक इनामदार डबघाईस आले; या परिस्थितीकडे विलायती राज्यकर्त्यांचें लक्ष्य वेधावें आणि आपल्याला भोगावे लागणारे अन्याय दूर व्हावे, असा या संस्थांचा उद्देश होता. पुण्याच्या मंडळातर्फे गोपाळराव देशमुख उर्फ लोक-हितवादी यांनीं इंग्लंडास साक्षीला जावें असाहि बेत तेव्हां घाटत होता, पण त्याला फळ आलें नाहीं. कल्याणोन्नायक मंडळीचा कारभार लवकरच आटोपला; त्या मानानें ब्रिटिश–इंडिया ॲसोसिएशन ही संस्था बहुत काळ टिकली. परंतु तिच्याविषयीं मध्यम वर्गाच्या सुशिक्षित जनतेला कालांतरानें आस्था वाटेनाशी होऊन १८७६ सालीं कलकत्त्यास सुरेंद्रनाथ बानर्जींनी नवी 'इंडियन ॲसोसिएशन' नांवाची संस्था जन्मास घातली. व पुढें अनेक वर्षेंपर्यंत हीच संस्था परिणामकारक रीतीनें लोकजागृतीचें काम बजावीत होती. मुंबईस १८६५ सालीं 'बॉंबे ॲसोसिएशन' निर्माण करण्यांत

आली. तिच्यामध्यें मुंबईस नव्यानें उदयास येणारे भांडवलवाले व इतर सुशिक्षित यांचा हात होता. परंतु तिचें काम समाधानकारक नाहीं, अशी खात्री पटल्यावर १८८५ सालीं 'बॉंबे प्रेसिडेन्सी ॲसोसिएशन' ही संस्था फेरोजशहा मेथांनीं उदयास आणली व तिनें आपलें वजन मोठ्या प्रमाणांत वाढविलें. पुण्यास १८७० नंतर 'सार्वजनिक सभा' या संस्थेनें रानड्यांच्या नेतृत्वानें जवळजवळ पंचवीस वर्षें हिंदी राजकारणांत गाजविलीं. या सगळ्या संस्थांची कार्यपद्धति एकच होती. लोकांचें गाऱ्हाणें उपस्थित झालें, कीं त्याचा सरकारी कागदपत्रांच्या आधारें सांगोपांग विचार करून सरकारांत त्या गाऱ्हाण्यांविरुद्ध अदबशीर अर्ज गुदरावा, पत्रव्यवहार करावा, प्रसंगविशेषीं गव्हर्नर, व्हाईसरॉय यांच्या भेटीस शिष्टमंडळ पाठवून त्यांच्या चरणीं आपलें मनोगत रुजू करावें, त्यांचें बहुधा रुक्ष असलेलें किंवा वरकरणीं साखर पेरल्यासारख्या नकली गोडीचें उत्तर ऐकावें आणि अशा मोठ्या प्रस्थाचें दर्शन-संभाषण लाभल्याच्या कृतार्थतेनें घरोघरीं जावें अशी ती कार्यपद्धति होती.

अर्ज, शिष्टमंडळ या गोष्टी सकृद्दर्शनीं अगदीं निष्फळ ठरणाऱ्या असतांहि त्यांचा अवलंब पहिल्या पिढीच्या पुढाऱ्यांनीं सोडला नाहीं. सरकारवर त्याचा परिणाम घडत नसला तरी लोकशिक्षणाच्या दृष्टीनें त्याचें अतिशय महत्त्व होतें. अर्जांचे मसुदे वृत्तपत्रांतून छापले जाऊन त्यांच्या स्वरूपाची सटीक ओळख वृत्तपत्रें लोकांना करून देत असत. त्या अर्जांचा किंवा शिष्टमंडळाच्या सवाल-जबाबाचा उपयोग न झाल्यास वृत्तपत्रें सरकारी बेपर्वा-ईची जी हजेरी घेत असत, तिनें लोकांत असंतोष उद्भवून तो पोसला जात असे. 'हे अर्ज सरकारासाठीं नसून लोकांसाठीं आहेत, लोकांना शिक्षण देण्यासाठीं, जागृत करण्यासाठीं आहेत;' अशा अर्थाचा खुलासा, गोखले सरकारी धोरणाबद्दल निराश होऊन बोलूं लागले तेव्हां रानड्यांनी त्यांच्या-जवळ एकदां केला होता. सगळीकडचे हिंदी पुढारी याच दृष्टीनें आपल्या अर्जदारीचा मार्ग क्रमीत होते व जनतेची जागृति वाढतां वाढतां ती क्रिया-शलि होऊन सरकारी बेपर्वाईला पायबंद लावील अशी त्यांची उमेद होती. अशा रीतीनें सभा, ठराव, अर्ज, वृत्तपत्रांतील टीका या उपायांनीं पुरेशी लोकजागृति व लोकांच्या राजकीय हृद्गताची एकवाक्यता अनुभवास येऊं

लागलो, तेव्हा आपल्या मागण्यांचें पर्यवसान काय याचाहि पुढाऱ्यांमध्यें ऊहापोह होऊं लागला. हिंदुस्थान-सरकार हिंदी जनतेच्या तक्रारींची विचार-पूस करण्याचें सौजन्य दाखवीत नाहीं; त्याच्या कारभाराखालीं भरडल्या जाणाऱ्यांच्या किंकाळ्या त्याला ऐकूं जात नसल्यासारखा त्याचा व्यवहार बेधडक चाललेला आहे, याचें कारण त्यावर लोकांचें दडपण नाहीं; अडव-णुकीचें दडपण आणावें तर तशी लोकांमध्यें ताकत व शिस्त नाहीं, उघड सशस्त्र प्रतिकाराचें नांवच घ्यायला नको; मग दडपण कसें उत्पन्न करावयाचें हा प्रश्न रानड्यांनीं 'प्रातिनिधिक राज्यपद्धति' (Representative Government) या तोडग्यानें सोडविण्याची कल्पना १८७४ सालीं काढली. त्यांच्यासमोर ब्रिटिश पार्लमेंटाचें उदाहरण होतें. त्या पार्लमेंटांत जसे आयर्लंडचे लोकप्रतिनिधी खुल्या निवडणुकीने जातात, तसे आपलेहि पाठवावे, अशी रानड्यांची त्यावेळीं कल्पना होती. या कल्पनेच्या पुरस्कारार्थ त्यांनीं सर्व प्रांतांमधून लोकांच्या सह्या गोळा केल्या. ही कल्पना आज थट्टेवारी उडवून लावण्याजोगी वाटेल, पण त्यावेळीं 'लोक प्रतिनिधींचें राज्य' हे शब्द हिंदी राजकारणांत प्रविष्ट करतांना ब्रिटिश राज्यकर्तृत्वाच्या पचनीं पडलेल्या राजकीय परिभाषा स्वीकारणें अवश्य होतें. तथापि पुढें थोड्याच वर्षांनीं, पण काँग्रेस स्थापन होण्याच्या पूर्वीं रानड्यांनीं हिंदुस्थानांत दांडगाईची क्रांति होऊं द्यावयाची नसेल, तर वसाहतींच्या पद्धतीचा जबाबदार राज्यकारभार येथें निर्माण केल्याखेरीज गत्यंतर नाहीं, अशी सूचना सरकारास केली होती. रानड्यांच्या अगोदर हिंदुस्थान देशांत पार्लमेंटाच्या धर्तीचीं स्वराज्यें अस्तित्वांत येऊन त्यांचें संघराज्य होईल, असें भविष्य लोकहितवादींनीं वर्तविलें होतें. लोकहितवादीसमोर अमेरिकन स्वातंत्र्याचा व संघराज्याचा कित्ता होता. तथापि रानड्यांच्या विचारसरणीनें ब्रिटिश साम्राज्यांतलि वसाहतींच्या स्वराज्याची कल्पना स्वीकारून आपल्या राजकीय आकांक्षेची अंतिम सीमा दाखविली. तरीसुद्धां पूर्वोक्त 'प्रातिनिधिक सरकारा'ची कल्पना सुटलेली नव्हती. तिचा उच्चार काँग्रेसच्या पहिल्या अधिवेशनांतून झालेला आहे. गोपाळ कृष्ण गोखले यांनीं १८९७ सालीं वेल्बी कमिशनपुढें साक्ष देतांना हिंदी प्रतिनिधी पार्लमेंटांत घ्यावे म्हणजे हिंदुस्थानांत निरंकुश रीतीनें वाटेल तशी पैशाची उधळपट्टी करण्याच्या

रिवाजाला आळा बसेल, असें सांगून वरील प्रातिनिधिक सरकारच्या कल्पनेलाच एक प्रकारें दुजोरा दिलेला होता.

### वसाहतीचें स्वराज्य कीं स्वातंत्र्य ?

हिंदी प्रतिनिधी पार्लमेंटांत पाठविण्याची सवलत मिळावी ही आकांक्षा काँग्रेसच्या चळवळींत कालांतरानें मागसली व वसाहतीचें स्वराज्य हें ध्येय त्या आकांक्षेच्या जागीं आलें. या ध्येयानें १९२९ अखेरपर्यंत हिंदी पुढाऱ्यांना जखडून ठेवलें होतें. १९३० सालीं स्वातंत्र्य शब्दाचा अर्थ 'पूर्ण स्वराज्य' असा काँग्रेसकडून सर्वांना आदेश मिळाला, तरी 'वसाहतीचें स्वराज्य' हें ध्येय म. गांधींसारख्या पुढाऱ्यांच्या मनांतून साफ गेलेलें नव्हतें. १९०५ सालीं या ध्येयाची वाच्यता काँग्रेसच्या अध्यक्षस्थानावरून गोपाळराव गोखल्यांनीं प्रथम केली. त्यानंतर निर्भेळ स्वातंत्र्य कीं वसाहतीचें स्वराज्य या विषयाचा केवळ तात्त्विक दृष्ट्या ऊहापोह करण्याला श्यामजी कृष्ण वर्मांच्या 'इंडियन सोशॉलॉजिस्ट' या पत्रांतील एका लेखानें संधी आणून दिली. १९०६ सालीं 'स्वराज्य' या देशी शब्दानें दादाभाई नौरोजींच्या अध्यक्षतेखालीं कलकत्त्यास भरलेल्या काँग्रेसच्या अधिवेशनांत हिंदी राजकीय ध्येयाची भाषा निश्चित झाली; तथापि या शब्दासंबंधीं कायद्याचें भय शिल्लक उरलेंच होतें. १९०७ मध्यें कलकत्त्याच्या हायकोर्टांतून एक दोन खटल्यामध्यें स्वराज्याच्या मागणीनें राजद्रोहाचा गुन्हा होत नाहीं, किंबहुना, स्वराज्याचें ध्येय बाळगणें व त्या ध्येयाचा प्रसार करणें यामध्यें कसलीच गुन्हेगारी नाहीं, असा निर्णय मिळाल्यामुळें त्याचा उघड उच्चार करतांना वाटणारी भीति लोकांच्या मनांतून गेली. 'स्वराज्य' हा ध्येयवाचक शब्द १९२२ पर्यंत काँग्रेसच्या उद्देशांत अढळ होता. त्यावर्षीं गया येथील काँग्रेसमध्यें स्वातंत्र्याची महती अध्यक्ष चित्तरंजन दास यांनीं गाइली, पण मरणापूर्वी फरीदपूर येथें भरलेल्या प्रांतिक राजकीय अधिवेशनांत त्यांनीं स्वातंत्र्याचे दुष्परिणाम सांगून त्या शब्दाच्या मोहिनीचें बेगड खरवडून काढलें. १९२६ सालचे काँग्रेसचे अध्यक्ष श्रीनिवास अयंगार हे निर्भेळ स्वातंत्र्याच्या कल्पनेचे जोरदार पुरस्कर्ते होते. शेवटीं १९२७ सालीं मद्रासच्या काँग्रेस अधि-

वेशनांत स्वातंत्र्याच्या ध्येयाची घोषणा करण्यांत आली. मात्र ही घोषणा कागदावरच राहिली. १९२८ मध्यें पं. मोतीलाल नेहरूंच्या नेतृत्वानें हिंदी राज्यकारभाराविषयीं मनोरथ स्पष्ट करणाऱ्या आराखड्याची मांडणी वसाहतीचें स्वराज्य या ध्येयाच्या चौकटींतच केलेली होती. या मांडणीचा खर्डा 'नेहरू रिपोर्ट' या नांवानें तेव्हां प्रसिद्ध होता. १९२९ सालीं लाहोरच्या अधिवेशनांत पं. जवाहरलाल नेहरूंनीं स्वातंत्र्याच्या ध्येयाचें निशाण ता. ३१ डिसेंबरला रात्रीं १२ वाजतां फडकावलें व त्या ध्येयाच्या सिद्धीचा उपाय म्हणून म. गांधींनीं वेळोवेळीं थांबविलेला सविनय कायदेभंग देशभर १९३० मध्यें जारी केला. या ध्येयाचा 'पूर्ण स्वराज्य' हा देशी भाषेचा पर्याय पूर्वी निवेदन केलाच आहे.

## स्वातंत्र्यप्राप्ति वि० दडपशाही

१९३० ते १९४२ पर्यंत कॉंग्रेसच्या प्रस्तुत ध्येयासाठीं पुनः १९३० सारख्या प्रचंड उत्साहाच्या देशव्यापी चळवळी झाल्या नाहींत. १९३१ च्या प्रारंभीं गांधी–अर्विन समेट घडून आला. मग म. गांधी लंडनला गोलमेज-परिषदेकरितां गेले. तेथून ते हिंदुस्थानांत परत आल्यावर अवघ्या आठवड्याच्या आंत (१९३२ जानेवारी) त्यांना इतर अनेक पुढाऱ्यांसह सरकारनें अटकेंत टाकलें. अटकेंत त्यांनीं अस्पृश्यांना हिंदुसमाजांतून बाहेर न पडूं देण्यासाठीं उपोषण आरंभलें व त्याच्या जोरावर अस्पृश्यांसाठीं डॉ. आंबेडकरांशीं एक करार केला. अस्पृश्योद्धाराची चळवळ शुद्ध रहाण्याकरितां त्यांनीं पुनः एकवीस दिवसांचा उपवास केला व अस्पृश्योद्धाराच्या कार्यास वाहून घेण्याचें ठरविलें. १९३३ पासून १९३९ पर्यंतचीं वर्षे फारशीं गडबडीचीं नव्हतीं. १९३४ सालीं पुनः एकवार १९२४ प्रमाणें कायदेमंडळांत जाण्याच्या कामगिरीला कॉंग्रेसनें संमति दिली. १९३५ च्या राज्यसुधारणा अमान्य असूनहि कॉंग्रेसवाल्यांनीं निवडणुकी लढविल्या व १९३७ सालीं पुष्कळशी घासाघीस करून मंत्रिपदेंहि स्वीकारलीं.

या काळांत कॉंग्रेसच्या बाजूनें कसलीच जोराची चळवळ नसतांना सरकारी दडपशाहीचा प्रलय थांबलेला नव्हता, उलट वाढत होता. हजारों तरुण देशभक्त तुरुंगांत अक्षरशः सडत पडलेले होते; कॉंग्रेसनें व म. गांधींनीं

त्यांच्या सुटकेचा उद्योग चालविला. तो कांहींसा यशस्वी झाला. हे सारे तरुण स्वातंत्र्यवादी देशभक्त होते; परंतु त्यांचा मार्ग रक्तपाताच्या क्रांतीचा असल्यानें त्यांना ज्या नरकयातना भोगाव्या लागल्या, त्यांचें वर्णन पुराणांतील नरकयातनांच्या तपशिलांना लाजविणारें आढळेल. सदर यातनांतून स्वतः सुटावें आणि जगाचें लक्ष आपल्या दुर्दशेकडे खेचावें म्हणून देशभक्त कैद्यांनीं अन्नत्याग केला व त्यांतल्या एकानें—जतींद्रनाथदासानें—आपले प्राणहि गमावले; तेव्हां (१९२९ सप्टेंबर) साऱ्या देशांत क्षोभाची लाट उठली. सरकारलाहि त्याच्या मरणाबद्दल कायदेमंडळांत खेद व्यक्त करणें प्राप्त झालें. त्या प्रसंगाची उपेक्षा करणें सरकारलाहि शक्य नव्हतें. लोकांच्या क्षोभानें दिखाऊ किंवा खरेखुरे खेदोद्गार त्यास जाहीरपणें काढावयाला लावले. एका काळीं हिंसेच्या मार्गानें देशभक्तीची यात्रा करणाराबद्दल लोकांना कौतुकानें बोलण्याची चोरी वाटत होती; पुष्कळदां अशा देशभक्तांच्या संसर्गानें भोगाव्या लागणाऱ्या दडपशाहीच्या तापानिमित्त त्यांच्याविषयीं लोकांच्या अंतरंगांत प्रतिकूलताहि नांदत असे. तरीसुद्धां मनाच्या तळाशीं या देशभक्तांबद्दल प्रेमाचीच भावना असल्याचें दृष्टीस पडल्याशिवाय राहणारें नव्हतें. लोकांना आपल्या कृत्याचें कौतुक वाटतें, हेंच अशा देशभक्तांचें समाधान होतें व यामुळें देशांत हिंसेची कास धरणारांची संख्या बरीच वर्षें सारखी वाढत गेली. म. गांधींच्या चळवळीनें हिंसाचाराची निष्फळता लक्षांत येऊन त्याच्या भक्तांची संख्या ओसरत चालली हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे.

## हिंसापंथाचा वृत्तांत

आपल्याला जो कोणी त्रास देईल त्याचा बंदोबस्त हिंसेच्या उपायांनीं करावा, ही माणसाची वृत्ति जवळजवळ त्याच्या इतकीच प्राचीन आहे. रानटी स्थितींत आपल्या बळाचा उपयोग हाच प्रतिपक्ष्याला ताळ्यावर आणण्याचा एक उपाय माणसाला माहीत असणें स्वाभाविक आहे. तो, पांखरें, जनावरें अशा सजीव सृष्टींत याच उपायाचा प्रयोग पहात होता. निसर्गाचा व्यवहार — अर्थात् सजीव सृष्टीपुरत — रक्तानें माखलेला आहे असें एका राज्यशास्त्रज्ञाचें मत सुप्रसिद्ध आहे.

माणसानें जेव्हां आपली संघटना आरंभिली तेव्हां त्याला या निसर्गसिद्ध हिंसावृत्तीचें नियंत्रण करावें लागलें. गुन्हे, कायदे, शिक्षा वगैरे प्रपंच अशा नियंत्रणाचा द्योतक आहे. परंतु आपल्या बळाचा उपयोग हा मूलभूत पाठ माणसानें सांडलेला नाहीं. हा पाठ कसा लहानपणापासून शिकविला जातो, हें ज्याला समजावून घ्यावयाचें असेल त्यानें लहान मुलांची समजूत काढण्याच्या प्रकाराचें निरीक्षण करावें. लहान मुलाची कोणी आगळीक केल्यास त्याला बोलावून वडील माणसें आगळीकवाल्यावर डोळे वटारून, हात उगारून शिक्षा केल्याच्या आविर्भावानें तक्रारी मुलाची समजूत काढतात. कधीं प्रत्यक्ष आगळीकवाल्याच्या अंगावर आपल्या हाताचा आवाज करून जणूं काय त्यास मारलेंच, अशा भासानें मुलाचें समाधान करतात. मूल जेथें पडेल त्या जागेला काठीनें धोपटतात, त्याला दुख-विणाऱ्या निर्जीव वस्तूवर काठीचा असाच प्रयोग घडतो. ज्यानें आगळीक केली असें वाटेल त्याला ठोकावयाचें, हा धडा असल्या प्रात्यक्षिकांच्या द्वारें मुलाच्या मनांत खोल रुजून बसतो आणि तें मूल पुढें स्वतःच या प्रयोगाचा अभ्यास करूं लागतें. घरांत किंवा आवारांत शिरणाऱ्या कुत्र्या-मांजरांना, गाई-शेळ्यांना काठीनें, दगडानें मारून पळविणें, वेड्या कुत्र्याला, शेतांत शिरणाऱ्या डुकरांना, गुरांमाणसांवर धाड घालणाऱ्या वाघचित्त्यांना तसेंच सर्पादि प्राण्यांना ठार मारणें, असल्या प्रकारांनीं लहानपणीं शिकविलें जाणारें प्रतिकाराचें ज्ञान अधिक बळावतें; गांवकीच्या तंट्यांत दोन्ही पक्षांनीं सोक्षमोक्ष करून घेण्यासाठीं कुऱ्हाडी-भाल्यांचा एकमेकांवर मारा करणें व असा उघडा मामला परवडत नसल्यास प्रतिपक्षाच्या हालचालींवर पाळत ठेवून त्याला निर्जन स्थळीं एकटा गांठून मारणें; याशिवाय हरणाची, ससाची शिकार किंवा खाण्यासाठीं मासे व शेळयामेंढ्या, कोंबड्या वगैरेंचा संहार या गोष्टी हिंसावृत्तीला पुष्टि देत राहातात. ज्यानें नुकसान केलें असेल त्याचें बळानें वा युक्तीनें नुकसान साधणें, हा व्यवहार राजकारणांत गिरविला जावा, यांत अचंबा वाटण्यासारखें कांहींच नाहीं.

इंग्रजी राज्यांमध्यें अंदमान बेटांत व्हाईसरॉय लॉर्ड मेयो याचा खून एका मुसलमानानें सूड उगविण्याच्या भावनेनें केला; हें राजकीय हिंसाचारांचें पहिलें उदाहरण म्हणतां येईल. १८७९ सालीं वासुदेव

बळवंत फडके यांनीं उठावणी केली, ती याच प्रकारांत बसणारी आहे. १८९७ सालीं चाफेकरबंधूंनीं दोघां इंग्रज लष्करी अंमलदारांचा खून केला. त्यानंतर १९०९ सालीं नाशिक येथें एका इंग्रज कलेक्टराचा खून झाला; परंतु बंगालमध्यें अधिकाऱ्यांच्या हिंसेचें सत्र पुष्कळ वर्षें चालू राहिलें. १९१४ मध्यें पहिलें महायुद्ध पेटल्या वर पंजाबांत हिंसाचारी वर्ग उदयास आला. कलकत्याची 'कोमागाटामारू' या जपानी बोटीवरील शीख उतारूंची धरपकड व त्यांवर झालेला गोळीबार हा प्रसंग स्मरणांत आल्याशिवाय रहात नाहीं. संयुक्त प्रांतांतील ककोरीकटाचा खटला (१९२७), बंगालमधील चित्तगांवच्या शस्त्रागारावरील हल्ला (१९३०), हीं प्रकरणें विसरण्याजोगीं नाहींत. अधिकाऱ्याचा खून झाला कीं धरपकड, झडत्या, खुनाच्या शहरांतील कडेकोट नाकेबंदी; सक्तीचे लष्करी इलाज व यासाठीं होणाऱ्या खर्चाची लोकांकडून बलात्कारानें घेतली जाणारी भरपाई; या सरकारी धामधुमीनें लोक सतावले जात होते. लोकांना दहशत बसावी, अशा संकेतानें सरकार आपल्या सामर्थ्याचें प्रदर्शन वारंवार आणि जास्त जास्त प्रखर करीत असलें, तरी दहशतीऐवजी चीड वाढत असे. सरकारनें शेंकडों तरुण संशयावरून वर्षानुवर्षें अटकेंत ठेवले; शेंकडों कैद्यांचे हाल केले, हजारों स्त्री-पुरुष नागरिकांना दडपशाहीच्या उपमर्दाचा शारीरिक व खर्च-वसूलांचा आर्थिक भुर्दंड सोसावा लागला; घरांतील कर्ते पुरुष बंदीवासांत अडकल्यानें त्यांच्या कुटुंबांची दैना उडाली; परंतु लोकांवर भीतीचा प्रभाव कांहीं काळ दिसला तरी त्या भीतीला तरुणांतील अधिकाऱ्यांचा हिंसेनें सूड उगविण्याची प्रेरणा कधींच निर्बीज करतां आली नाहीं. लोकांना एकदां अत्यंत प्रिय असलेल्या भगतसिंगाचा दाखला येथें सहज आठवणार आहे. सायमन-कमिशनच्या निषेधाच्या मिरवणुकीवर पोलिसांनीं लाठीमार केला. लाठीमाराला लाला लजपतरायांसारख्या सन्मान्य वयोवृद्ध पुढाऱ्याची देखील मुर्वत वाटली नाहीं. एका गोऱ्या सार्जंटानें त्यांनाहि आपल्या लाठीचे तडाखे दिले. या देखाव्यानें भगतसिंगाचें माथें भणाणून तो अंमलदाराचा कांटा काढण्याच्या उद्योगांत शिरला. त्याला त्याच्यासारखेच निधड्या छातीचे साथीदार लाभले. तयारी होतांच भगतसिंगानें त्या सार्जंटला ठार केलें. पुढें भगतसिंग व त्याचे दोघे साथीदार

( त्यांत राजगुरु नांवाचा एक महाराष्ट्रीय होता ) यांचा फांसानें प्राण घेतला. त्यांना वांचविण्यासाठीं म. गांधींनीं व्हॉईसरॉयापाशीं फार खटपट केली, ती निरुपयोगी ठरली; पण म. गांधींच्या खटपटीची बेअब्रू करण्यासाठींच कीं काय, कराचीला (१९३१ मार्च) कॉंग्रेस भरण्याच्या दिवसांत पंजाब सरकारानें भगतसिंगाच्या साथीदारांसह देहान्त केला. म. गांधी व कॉंग्रेसचे पुढारी यांच्या लोकप्रियतेला लोकांच्या असंतोषाचा या कृत्यानें थोडा वेळ हिसका बसल्याशिवाय राहिला नाहीं.

साधारणपणें असें म्हणतां येईल, कीं १९३१ पासून पुढच्या काळांत राजकीय हेतूनें हिंसाकांड थंडावलें. आणि १९४२ मध्यें त्यानें अशी उसळी घेतली कीं '१९४२ च्या चळवळीनें जर पहिला बळी कोणता घेतला असेल तर अहिंसेचा,' असें म्हणतात त्याची खात्री जों जों विचार करावा तों तों जास्त जास्त पटत जाणारी आहे. १९३९ त सुरू झालेल्या दुसऱ्या महायुद्धांतील जर्मनी-जपानच्या विजयांची चढती कमान १९४२ च्या प्रारंभीं अतिशय उंचीवर चढली होती. पश्चिमेकडे जर्मनीच्या फौजा रशियन लष्कराला मागें रेटीत आशिया खंडाच्या महाद्वाराशीं येऊन भिडल्या होत्या, तर पूर्वेकडून जपानी फौजा झंझावातांच्या वेगानें फिलिपाईन, इंडोचायना, जावा, सुमात्रा, सयाम, मलाया आणि ब्रह्मदेश हे देश तुडवून हिंदी सरहद्दीशीं येऊन थडकल्या होत्या. अशा परिस्थितींत हिंदी स्वराज्य-कार्याची अढी काढून टाकण्याकरितां ब्रिटिशांनीं क्रिप्सच्या शिष्टाईमार्फत केलेला प्रयत्न वांया गेला. हिंदी वातावरण तापत चाललें व शेवटीं म. गांधींनीं 'चले जाव' असा ब्रिटिश राज्यकर्तृत्वाला निर्वाणीचा आदेश दिला. या आदेशाची परिणति १९४२ ऑगस्ट ८ च्या ठरावानें करण्यांत आली. म. गांधी नवी चळवळ करण्यापूर्वी एकदां व्हॉईसरॉयाशीं चर्चा करणार होते. चळवळीचीं कृत्यें म. गांधींकडून निश्चित ठरविलीं जाण्यापूर्वीच त्यांच्या सहकाऱ्यांनीं इतस्ततः ज्या आरोळ्या ठोकल्या, त्यावरून लोकांनीं आपल्या मनाशीं आगगाडीचे रूळ उखडणें, तारा तोडणें, सरकारी तिजोऱ्या लुटणें वगैरे कृत्यें ठरविलीं. व ता. ९ ऑगस्टला कांग्रेसचे सारे पुढारी गिरफदार केल्याचें समजतांच लोकांनीं थोडे दिवस त्या कृत्यांची धुमश्चक्री माजविली. जाळपोळ, लुटालूट वगैरे अत्याचारांनीं निरपराध स्त्री-पुरुषांच्या

प्राणांची हानि झाली. या दिवसांत एरवीं कांग्रेसवाल्यांत मोडणारीं माणसेंहि 'म. गांधींनीं आतां अहिंसेची अट सोडून दिलेली आहे; ज्याला जें वाटेल तें त्यानें करावें, कारण ज्याचा तो पुढारी, असें सांगितलें आहे' अशी चिथावणीची भाषा खुशाल पसरवीत होतीं व इतरांच्या हातून घडणाऱ्या अनन्वित कृत्यांचें बेधडक समर्थन करीत होतीं. देशांतील या दंगलीशीं सामना दडपशाहीच्या क्रूर साधनांनीं सरकारांतून झाला. दंगलीचा जोर थोड्या दिवसांत हटला, परंतु हिंसेच्या प्रेमाला आझाद हिंद फौजेचा एक नवा विषय मिळाला.

## आझाद हिंद फौजेचा बोलबाला.

१९४१ च्या डिसेंबर ७ रोजीं पूर्वेकडे जपानी राष्ट्रानें इंग्लंड-अमेरिकेशीं युद्ध पुकारलें आणि तीन चार महिन्यांच्या आंत ब्रह्मदेश पादाक्रांत करून हिंदी सरहद्दीपर्यंत मजल मारली! इंग्लंडनें शत्रूचा मार्ग रोखून धरण्यासाठीं सिंगापूर हें ठाणें क्रोडो रुपये खर्चून अतिशय मजबूत केलें होतें; पण लहानशा फुंकरीनें पत्त्यांचा बंगला कोसळावा त्यासारखा सिंगापुराचा अनुभव आला. फेब्रुवारीच्या मध्यांत सिंगापूरच्या ब्रिटिश लष्करानें लढाई सोडून शरणगति स्वीकारली. ब्रिटिश लष्करांतील हिंदी शिपाईदेखील युद्धकैदी बनले. शरण जाण्यापूर्वी जपानी लोकांनीं ब्रिटिश व हिंदी फौजा विभक्त केल्या होत्या. हिंदी फौजांना हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचें आमिष दाखवून आपल्या कामांत राबवून घेण्याचा जपान्यांचा संकल्प आधींपासूनच ठरलेला असावा. रासबिहारी नांवाचा एक बंगाली देशभक्त जपानशीं हिंदी फौजांच्या उपयोगाबद्दल या सुमारास खलबत करीत होता असें म्हणतात. हिंदी फौजांचा ताबा घेऊन आपल्या लगामी लावण्याच्या संकल्पानुसार हिंदी लष्कराचें पुढारीपण कुणाला द्यावयाचें याचीसुद्धां योजना जपानी सेनापतींनीं केली होती. ता. १७ फेब्रुवारीला हिंदी लष्कर एकत्र जमवून हंट नांवाच्या ब्रिटिश अंमलदारानें त्यांना सांगितलें कीं, आज तुम्हांला जपानच्या ताब्यांत द्यावयाचें आहे, आजवर तुम्ही जसे ब्रिटिशांचे हुकूम ऐकलेत तसे यापुढें जपान्यांचे हुकूम पाळीत जा, नाहींतर तुम्हांला शिक्षा देण्यांत येईल. जपानी सेनापतीनें यांवर भाषण केलें कीं, हिंदी शिपाई जपानचे युद्धकैदी नाहींत,

त्यांना बंधुत्वाच्या नात्यानें वागविण्यांत येईल. त्या शिपायांना हिंदुस्थान देश स्वतंत्र करण्याची संधी दिली जाणार आहे. मोहनसिंग हा त्यांचा या कामांतला पुढारी नेमला आहे. या हिंदी अंमलदाराशीं जपानी सेनापतीच्या पुढील कार्यक्रमाबद्दल अगोदरच केव्हांतरी वाटाघाटी झालेल्या असल्या पाहिजेत हें उघड दिसतें. त्या वाटाघाटी केव्हां झाल्या याचा खुलासा आझाद हिंद फौजेच्या वाङ्मयांत आढळत नाहीं.

मोहनसिंगानें उभी केलेली आझाद हिंद फौज सहा महिन्यांच्या आंत साफ बारगळली. मोहनसिंगांचें व जपान्यांचें सूत जमेना, असें पहिली फौज निकालांत निघण्याचें कारण प्रसिद्ध आहे. या दिवसांत रासबिहारी हा या फौजेची उभारणी पहात होता.

यानंतर १९४३ च्या जून-जुलैपर्यंत आ. हिं. फौजेचा विषय गुलदस्तांत राहिला. जपान्यांनीं मात्र हिंदी लोकांना हातीं धरून स्वातंत्र्यप्राप्तीच्या लालचीनें राबविण्याची आशा सोडलेली नव्हती. त्यांनीं कांहीं शिपाई, तर कांहीं साधीं माणसें आपल्या मायेंत ओढून त्यांची एक नवी फौज उभारण्याचा डाव टाकला. पूर्वीच्या आ. हिं. फौजेच्या लोकांनीं जर त्यांच्या उद्योगाकडे काना डोळा केला तर कोणता बांका प्रसंग ओढवेल, या प्रश्नानें आ. हिं. फौजेच्या पहिल्या प्रवर्तकांना भेदरून सोडलें. या काळांत हिंदी स्वातंत्र्यप्राप्तीची शपथ घेणारांचा एक संघ स्थापन झाला होता. त्यानें द्रव्य-साह्याचें काम चालविलें होतें. या उलाढालीच्या हकिकतींत रासबिहारीचें नांव सांपडतें. हिंदी समाजांत व शिपायांत उत्साह उत्पन्न करण्याला रासबिहारीचा उपयोग होत नाहीं असें वाटूनच कीं काय जर्मनींतून सुभाषचंद्र बोस यांना जपानमध्यें बोलावून आणण्याचा हेतु जपान्यांनीं धरला असावा. याप्रमाणें जुलैमध्यें बोसबाबूंचें हिंदी शिपायांना दर्शन मिळालें. सुभाषचंद्रांनीं स्वातंत्र्याकांक्षी हिंदी लष्करी अंमलदारांचीं अंतःकरणें जिंकलीं व आ. हिं. फौजेच्या नव्या जीवनाला प्रारंभ झाला. हिंदी स्वातंत्र्य संघ, त्यानें जन्मास घातलेलें हिंदुस्थान सरकार व आ. हिं. फौज या सर्वांचें प्रमुखत्व सुभाषबाबूंना देण्यांत आलें. त्यांनीं मोठ्या कळकळीच्या शब्दांनीं हिंदी लष्कराच्या पदरीं हालअपेष्टा व मरण यांखेरीज दुसरें कांहींच पडणारें नाहीं, तरीसुद्धां शिपायांनीं देशाच्या प्रेमाखातर ही स्थिति पत्करावी, असा उप-

देश वारंवार केला. हिंदी लष्कराची संख्या सक्तीच्या भरतीनें वाढवूं नये, जे कोणी भरती झाल्यावरहि बाहेर पडण्यासाठीं उत्सुक असतील, त्यांना बेलाशक जाऊं द्यावें, अशी सुभाषबाबूंची ताकीद होती. सुभाषबाबूंनीं अगर त्यांच्या दुय्यम सहकाऱ्यांनीं आ. हिं. फौजेंत दाखल होण्याकरितां जोरजुलूम केला नसला तरी युद्धकैदी या नात्यानें भोगाव्या लागणाऱ्या यातनांतून सुटण्याचें सुख आ. हिं. फौजेच्या भरतीमध्यें निःसंशय होतें व त्या सुखाच्या आशेनें पुष्कळांना आ. हिं. फौजेंत आणणें हा वृत्तांत अजिबात डोळ्यांआड करतां येण्यासारखा नाहीं.

जपानी फौजा हिंदुस्थानच्या हद्दींशीं लगटल्या तरी त्यांची अवाढव्य पिछाडी सुरक्षित नव्हती. १९४३ मध्यें पिछाडीकडे अमेरिकेचें सामर्थ्य वाढत होतें, नव्हे जपानच्या पकडींतील बेटें हिसकावून घेऊन त्यांचा टोकिओच्या रोखानें मोर्चा सुरू झाला होता. १९४२ च्या उत्तरार्धापासून जर्मनी व जपान यांना कुठल्याच रणांगणावर विजयश्री दिसेना. तिनें आतां जपान-जर्मनीकडे, त्यांच्या घोर अत्याचारांना विटूनच कीं काय जी पाठ फिरविली ती कायमचीच. १९४३ मध्यें पश्चिमेकडे आफ्रिकेंत व युरोपांत जर्मनी-इटलीची पिछेहाट सुरू झाली व तिनें मुसोलिनीला लोळवून युद्धक्षेत्रांतून बाहेर फेकलें. जर्मनीला रशियानें प्रत्येक मैदानावर असे रट्टे लगावले कीं माघार घेण्याखेरीज त्याला दुसरा मार्ग उरला नाहीं. याच वर्षी जपानलाहि पराभव भेडसावूं लागला. ह्या वर्षांतील जपानी प्रधान-मंडळांतले फेरफार आणि मुख्य प्रधान यानें वेळोवेळीं काढलेले उद्गार व युद्धस्थिति बिघडत चालली म्हणून जपानी प्रजेला दिलेले इशारे हे ध्यानांत घेतल्यास आ. हिं. फौजेच्या बाबतींत जपानी सेनाधुरंधरांनीं नमतें धोरण कां दाखविलें असेल, याचा उलगडा होण्याला हरकत नाहीं. जपानचें मनुष्यबळ तुटत होतें अशा वेळीं ब्रह्मदेशाच्या आघाडीवर आपल्या मदतीला हिंदी लष्कर आपखुषीनें मिळाल्यास तेवढ्यापुरती आपली जबाबदारी कमी होईल, अशी अपेक्षा त्यांना सुभाषबाबूंच्या अटी मान्य करावयास लावीत होती. बाबूमहाशयांच्या अटी स्वाभिमानाच्या असल्या तरी त्या जपान्यांच्या सोयीच्या होत्या. आ. हिं. फौज स्वतंत्र, आ. हिं. सरकार स्वतंत्र, त्यांच्या कारभारांत जपान्यांची बिलकूल ढवळाढवळ नसावी, फक्त जेव्हां लढाई जुंपेल तेव्हां

एकसूत्रीपणा रहाण्यासाठीं हिंदी शिपायांनीं जपान्यांच्या हुकमांत रहावें; मात्र हिंदुस्थानचा जो भाग जपान जिंकील तो त्यांनीं आ. हिं. सरकारच्या हवालीं करावा, अशा तऱ्हेच्या सुभाषबाबूंच्या अटी होत्या त्या कबूल करून आ. हिं. सरकारला जपानी राज्यकर्त्यांनीं आपल्या तंत्रांतल्या कित्येक देशांकडून मान्यता देवविली. आ. हिं. सरकारला भरीवपणा येण्यासाठीं अंदमान, निकोबार या दोन बेटांवर जपान्यांनीं कारभाराचीं कांहीं खातीं आ. हिं. सरकाराकडे सोपविलीं.

याप्रमाणें व्यवस्था झाल्यावर जमलेल्या शिपायांच्या जथ्यांना सुभाष ब्रिगेड, जवाहर ब्रिगेड, लक्ष्मी ब्रिगेड अशी उंची संज्ञा देऊन १९४४ च्या प्रारंभीं आ. हिं. फौजेची बिनी ब्रह्मदेशांत आली.

ब्रह्मदेशांत एकंदर शिपाई किती हजार आले याचा नक्की आंकडा सांपडत नाहीं. आ. हिं. फौजेतील तिघां अंमलदारांच्या प्रसिद्ध खटल्यांत जपानी साक्षीदारांनीं १०हजार शिपाई होते असें सांगितलें व तारतम्यानें पाहिल्यास तोच आंकडा योग्य वाटतो. आ. हिं. फौजेच्या वर्तीनें हा आंकडा ५० हजारांइतका बोलला गेला आहे. प्रत्यक्ष लढाईवर इतके शिपाई व त्यांच्या मागें ९० हजार लोक होते. हे सारेच लढाईंत उतरते पण हत्यारांच्या तुटवड्यामुळें त्यांना कधींच आघाडी पाहातां आली नाहीं, अशी हकिकत आ. हिं. फौजेच्या वाङ्मयांत नमूद केली आहे. आजच्या लढाईंत हत्यारावांचून शिपाई ही भाषा म्हणजे शिपाईगिरीची विलक्षण थट्टाच म्हणावी लागते. आ. हिं. फौजेची संख्या १० हजार असो वा ५० हजार असो १९४४ सालीं तिनें इंफाल-कोहीमाच्या टापूंत जपानशीं सहकार्य केलें. १९४५ च्या सुरुवातीस आसाम-मणिपूरच्या हद्दींत तिनें शौर्य गाजविलें अशी माहिती दृष्टीस पडते. परंतु हें शौर्य विझण्यापूर्वी फुलणाऱ्या दिव्याच्या ज्योतीसारखें होतें. १९४५ सालीं जपानी सैनिकांनीं केव्हांच आ. हिं. फौजेला न कळत पळ काढला होता. लढाईचें तोंड लागल्यापासूनं आ. हिं. फौजेचें संख्याबळही झिरपत होतें. कूस फावली कीं लहान लहान तुकड्यांनीं आ. हिं फौजेचे शिपाई ब्रिटिश अमेरिकन फौजेला शरण जात होते. अन्नवस्त्राचें दुर्भिक्ष, हत्यारांची कमतरता, औषधपाण्याची टंचाई, जपान्यांकडून होणारी उपमर्दकारक उपेक्षा अशा दुर्दशेंत

हिंदुस्थान जिंकण्याच्या खोट्या व खऱ्या उमेदीनें किंवा कसेतरी स्वदेशीं पोंचण्याचा संभव म्हणून हे शिपाई ब्रह्मदेशांत आलेले होते. वाटेंत कित्येक-जण औषध-शुश्रूषेच्या अभावीं रोगांनीं नाहींसे केले. कित्येकांनीं दुखणें सहन होईना तेव्हां आत्महत्या करून आपली स्वातंत्र्याची रणयात्रा संपविली. घट्ट्याकट्ट्या स्थितींत जे ब्रिटिश-अमेरिकन-लष्करासमोर आले त्यांच्यापैकीं बहुतांनीं देशभक्तीला साजेसा पराक्रम दाखविला, तर पुष्कळांनीं प्रतिपक्षापुढें निभाव लागणार नाहीं, अशी खात्री पटून शरणागतीचा आश्रय घरला. लढाईंत राम नाहीं असें दिसल्यावर या फौजेचे नेताजी सुभाषचंद्र यांनीं पुनश्च मागच्या मुलखांत आपला पाया वळविला. जपान्यांप्रमाणें आपणहि ब्रिटिश-अमेरिकन सेवेला शरण जावें, पण स्वतंत्र-पणें शरण जाण्याचें बोलणें करावें, असा नेताजींचा उद्देश असल्याचा प्रवाद आहे. परंतु त्याच्या आधींच लढाईचा सारा खेळ आटोपला व नेताजी विमानानें टोकियोकडे जात असतां त्यांच्या विमानाला अपघात होऊन त्यांची प्राणोत्क्रांति झाल्याची बातमी सर्वत्र पसरली.

### ‘नेताजीं’ची चरित्रकथा

आ. हिं. फौजेच्या कथानकांत ‘नेताजी’ या किताबानें ओळखले जाणारे बाबू सुभाषचंद्र यांच्याविषयीं विशेष आश्चर्य वाटल्याशिवाय रहात नाहीं. १९२० सालीं सिव्हिल सर्व्हिसवर लाथ मारून सुभाषबाबूंनीं दास-बाबूंच्या अनुयायित्वाची दीक्षा घेतली. परंतु दासबाबूंच्या मृत्यूनंतर त्यांनीं जें राजकारण केलें, त्याचें पक्कें धोरण सांगणें कठीण आहे. बंगालच्या हिंसाचारी क्रांतिकारकांशीं मेतकूट असल्याच्या संशयावरून सरकारनें पुनः पुनः वर्षानुवर्षांची कैद भोगावयास लावल्यामुळें लोकांमध्यें त्यांच्याविषयीं सतत प्रेम राहिलें. गांधींच्या शिकवणीशीं त्यांची विचारसरणी जमणारी नव्हती. यामुळें दासबाबूंच्या मरणानंतर त्यांनीं बाबू सेनगुप्त (एक गांधी-वादी पुढारी) यांच्याशीं चुरस चालविली. १९२९ सालीं लाहोरच्या काँग्रेस अधिवेशनांतून सुभाषबाबूंनीं बाहेर पडून ‘कांग्रेस डेमोक्रॅटिक’ पक्षाचा नवा गोट मांडला. १९३४ सालीं सुभाषबाबूंची स्वारी व्हीएन्ना येथें प्रकृतिनिमित्त रहात असतां तेथून त्यांनीं विठ्ठलभाई पटेलांच्या जोडीनें

"म. गांधींचें राजकीय नेतृत्व वांया गेलें, आतां कॉंग्रेसनें कायापालट करावा, व कॉंग्रेसला तसें करवत नसल्यास कॉंग्रेसमध्यें एक नव्या मूलग्राही धोरणाचा नवा पक्ष निर्माण करणें अवश्य आहे" अशा मतलबाचें पत्रक काढलें. म. गांधींच्या राजकीय नेतृत्वावर विश्वास नसतांहि हरिपुरा येथील कॉंग्रेसचें अध्यक्षस्थान सुभाषबाबूंनीं मंडित केलें (१९३८) व वर्षभर अध्यक्षाचीं कामें इतर अध्यक्षाप्रमाणें आपल्या मतभेदाचा कुठेहि उठाव न होऊं देतां गुण्यागोविंदानें पार पाडलीं. सुभाषबाबूंना म. गांधींच्या नेतृत्वानें पचवून टाकलें कीं काय असा संशय क्वचित् बाबूमहाशयांच्या अगदीं सरळ वागणुकीवरून उद्भवला असल्यास दुसऱ्याच वर्षीं त्यांनीं तो संशय फेडून टाकला. त्रिपुरी येथें भरणाऱ्या कॉंग्रेस-अधिवेशनाच्या अध्यक्षस्थानासाठीं त्यांनीं चढाओढ केली, तिच्यांत त्यांची सरशीहि झाली; पण पुढील कामें करणें इतरांच्या असहकारितेनें अशक्य ठरलें. अध्यक्षस्थानाचा विजय प्रत्यक्ष कर्तृत्वाच्या दृष्टीनें अपजय ठरला. तेव्हां त्यांचा 'अघाडी पंथ' (फॉरवर्ड ब्लॉक) होताच. कॉंग्रेसची चाल जनतेच्या हृदयाला चटका लावून सोडण्यासारखी दणदणीत नाहीं, यासाठीं दणकेबाज पाऊलें कशीं टाकावीं लागतात, हें दाखविण्याच्या हेतूनें सुभाषबाबूंचा पंथ अवतरला. कॉंग्रेस रेंगाळत चालणारी, आपण तडफदार चालीनें नेहमीं आघाडीवर उपस्थित रहाणारे, अशा अर्थाचा झोक त्या पंथाच्या नांवांत सहज दिसणारा आहे. या पंथांत देशांतील बरीच थोड्याफार कीर्तीचीं माणसें सामील झालीं. त्यांच्या बैठकी भरून ठराव जाहीर होऊं लागले. यापेक्षां जास्त कामगिरी काय होणार होती, हें जनतेला कळण्यापूर्वी सुभाष १९४१ सालीं बेपत्ता झाल्याची खबर देशात पसरली. त्यांच्या संबंधांत एका खटल्यानिमित्त ते कोर्टांत गैरहजर राहिल्यामुळें सरकारांतून पकडवारंट निघालें होतें. त्याची धाड घरावर आली तेव्हां सुभाषबाबू नाहींसे झाल्याची बातमी पक्की झाली. त्यांचें काय झालें, याबद्दल सर्वत्र भवती न भवती चालू असतां ते बर्लिनला पोंचल्याची नवी वार्ता जगभर पुकारली गेली. बर्लिनहून त्यांचीं भाषणें होऊं लागलीं. हिंदी जनतेच्या राजकीय जिज्ञासेला हीं भाषणें बराच काळ रिझवीत होतीं. सुभाषबाबूंच्या पुढाकारानें जर्मनांनीं आ. हिं. फौजेची एक कच्ची प्रत जर्मनीतील हिंदी युद्ध-बंद्यांना फितवून तयार केली;

होती. युरोप-आफ्रिकेंतील युद्धाच्या गुंतागुंतींमध्यें जर्मनांना आ. हिं. फौजेचा प्रयोग करण्याला अवकाश फावला नाहीं. पूर्वेकडे पश्चिमेसारखी गुंतागुंत नव्हती; तेव्हां १९४३ सालीं सुभाषबाबूंची जपानांत रवानगी करण्यांत आली. त्यांनीं तिकडे काय केलें याचा पाढा थोडक्यांत मागें सादर केला आहे.

## आझाद हिंद-फौजेचें अंतरंग

ज्या दिवसांत सुभाषबाबू पूर्वेकडील आ. हिं. फौजेचे कर्णधार बनले, त्या दिवसांत जपानचें अवसान खचत चाललें होतें; याचा बोध नसल्याप्रमाणें सुभाषबाबूंनीं देशाच्या स्वातंत्र्याची मुलूखगिरी चालू करावी, याचें कुणालाहि कोडेंच वाटेल. १९४४ च्या पहिल्या सहामाहींत इंफाल-कोहीमा भागांत जपानी फौजांनीं धाडसी शिरकाव साधला व या फौजा ब्रिटिश-अमेरिकन प्रतिकारांशीं अतिशय चिकाटीनें लढल्या. सदर मोहिमेंत हिंदी शिपाई शेंकड्यांनीं पळून जाऊं लागले होते तरी आ. हिं. फौजेच्या तुकड्यांनीं अचाट पराक्रम केल्याच्या कथा उपलब्ध आहेत व त्या खऱ्याहि असतील; पण इंफाल-कोहीमा हीं ठिकाणें सोडवितांना जपानी मगरमिठीला ब्रिटिश-अमेरिकन चढाईचा असा जबर मार सोसावा लागला, कीं पुनः जपानी लष्करानें कुठेंहि डोकें वर काढण्याचें धाडस केलें नाहीं. जपानी सेनाकर्त्यांना आपलें घर संभाळण्याच्या निराशाप्रचुर चिंतेनें पछाडलें असतां ते ब्रह्म-देशाचा व पर्यायानें हिंदुस्थानचा नाद सोडण्याला तयार व्हावे, यांत नवल नाहीं. १९४२–४३ मध्यें इंग्लंडच्या दोस्तांची शक्ति प्रतिपक्षाला मागें लोटण्याइतकी वाढत चालल्याचा अनुभव सर्वत्र येत असतां सुभाषबाबूंनीं स्वदेश जिंकून स्वतंत्र करण्याच्या आशेनें आ. हिं. फौजेचा पुढाकार घेतला, हें कांहींसें विचित्र वाटतें. तसेंच या फौजेच्या रचनेची बळकटी त्यांना नक्की अंदाजतां आली नसावी, असाहि तर्क करावा लागतो. आ. हिं. फौजेचे सगळे स्वयंसैनिक स्वातंत्र्यप्राप्तीच्या उत्साहानें ब्रह्मदेशाकडे आलेले नव्हते. ज्यांनीं लढाई केली त्यांतल्या पुष्कळांना आपण राजनिष्ठेची शपथ मोडली असल्यानें ब्रिटिशांना शरण जाऊनहि लाभ नाहीं, अशी जाणीव होती. शरण गेल्यावर राजनिष्ठेची शपथ मोडल्याचें शासन भोगावें लागलें, तरी स्वदेशीं पोंचल्याचें समाधान लाभेल, अशीहि बहुतांची भावना असणें

संभवतें. त्यांत पुन: हिंदु-मुसलमान हा प्रश्न होताच. आ. हिं. फौजेच्या खटल्यांत पुराव्याखातर दाखल केलेल्या सहगलच्या रोजनिशींत 'मुसलमानांना ब्रिटिशांविरुद्ध लढणें इस्लामद्रोहासारखें वाटतें. कारण तुर्कस्थान ब्रिटिशांच्या बाजूस आहे' अशी नोंद असून त्यायोगानें मुसलमान अधिकारी व शिपाई ब्रिटिशांकडे निघून जाण्याला उत्सुक दिसतात, अशा अर्थाचा सहगलचा अभिप्राय तेथें नमूद केलेला आढळतो. या फौजेच्या खटल्यांतील दुसरा अंमलदार शहानवाज हा आ. हिं. फौजेला अनुकूल नव्हता. त्यानें मुसलमान लोकांना आ. हिं. फौजेंत दाखल न होण्याचा उपदेश चालविला होता. शेवटीं तोच या फौजेंत दाखल झाला; पण फौजेचा गाडा शक्य त्या उपायांनीं चालू द्यावयाचा नाहीं, अशीच त्याची इच्छा राहिली. हिंदी युद्धकैद्यांना जपानी फौजेची चाकरी करण्यासाठीं पूर्वेच्या बाजूस दुसरीकडे नेतात हा प्रकार टळावा आणि हिंदुस्थानांत जपानी लष्कर घुसल्यास त्यांच्या अत्याचारांना प्रतिबंध करतां यावा असेंहि आ. हिं. फौजेंत भरती होतांना त्याच्या मनांत होतें. जपान्यांचे भयंकर दुराचार त्यानें सिंगापूरास पाहिले होते व जपान्यांविषयीं त्याला तिटकारा वाटत असे. सुभाषचंद्रांनीं पुढाकार घेतल्यावर त्याचें मन सर्वतोपरी नि:शंक झालें. जपानी फौजा हिंदुस्थानकडे जाणार आहेत व त्यांना यश मिळण्याचा संभव आहे, तेव्हां आपण हिंदी शिपाई निष्क्रिय होतो, असा आरोप आपल्या माथीं येऊं नये, असेंहि शहानवाजला वाटत होतें. शहानवाज एकटा आपल्या कामगिरीला चिकटून राहिला, पण इतर मुसलमानांनीं इंग्रजांकडे जाऊन फितुरी सुरू केली, याचीहि नोंद सहगलच्या रोजनिशींत दिसते. आ. हिं. फौजेंत सुरुवातीपासूनच फटी होत्या, याचें ज्ञान सुभाषबाबूंना हिंदी सरहद्दीवरील लढाईच्या वेळीं व त्यानंतर होऊं लागलें. पुढें त्यांनीं कच्च्या काळजाच्या लोकांना काढून टाकावें, दगाबाजी व भेकडपणा याची किळस वाटावयास लावणारें कविता, निबंध, नाटकें वगैरे वाङ्मय निर्माण करावें, अशा अर्थाचा जाहीरनामा काढला. ह्या जाहीरनाम्याप्रमाणें आ. हिं. फौजेची पुनर्घटना होऊं लागली, पण हा जाहीरनामा इतक्या विलंबानें निघाला कीं आ. हिं. फौजेंत तेव्हां कसलाच दम उरला नसल्यानें त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं.

## म. गांधींचें धोरण

आ. हिं. फौजेचें रंग, रूप, व सामर्थ्य कसेंहि असलें तरी ही फौज हिंसाचारानें देशाचें स्वातंत्र्य संपादन करण्याच्या प्रयत्नांपैकीं होती. तिला यश मिळणें अशक्य होतें याची कल्पना ज्या परिस्थितींत तिचा जन्म झाला त्या परिस्थितीच्या अवलोकनानें येण्याला अडचण नाहीं. ही फौज अपेशी ठरली; परंतु त्या फौजेच्या देशभक्तीकडे लक्ष देऊन, कॉंग्रेस ही संस्था अहिंसेच्या निष्ठेची असतांहि तिच्या पुढाऱ्यांनीं आ. हिं. फौजेविषयीं देशांत विलक्षण कौतुक उत्पन्न केलें. आ. हिं. फौजेच्या अंमलदारांवरील खटल्यांत त्यांच्या बचावाची धुरा कॉंग्रेसनें अंगावर घेतली आणि मुंबई, संयुक्तप्रांत, यांतलि कायद्याचें करूलेलें ज्ञानवृद्ध आणि वयोवृद्ध असें वक्तृत्व-शील पांडित्य दिल्लीच्या लाल किल्ल्यांत त्यांच्या बचावासाठीं एकत्र बसविलें. पं. जवाहरलाल नेहरूंनीं या बाबतींत धडाक्याची चळवळ केली. ब्रिटिश राज्य-कर्त्यांनीं सामान्य शिपायांना या चळवळीपूर्वीच सोडून देण्याचा क्रम ठेवला होता. आपल्या अधिकाराच्या दुरुपयोगानें घातपात केला, असा ज्यांच्यावर आरोप होता, त्यांच्यावर खटले भरले होते व त्यांच्याच खटल्यांत बचावाची जबाबदारी कॉंग्रेसनें आपल्याकडे घेतलेली होती. सरकार व कॉंग्रेस या उभय-पक्षाच्या कायदेपंडितांनीं आपापल्या परीनें उलटसुलट डावपेचांची शिकस्त केली. न्यायाधीशांनीं आरोपींना शिक्षा ठोठावल्या; परंतु सरसेनापतींनीं त्या शिक्षांतील देहदंडाचा भाग रद्द करून आरोपींचा बंदीवास टाळला. आरोपी सुटण्याचें श्रेय जनतेमध्यें आरोपींविषयीं उत्पन्न करण्यांत आलेल्या बेफाम प्रेमाला द्यावें लागतें. त्याची उपेक्षा अनेक कारणांस्तव अशक्य होती. आरोपी कैदखान्यांतून बाहेर पडल्यावर त्यांचा जिकडे तिकडे जयजयकार सुरू झाला. मोठाल्या शहरांतून त्यांच्या सत्काराचे समारंभ झाले. 'जय-हिंद', 'चलो दिल्ली' असे नवे वाक्प्रचार लोकांच्या व्यवहारांत आले. 'कदम कदम बढाये जा' हें आ. हिं. फौजेचें गीत घराघरांतून कांहीं काळ लहान मुलेंसुद्धां गुणगुणूं लागलीं. या आनंदाच्या वादळांत सत्य-अहिंसेच्या तत्त्वांना जागणारा असा एकच पुरुष होता व तो म्हणजे म. गांधी हा होय. शिपायांनीं शपथ मोडली हा सत्याचा द्रोह आणि लढाईचा रस्ता धरला हा अहिंसेचा द्रोह. हा प्रकार म. गांधींना जाणवत होता.

त्यांनीं कधींहि या बाबतींत अवास्तव उत्सुकता दाखविली नाहीं. १९३० सालीं पेशावरांत सविनय कायदेभंगाची चळवळ ठेचून टाकण्याठीं गढवाली हिंदू शिपायांना चळवळीच्या जमावावर बंदुकांची फैर झाडण्याचा ब्रिटिश अंमलदारांनीं हुकुम दिला असतां तो शिपायांनीं ऐकला नाहीं; तेव्हां त्या शिपायांना लष्करी कोर्टामार्फत कडक शिक्षा देण्यांत आल्या. म. गांधींना त्या शिपायांचें कृत्य अभिनंदनीय वाटलें नाहीं; उलट, निषिद्ध वाटलें व त्यांनीं १९३१ सालीं व्हॉइसरॉयाशीं केलेल्या समेटाच्या करारांत शिपायांच्या सुटकेचें कलम घातलें नाहीं म्हणून लोकांचा दोषहि पत्करला. त्यांची तीच वृत्ति आ. हिं. फौजेच्या जयजयकाराच्या वेळींहि कायम होती. अहिंसेचें तत्त्व म. गांधी व कॉंग्रेसचे इतर पुढारी यांच्यापैकीं कोणांत किती बाणलें होतें, याची छाननी या प्रसंगानें करतां येते.

## हिंसावादाचें सिंहावलोकन

म. गांधींनीं हिंसेच्या उच्चाटनाचा भगीरथ उद्योग चालविल्यापासून अधिकाऱ्यांच्या हिंसेचे कट कमी कमी होत चालले याचें एक कारण त्यांच्या शिकवणपेक्षां चळवळीमध्यें सांपडणारें आहे. जनतेची जागृति, संघटना व आपल्या उद्दिष्टाकरितां प्रचंड संख्येची चळवळ या प्रकारांची ओळख हिंसावाद्यांना व्हावी तशी नव्हती. आपापल्या पुरते कटवाले हिंसावादी जागृत झालेले होते, देशाच्या स्वातंत्र्यासंबंधीं त्यांची तळमळ निःस्वार्थ व प्रखर होती याबद्दलहि शंका बाळगतां येणार नाहीं. ब्रिटिश राज्यकर्त्यांचें अति सावध आणि जागरूक राज्ययंत्र, गुन्हेगार नात्यानें त्यांच्या तावडींत सांपडल्यावर सोसाव्या लागणाऱ्या भीषण यातना व शेवटीं काळ्या पाण्याचा नरक अथवा फांसावरील मृत्यु या सर्व गोष्टींचें ज्ञान असूनहि हिंसावाद्यांच्या हातून घडणारीं कृत्यें देशभक्तीच्या त्वराशील अतिरेकाचीं म्हणून लोकांच्या हृदयांत त्यांच्याविषयीं प्रेम उत्पन्न करीत असत, हें समजण्याला कठिण नाहीं. परंतु त्यांच्या पाठीशीं जनतेची सक्रिय जागृति नसल्यानें त्यांचीं कृत्यें विशेष परिणामकारक ठरलीं नाहींत. म. गांधींनीं जेव्हां साक्षर-निरक्षर आबालवृद्धांच्या चळवळीचा वणवा पेटविला तेव्हां साहजिकच हिंसावादाच्या अधूनमधून होणाऱ्या स्फोटांचें तेज

डोळयांत भरण्यासारखें राहिलें नाहीं. म. गांधींच्या चळवळीच्या नगाऱ्यासमोर हिंसावादाचीं कृत्यें पिपाणीसारखीं भासूं लागलीं. सरकारी संशयानें किंवा कोर्टाच्या निकालानें तुरुंगांत खितपतणाऱ्या हिंसावादी तरुणांनाहि जनतेच्या सार्वत्रिक चळवळीच्या सामर्थ्याशीं आपल्या कृत्यांची तुलना करून आपलीं मतें बदलण्याला म. गांधींनीं अशा रीतीनें सवड मिळवून दिली. हिंसाप्रिय तरुणांबद्दलची म. गांधींना सदैव आस्था वाटत असल्यानें त्यांनीं त्यांच्या सुटकेसाठीं सरकारांत आपली भीड जोरानें खर्ची घातली व त्यायोगानें शेंकडों तरुणांना बंधमोचन अथवा जीवदान लाभलें हा वृत्तांत फारसा प्राचीन नाहीं. भगतसिंगाला जीवदान मिळावें म्हणून म. गांधींनीं केलेल्या खटपटीचा उल्लेख मागें आला आहे. १९४२ च्या आंदोलनांतील अष्टी चिमूरचे आरोपी म. गांधींनीं फांसावर चढवूं दिले नाहींत, याचीहि आठवण ताजी आहे. तुरुंगांतून सुटलेल्या हिंसावाद्यांपैकीं पुष्कळजण कम्यूनिस्ट पंथांत शिरले तर पुष्कळजण म. गांधींच्या कार्याचे भागीदार बनले.

हिंसावादाचे बाहेरचे कट मागसणें व हिंसावादाचें हृदयांतून निर्मूलन होणें या दोन गोष्टी अगदीं भिन्न आहेत. म. गांधींनीं हिंसेचा उघड प्रचार व आचार थांबविला, परंतु हिंसेच्या परिणामकारकतेबद्दल लोकांना अगदीं सहजपणें वाटणारा विश्वास त्यांना लोकांच्या अंतरंगांतून हाकलतां आला नाहीं. हिंदी राष्ट्रवादाच्या वेगवेगळ्या प्रवाहाच्या धारा तपासल्यास याविषयीं निर्णय करतां येतो. हिंदी समाजाचे हिंदु मुसलमान हे दोन मुख्य विभाग आहेत. कांग्रेस ही प्रामुख्यानें राजकारणाची हिंदु संस्था तर मुसलमानांची सर्वस्वीं मुस्लिम लीग ही राजकीय संस्था. मुसलमानांत अहरार, जमियत–उल्–उलेमासारख्या दुसऱ्या संस्था होत्या व आहेत; परंतु प्रत्यक्ष राजकारणांत हिंदूंच्या हिंदुसभेइतकाच त्यांचाहि परिणाम दिसत असे. मुस्लिम लीगला अर्थात् मुसलमान समाजाला अहिंसेचें तत्त्व कधींच मान्य नव्हतें. त्या समाजाचे सालोसाल होणारे दंगे त्यांचें हिंसाप्रेम किती उत्कट आहे याविषयीं संशय राहूं देत नाहींत. म. गांधींचा अहिंसेचा प्रचार व हिंदु–मुसलमानांतील दंग्यांचा भर यांचें साहचर्य केव्हांहि ढिलावलें नाहीं. १९२१–२२ सालांतील मलबारी मोपल्यांच्या

दंग्यापासून मोजदाद करूं लागल्यास गणतीचा कंटाळा यावा इतके दंगे गेल्या पंचवीस वर्षांत झाल्याचें दाखवितां येईल. हे दंगे एकतर्फी नव्हते. मुसलमानांवर हिंदूदेखील हिंसेचा प्रयोग करण्याची दिक्कत बाळगीत नव्हते. याचा अर्थ हिंदूंमध्यें अहिंसा बाणली नव्हती असाच निघतो. हिंदुसभेचे पुरस्कर्ते अहिंसा तत्त्वाबद्दल उघड उघड अनादर प्रकट करीत असत. प्रत्यक्ष राजकारणांत त्यांचा प्रभाव दिसत नसला तरी त्यांच्या अधिवेशनाला हिंदूंच्या गर्दीची उणीव कधींच पडली नाहीं व या गर्दींतल्या कोणाहि हिंदूंनीं केव्हांहि सभापुढाऱ्यांच्या अहिंसाविषयक अनादराचा निषेध केल्याचा दाखला नाहीं. म्हणून सामान्य हिंदूच्या हृदयांत अहिंसेच्या दिशेनें योग्य परिवर्तन झालें असें म्हणतां येत नाहीं.

मुसलमान व हिंदु या दोन्हीं समाजाची प्रत्येकीं शेंकडा ९० ९५ इतकी प्रचंड संख्या अहिंसाव्रताला पारखी राहिल्यावर त्यांच्यांतील पक्ष–उपपक्षांच्या ध्येयांत अहिंसेच्या अनुष्ठानाला किती अवसर असेल, याची विशेष कसून पाहणी करण्याची गरज नाहीं. कम्यूनिस्ट पक्ष हिंसाप्रिय नसला तरी अहिंसेचा एकान्तिक भक्त नाहीं. कॉंग्रेसमधील सोशॅलिस्ट पक्षसुद्धां अहिंसाचरणावर विश्वास ठेवणारा नाहीं. याचा प्रत्यय १९४२ च्या चळवळीनें आणून दिलेला आहे. याच ओघानें कॉंग्रेसच्या चळवळींतील कांहीं हिंसेचीं कृत्यें येथें निवेदन केल्यास या विवेचनाचा हेतु अधिक स्पष्ट होईल. १९१९ मधील गुजरात, पंजाब प्रांतांतील रौलटबिलाविरोधी सत्याग्रहाचें पर्यवसान हें या संबंधाचें पहिलें उदाहरण आहे. म. गांधींनीं त्या पर्यवसानाकडे पाहूनच सत्याग्रहाला रजा दिली. यानंतर हिंदु–मुसलमान एका बाजूस व पारशीसमाज दुसऱ्या बाजूस अशा तऱ्हेचा मुंबईस ब्रिटिश युवराजांच्या आगमनप्रसंगीं दंगा झाला. १९२२ मध्यें चौरीचौरा (संयुक्तप्रांत) येथील दंग्यानें म. गांधींनीं बारडोलीच्या सत्याग्रहाचा नाद सोडला, हा अनुभव तर संस्मरणीय आहे. चौरीचौऱ्यासारखेंच महाराष्ट्राच्या कोंकणपट्टींतलें मुंबई नजीकचें चिरनेर प्रकरण आहे (१९३०). ही यादी आणखी वाढवितां येईल. मग म. गांधींच्या अहिंसेला अवकाश कुठें मिळाला, या प्रश्नाचें उत्तर हेंच कीं कॉंग्रेसच्या नेतृत्वाचे जे निश्चित स्वरूपाचे कार्यक्रम असतील त्या कार्यक्रमांत अहिंसाव्रतापासून कॉंग्रेसच्या

निष्ठेचे लोक ढळले नाहींत. मुंबईंतल्या सभा-मिरवणुकींवर पोलिसांचे हल्ले झाले; मिठागरांवरील कॉंग्रेसच्या धाडीला किंवा दारूबंदीच्या स्वयंसेवकांना पिटाळण्याकरितां पोलिसांनीं लाठीमार केला; अशा प्रसंगीं कॉंग्रेसच्या लोकांनीं अहिंसाव्रत सोडलें नाहीं, हें खरें आहे; पण कॉंग्रेसवाल्यांखेरीज इतर जनता अहिंसाव्रतानें बांधली गेलेली नव्हती; तिचे हिंसाप्रधान उपद्रव अनेक शहरांतून चालत असत. असे उपद्रव करण्याचा अभ्यास शहरोशहरीं इतका माजला, कीं १९४२ नंतर ट्रॅमगाड्या जाळणें, ट्रॅमच्या चौक्या जाळणें, मोटारी व बसेस जाळणें, रस्त्यांवरील छायेचीं झाडें तोडणें, वाहनांवर दगड फेकणें, रस्त्यांचे दिवे फोडून टाकणें, लोकांच्या टोप्या व टॉय भस्मसात् करणें, दुकानें लुटणें, चाळीचाळींतून जबरदस्तीनें लुटा-लुटीचा धाक दाखवून द्रव्य उकळणें, असल्या कृत्यांना निदान मुंबईपुरतें बोलावयाचें झाल्यास कसलाच धरबंद उरला नाहीं. अलीकडे कोणत्याहि कारणानें शहरांत अस्वस्थता पसरण्याचीच खोटी, कीं वरच्यासारख्या अत्याचारांचा धुमाकूळ कुठें ना कुठें सुरू झालाच म्हणून समजावें. हिंदी नाविक दलाच्या असंतोषानें बंडाचें स्वरूप धारण केल्यावर मुंबई शहरांत गुंडगिरीचा जो कहर उसळला तो जवळच्या भूतकाळांतील असल्यानें मुद्दाम जास्त उगाळायला नको.

म. गांधींच्या अहिंसात्मक देशकार्यावर 'कायदा व शांतता' यांच्या बचावाखातर सरकार जे उपाय योजीत असे, ते हिंसाप्रधान होते. लाठीमार, गोळीबार यांचा चळवळीच्या काळांत जिकडे तिकडे सर्रास उपयोग केला जात होता. पोलिसांचा प्राण धोक्यांत आला यामुळें गोळीबार करावा लागला, तरीसुद्धां शक्य तेवढें कमी बळ खर्चून काम भागविलें, अशा ठराविक शब्दांच्या खुलाशानें सरकारी उपायांचें समर्थन केलें जात असे, हें सर्वांच्या परिचयाचें आहे. सरकारी उपायांच्या अंमलबजावणीनें चिडून कॉंग्रेसच्या प्रेमाचे पण कांग्रेसच्या कामगिरीबाहेरचे लोक पोलिसांवर दगड-फेक करूं लागत आणि सरकारला आपल्या सामर्थ्याचें प्रदर्शन करायला निमित्त सांपडे. कॉंग्रेसच्या अहिंसात्मक कार्यपद्धतीभोंवतींचें सारें वातावरण हिंसेनें अतिशय दूषित झालेलें असल्याचें यावरून दिसून येईल.

हिंदुस्थानच्या बाहेर नजर टाकल्यास राजकारणाची हिंसा ही प्रकृतीच असावी असें वाटूं लागतें. म. गांधींनीं हिंदी राजकारणाचीं सूत्रें जेव्हां प्रत्यक्ष हातीं घेतलीं तेव्हां पहिलें महायुध्द संपून तहाच्या वाटाघाटी सुरू होत्या. त्यापूर्वी हिंदुस्थान देशाचें नशीब फ्लँडर्सच्या रणमैदानावर ब्रिटिशांच्या विजयानें उजडेल अशा भावनेनें गांधीजी गुजरातमध्यें सैन्यभरतीकरितां जिवापाड श्रम करीत होते. त्या श्रमामुळें ते शेवटीं अतिशय आजारी झाले. आजारांतून उठतांच त्यांनीं रौलट-बिलाच्या निषेधाचें काम पत्करलें; पण त्या महायुद्धाचा शेवट झालेला नव्हता. महायुद्ध १९१८ च्या नोव्हेंबरांत आटोपलें. इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका व जर्मनी यांनीं आपल्या लष्कराचे सामने थांबविले एवढाच महायुद्ध बंद पडल्याचा अर्थ होता. सगळीकडच्या हिंसापर्वाची इतिश्री घडली असें महायुद्ध थांबल्याचें तात्पर्य नव्हतें. कारण रशियांत क्रांति-प्रतिक्रांतीच्या लढाया सुरू होत्या व तुर्कस्थानानें ग्रीसबरोबर लढाई चालू केली होती. १९२४ पर्यंत युरोपांत शांतता नव्हती; नंतर वरून शांतता दिसली तरी नव्या अशांतीचा पाया इटली व जर्मन या देशांमध्यें फासिस्ट व नाझी पक्षांच्या उदयानें भरला जात होता. जर्मनींत हिटलर व इटलींत मुसोलिनी यांच्या चळवळी यादवीचा रक्तपात घडवून आणीत होत्या. १९२७ मध्यें पूर्वेकडे चीनमध्यें जपानच्या क्रूर चढाईचा उपक्रम झाला तो दुसऱ्या महायुद्धानें २० वर्षांनंतर निकालांत काढला. रशियांत कम्यूनिस्ट राज्यकर्ते, जर्मनींत हिटलर व इटलींत मुसोलिनी हे लोक आपल्यास विरोधी वाटणाऱ्या पक्षांच्या अनुनमधून कत्तली उडवीत होते. याशिवाय जर्मनींत ज्यू समाजाचा जो अनन्वित छळ करण्यांत आला, त्याला तोडच सांपडायची नाहीं. नंतर स्पेनमध्यें यादवीचें रणकंदन माजलें; ॲबिसीनिया देश इटालीनें पादाक्रांत केला. असल्या हिंसामय धामधुमीचें पर्यवसान महायुद्धांत होणार हें भाकीत १९३९ च्या सप्टेंबरांत खरें ठरलें. पुनः फ्रान्स-इंग्लंड एका बाजूस व प्रथम जर्मनी नंतर इटाली दुसऱ्या बाजूस असे तट पडून दुसऱ्या महायुद्धाच्या तोफांचा गडगडाट होऊं लागला. युरोपांतील परिस्थितीचा हा धांवता आढावा अहिंसेच्या शिकवणीला एकंदर राजकीय वातावरणाची कशी घोर प्रातिकूलता होती, याची कल्पना येण्यासाठीं दिलेला आहे. स्वदेशांत व परदेशांत हिंसेची चलती असतांना एकटे

म. गांधी मात्र अहिंसेची विद्या हिंदी जनतेला अट्टाहासानें पटवीत होते. सभोंवतीं सर्वत्र हिंसेचा घोर काळोख पसरलेला असतां म. गांधी हे एकटेच काय ते अहिंसेचा प्रकाश दाखवीत होते. परंतु हिंसेच्या काळोखांत हिंदुस्थानांतील व इतर देशांतील जनता दिवाभीतांच्या स्वभावानें आनंदोत्साहपूर्वक आपले राजकीय उद्योग साधीत असतां म. गांधींच्या अहिंसेची विचारपूस कित्येक लहानथोर व्यक्तींकडून हें कांहीं तरी अद्भुत आहे अशा आश्चर्याच्या वृत्तीनें व्हावी, यांत अस्वाभाविक तें काय आहे ? गांधीजींना आपल्या सभोंवतीं काय चाललें आहे याचें ज्ञान होतें. परंतु मानवाच्या स्वभावाच्या मुळाशीं जाऊन विचार करणाऱ्या गांधींची आज नाहीं तर उद्यां, पण केव्हांतरी सत्य-अहिंसेच्या तत्त्वांचा विजय होईल, अशी धारणा हिंसेच्या धुमधडाक्यांत टिकून राहिली, हें त्यांच्या धीरोदात्त वृत्तीचें प्रत्यंतर अतिशय विस्मयजनक आहे. आपल्या जन्मभूमींत सत्य-अहिंसेचें बीज फुलून त्याचा महान् वृक्ष झाला कीं तो साऱ्या मानवसृष्टीला सुखशांतीची छाया पुरवील असा त्यांचा जो दृढ विश्वास तो अढळ होता; एवढेंच नव्हे, तर वाढत होता.

## हिंदु महासभा

हिंदु महासभा ही संस्था लाला लजपतराय यांच्या व पं. मालवियांच्या पुढाकारानें प्रथम अस्तित्वांत आली. १९२२ ते १९२४ या वर्षांत दिल्ली, गुलबर्गा, नागपूर, लखनौ, अलाहाबाद, जबलपूर वगैरे शहरांतून हिंदु–मुसलमानांचे भयंकर दंगे झाले. त्यांतल्या त्यांत कोहटचा दंगा तर विशेषच भयंकर होता. अशा प्रत्येक दंग्यांत हिंदूंना सर्व प्रकारें फार नुकसान सोसावें लागलें. या संकटांतून हिंदूंचा बचाव करावा, त्यांची संघटना व मजबुती करावी असा उद्देश धरून वरील दोघां पुढाऱ्यांनीं हिंदु महासभेला जन्म दिला. लालाजी हे कट्टर आर्यसमाजी होते व पंडितजी सनातन हिंदु धर्माचे पुरस्कर्ते होते. कॉंग्रेस ही निर्मळ राजकारणाचा विचार करणारी संस्था असली, तरी तिचे पुढारी कॉंग्रेसच्या कार्याबाहेर आपापल्या संप्रदायाचीं कामें उत्साहानें करीत असत. आर्यसमाजाचा अवतार हिंदु समाजाचा उद्धार करून तो समाज मुसलमानांच्या आडमुठेपणाचा समाचार घेण्या-

इतका बळकट बनविण्यासाठीं झालेला होता. बाटून मुसलमान झालेल्या हिंदूंना पुनः हिंदु समाजांत घेण्याची चळवळ हिंदु महासभेच्या अनुरोधानें स्वामी श्रद्धानंदजी करीत असल्याचें सर्वांना विदित आहे. या चळवळींचें नांव ' शुद्धि व संघटन ' असें होतें. मुसलमानांच्या ' तांझिम तबलिघ ' या शब्दांचा हा तर्जुमा असल्यानें हिंदु महासभा ही मुस्लिम लीगची हिंदु पडछाया म्हटल्यास चूक होणार नाहीं. कॉंग्रेसमधील हिंदु पुढाऱ्यांची वेडी-वाकडी अगर सुधारलेली स्वधर्मनिष्ठा हिंदु समाजाच्या राजकारणांत हिंदूंच्या धार्मिक वर्चस्वाचा गंध निर्माण करीत होती व त्यामुळें पारशी, ख्रिस्ती वगैरे समाज या प्रकारानें बुजले नसले तरी मुसलमान समाज साशंक झाला होता. बंगालचा ब्राह्मसमाज, मुंबईचा प्रार्थनासमाज या संस्थांनीं हिंदूंची सुधारणा—हिंदु हें नांव टाकून—आरंभली तरी त्यांच्याकडे मुसलमानांनीं कधीं लक्ष दिलें नाहीं. रामकृष्ण—विवेकानंदांची कामगिरी हिंदूंच्या महतीची होती. कॉंग्रेसच्या जोडीनें भरणाऱ्या सामाजिक परिषदेचे अहवाल चाळल्यास त्या परिषदेंत फक्त हिंदूच भाग घेत असल्याचें दिसतें. गोरक्षणासारख्या चळवळी हिंदूंच्या हेतूबद्दल मुसलमानांच्या मनांत संशय उत्पन्न करणाऱ्या होत्या. हिंसावादी पंथांत बहुतेक सारे हिंदूच होते. त्यांची कालिकापूजा त्या हिंदुत्वाचीच साक्ष देणारी आहे. शिवाजी-गणपतीचे उत्सव महाराष्ट्रांतील समाजामध्यें हिंदुधर्माची प्रतिष्ठा फैलावीत होते. हा धर्माचा, सार्वजनिक कार्यांतला बडेजाव सर्व जातींच्या राष्ट्रीय ऐक्याला विघातक झाला नसता तर आश्चर्य ठरलें नसतें. ब्रिटिश राज्यकर्ता धर्मभेदांचा फायदा घेण्याला टपलेलाच होता. त्यांनीं मुसलमानांना सवतासुभा देऊं केल्यावर धर्मभेदांना तीव्रता चढून मुसलमानामागोमाग पंजाबांत शीख, महाराष्ट्रांत ब्राह्मणेतर व सर्वत्र अस्पृश्य या समाजांनीं आपल्या विभक्तपणाचे डाव मांडून राष्ट्रीय ऐक्याचा भक्कमपणा केवळ दिखाऊ आहे, असें वाटायला लावणारी परिस्थिति उत्पन्न केली.

मुसलमानांना राजकारणांत सवतासुभा दिला गेल्यावर कॉंग्रेस ही संस्था केवळ हिंदूंची आहे असें मानून तिनें फक्त हिंदूंची सेवा करावी अशा सूचना १९१०—११ सालांत बऱ्याच वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झाल्या होत्या. परंतु कॉंग्रेसच्या कामापुरता धर्माभिमान बाजूला ठेवून कॉंग्रेसमधील

पुढारी आपलें काम करीत राहिले, हा त्यांचा उदार विवेक इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहिला जावा असा आहे. पण एकाद्या वेळीं कॉंग्रेसच्या व्यासपीठावर हिंदु–मुस्लिम धर्मांचे प्रश्न उभे रहात. याचा एक मासला कोकोनाडा येथील कॉंग्रेसच्या अधिवेशनांत अनुभवास आला. महंमदअलींनीं अध्यक्षाच्या अधिकारांत कॉंग्रेसच्या मंगलाचरणाचें संगीत बंद करावें, असें पं. विष्णु दिगंबर पलुस्करांना फर्मावलें. पंडितजींना हा कॉंग्रेसचा उपमर्द वाटला व त्यांनीं महंमदअलींना झणझणीत उत्तर देऊन आपला संगीताचा उपक्रम शेवटास नेला. १९२१ सालीं अहमदाबादेस मोपल्यांच्या अत्याचारांचा निषेध करायला कॉंग्रेसमधील मुसलमान तयार नव्हते, हें अशा मासल्याचें दुसरें उदाहरण आहे. परंतु असलीं उदाहरणें फारशीं दिसलीं नाहींत, याचें कारण कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांची उदारता हेंच होय. असलीं उदाहरणें हिंदूंची स्वतंत्र संघटना पाहिजे असें मानणारांना उत्तेजन देणारीं होतीं. म. गांधींच्या नेतृत्वाचा कंटाळा येईपर्यंत पुष्कळजण कॉंग्रेसमध्यें राहिले, कंटाळा आला–व कंटाळा येण्याचें कारण स्वतःच्या पुढारीपणाला कॉंग्रेसमध्यें कोणी धूप दाखवीत नाहीं ही जाणीव–तेव्हां त्यांनीं हिंदुसभेच्या मांडवांत आपलीं सोवळीं-भांडीं टाकलीं. चमत्कार असा कीं, हिंदु महासभेचे मूळ विधाते जे लालाजी व पंडितजी ते दोघे मात्र या संस्थेला रामराम ठोकून १९२७ सालीं कायमचे बाहेर पडले; व त्यांच्याहून कर्तबगारीनें व म्हणूनच योग्यतेनें कमी असलेलीं माणसें हिंदु महासभेच्या आश्रयास चिकटलीं.

हिंदु महासभेचें राजकारण अगदीं साधें व सोपें होतें. मुसलमानांच्या शिरजोरीला प्रतिबंध झाला पाहिजे व तो कॉंग्रेस करीत नाहीं; उलट, कॉंग्रेस मुसलमानांना हिंदूंच्या डोक्यावर मिरे वाटायला संधी देत आहे, हिंदु समाजाचा क्षय करीत आहे ही विचारसरणी घोकून घोकून हिंदु जनतेच्या कानीं घालावयाची व तिच्या पुण्यार्थ म. गांधींना शिव्या द्यावयाच्या. मुस्लिम लीगचे पुढारी जी गर्जना करतील तिचा प्रतिध्वनि काढायचा. ‘हिंदूंनीं पानिपतचा संग्राम विसरूं नये; तेव्हां त्यांची कशी कत्तल उडाली हें ध्यानांत ठेवावें’ असे मुस्लिम पुढारी बोलले, कीं ‘मुसलमानांना उदगीरच्या लढाईचा धडा शिकवूं’ असा हिंदु पुढाऱ्यांनीं उच्चार करावा. याहून हिंदु महासभेनें प्रत्यक्ष

निराळी क्रिया कधींच निदर्शनास आणली नाहीं. कॉंग्रेसची व गांधींची मनमुराद बदनामी, मुसलमानांची त्या मानानें सौम्य नालस्ती, अंतिम राजकीय ध्येयासंबंधीं उदासीनता, अशी हिंदु महासभेची सामान्य नीति होती. या संस्थेला कांहीं वर्षांनीं चांगल्या नांवाजलेल्या व्यक्ती पुढारी या नात्यानें मिळेनाशा झाल्या तेव्हां मुस्लिम लीगचा जसा कित्येक वर्षें एकच एकच पुरुष अध्यक्ष राहिला तसाच एक पुरुष सालोसाल हिंदु महासभेचा अध्यक्ष होत गेला. हिंदु महासभेजवळ साक्षात् कृतीचें राजकारण नव्हतें. एकदांच हैद्राबाद संस्थानांत सत्याग्रहाचा हिय्या तिनें करून पाहिला. त्या सत्याग्रहांत जोर काय तो एक उत्तर भारतीय आर्य समाजी मंडळींचा होता. नांव घेण्यासारखे पुढारी त्यांत कोणीच नव्हते. महाराष्ट्रांतून दुय्यम दर्जाचीं कांहीं माणसें तिकडे गेलीं. त्यांचे तुरुंगांत हाल झाल्याचीं वर्तमानें झळकलीं, पण पहिल्यापासून या सत्याग्रहाचें अवसान बेताचें असल्यामुळें तो लवकरच संपुष्टांत आला. या संस्थेचीं माणसें कायदे मंडळांत मोठ्या संख्येनें कधींच जाऊं शकलीं नाहींत. यामुळें कॉंग्रेसनें दुसऱ्या महायुद्धाच्या दिवसांत प्रांतिक राज्यकारभार सोडल्यावर आपण कांहीं करावें, असें हिंदु-महासभेला वाटूं लागलें. सिंधमध्यें सभेच्या लोकांना मुस्लिम लीगविरुद्ध वागण्याची नामी संधि एकदां लाभली असतां त्यांनीं मुळींच हातपाय हालविले नाहींत. सिंधच्या कायदेमंडळांत पाकिस्तानसंबंधीं ठराव मुसलमानांनीं पास केला तेव्हां जिव्हां गोठून गेल्याप्रमाणें सभेचे गण स्वस्थ बसले होते. एरवीं लीगशीं आपला उभा दावा असल्याचें सभा भासवीत असली तरी महायुद्धाच्या काळांत सभेनें लीगशीं समेट करून राज्यकार-भारांत शिरकाव करून घेण्याची इच्छा धरली होती व इतस्ततः किंचित् साधली देखील होती. यावरून हिंदूंच्या कल्याणाऐवजीं कॉंग्रेसचा घात हें सभेचें धोरण उघड झाल्याशिवाय राहात नाहीं. १९४० सालीं व्हाइसरॉय-साहेबांनीं इतर अनेक संस्थांबरोबर सभेच्या अध्यक्षाला पाचारण केलें तेव्हां मात्र 'एकदांचें गंगेत घोडें न्हालें' अशा भावनेच्या समाधानाचे सुस्कारे सोडण्याला व 'जितं जितं'च्या धन्यतेनें छाती ठोकायला सभावाल्यांना मोका मिळाला. व्हाइसरॉयबरोबर सभेच्या अध्यक्षाचें ठरल्यावेळीं बोलणें झालें व सभेचा अध्यक्ष स्वस्थानीं रिकामे हात हालवीत परतला! पुढें ज्या

घंडामोडी महायुद्ध संपल्यावर झाल्या त्यांत सभेचें कुणीं नांवहि काढलें नाहीं. कर्तृत्व नाहीं, ध्येय नाहीं, तत्त्वज्ञान नाहीं, झटकन् चित्त वेधून घेईल, विश्वास निर्माण करील, असा पुढारी नाहीं, अशा संस्थेची लोकांत व सरकारांत अवहेलना व्हावी हें क्रमप्राप्तच आहे.

## शिखांचीं दलें

१९११ सालच्या शिरगणतीनें शिखांना हिंदु समाजांतून फोडलें. शीख ही हिंदूपैकीं पोटजात असतां मुसलमानांना विभक्त केल्यावर पंजाबांत त्यांच्या कारभारांत खीळ घातली जावी या इराद्यानें शिखांना अल्पसंख्य जमातींत लोटून विभक्तपणाच्या हक्काचे वारसदार करण्यांत आलें. हिंदू, शीख व मुसलमान असा तिरंगी खेळ पंजाबांत ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं उत्पन्न केला. १९२० नंतर शिखांत अकाली दल नांवाची शाखा फुटली व तिनें आपल्या गुरुद्वारांतील भ्रष्टाकार नाहीसा करण्यासाठीं चंग बांधला. गुरुद्वारांचे महंत बावन्नकशी शीख नव्हते. त्यांचें वर्तनहि इतर महंतांप्रमाणेंच होतें. म्हणजे तारुण्य, संपत्ति, निरंकुशता इत्यादिकांच्या प्रभावाला सहज बळी पडणारे हे महंत होते. अकाली शिखांनीं त्यांना उखडून लावण्याचा उद्योग आरंभला. दोन तीन वर्षें अकालींची चळवळ सुरू होती. शिखांनीं या चळवळींत अहिंसाव्रताच्या सहनशीलतेची पराकाष्ठा दाखविली. अखेरीस त्यांच्या मनाजोगा निर्णय झाला. गुरुद्वारा–शिरोमाणि–प्रबंधक–मंडळ हें त्या निर्णयाचें फळ आहे. गुरुद्वारांच्या शुद्धींत हिंदूंचें नुकसान झालें, पण अकाली शिखांच्या प्रेमानें आंधळ्या झालेल्या हिंदूंना तें दिसलें नाहीं. गुरुद्वाराच्या आसपास हिंदू-देवदेवतांचीं मंदिरें होतीं. महंतांबरोबर अकाली शिखांनीं त्यांचीहि सफाई करून टाकली! हिंदूंनीं या प्रकाराची दाद घेतली नाहीं!!

शीख विभक्त केला जातांच त्याला आपल्यासाठीं हक्क पाहिजेत असा तोहि मुसलमानांच्या अनुकरणानें हट्ट धरूं लागला. हक्काचें भांडण हा विभक्तपणाचा स्वभावच आहे. मुसलमानांचा एकजिनसी कारभार नसावा या हेतूप्रमाणें ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं त्यांना मंत्रिमंडळांत जागा दिली. मुसलमान हे एकदां हिंदुस्थानांत राज्यकर्ते होते या बहाण्यानें जसे त्यांचे ब्रिटिशांनीं

लाड पुरविले तसे शिखांचेहि पुरविले. ब्रिटिशांना हिंदी समाजाच्या जेवढ्या फळ्या पडतील तेवढ्या हव्याच होत्या. शीख एकदां पंजाबांत राज्य करीत होते. तसेच ते गेलीं शंभर वर्षे हिंदी फौजेंत मोठ्या संख्येनें जाऊन इंग्रजांना-हि मदत करीत होते. ब्रिटिशांना त्यांच्याबद्दल यासाठीं आपुलकी वाटत होती. त्यांचें मन राजी राखण्याचा उपाय म्हणून त्यांचे चोचले प्रथम पंजाबांत व नंतर हिंदुस्थान-सरकारांत पुरविले गेले. लगाम आपल्या हातीं राखणारा ब्रिटिश राज्यकारभाराच्या रथाला नवे नवे घोडे किती जुंपायचे याची पर्वा कशाला करील! शिखांच्या समाधानासाठीं त्यानें त्याच्यापैकीं एक नवा घोडा जोडला. शीख हा नोकरीनें ब्रिटिशांना जवळचा वाटला तरी धर्मानें तो हिंदू समाजाला जवळचा आहे, त्यामुळें कॉंग्रेसच्या राजकीय ध्येयाशीं तो कधीं विशेष फटकून वागला नाहीं. मात्र एकंदर चळवळीच्या परिणामांत 'माझी वाट काय' या प्रश्नाची टोंचणी त्याला कॉंग्रेसच्या राजकारणाशीं कधींच पूर्णपणें समरस होऊं देत नव्हती. शिवाय त्याच्या राजकीय गतीला खुंटविणारी फाटाफूटहि ह्या समाजांत आहे. शीख हा पंजाबांतील रहिवासी; पंजाब मुसलमानांच्या पाकिस्तानाचा बालेकिल्ला; पंजाबांतील मुसलमानांच्या हालचालींवर नजर ठेवूनच शिखांच्या संस्था त्या त्या प्रसंगापुरत्या आपलें धोरण आंखीत असत. त्यांना अखिल भारतीय दृष्टि कधींच लाभली नाहीं. शिखांनला कोणीहि पुढारी कॉंग्रेसच्या अध्यक्षस्थानीं विराजमान होण्याचा योग आला नाहीं, याचा उलगडा शिखांचा पंजाबपुरत्या स्वहितपर दृष्टीचा विचार केल्यास होणारा आहे. आपल्या हक्कांची वांटणी जो कबूल करील त्याच्या राजकारणाला शिखांचा विरोध नसतो हें ओळखून मु. लीगच्या पुढाऱ्यांनीं शिखांची आंजारणी-गोंजारणी केव्हां केव्हां करून पाहिली, पण शिखांचें अंतःकरण वश करण्याइतकें विश्वासाचें वर्तन मुस्लिम लीगनें केव्हांहि केलें नसल्यानें लीगच्या गोड भाषेनें शीख भुलले नाहींत व नेहमींच कॉंग्रेसच्या मागें राहिले.

## अस्पृश्यांचें संघटन व आंदोलन

हिंदू समाजांत राष्ट्रीयत्वाचें वारें खेळूं लागतांच त्याला अटकाव होण्यासाठीं ब्रिटिशांनीं मुस्लिम समाजाला आपल्या कच्छपीं लावलें.

१९१६सालीं कॉंग्रेस व मुस्लीम लीग यांचा समेट झाल्याचें दिसतांच मॉंटेग्यू व चेम्सफर्ड या दोघां ब्रिटिश मुत्सद्द्यांमध्यें हिंदूंतल्या अस्पृश्यांचा प्रेमा उचंबळला व त्यांनीं अस्पृश्यांना राजकीय सुधारणांच्या विचारांत स्थान देणें अवश्य आहे, असा नवा दावा आपल्या सुधारणेच्या अहवालांत दाखल केला व तेव्हांपासून अस्पृश्य किंवा सरकारी भाषेंतील शेडयूल्ड कास्ट हा एक नवा संप्रदाय हिंदी राजकारणांत दृष्टीस पडूं लागला. १९२० च्या मॉंटेग्यू-चेम्स्फर्ड राज्यसुधारणांची ही देणगी आहे व असा उपकार करतांना आपल्या आश्रयाखालीं हिंदूंनील संख्येनें मुसलमानांच्या जवळजवळ बरोबरीची असलेली जात ओढून हिंदी राजकारणांत एक नवी धोंड उभी करण्याचा राजकर्त्यांचा हेतु असला पाहिजे, असें त्यांच्या पूर्व-परंपरेकडे पहातां स्पष्ट कळणारें आहे. म. गांधी हे अस्पृश्यतानिवारणाचे कट्टे पुरस्कर्ते, त्यांच्या उद्योगानें अस्पृश्यतेचा नाश झाल्यास हिंदू स्वराज्य-वादाचें संख्याबल अखंड राहील, तेव्हां त्या बळांत खिंडार पाडण्याशिवाय गत्यंतर नाहीं, असा निश्चय झाल्यामुळें हरउपायानें आपल्या राज्याचीं पाळेंमुळें सदैव खोल व घट्ट रुजलेलीं रहावीं यासाठीं धडपडणाऱ्या धूर्त ब्रिटिश राजकर्त्यांना १९२० मध्यें अस्पृश्यांच्या हिताच्या कळकळीनें झपाटावें हें त्यांच्या राज्यनीतीला शोभणारें होतें. या सुमारास महार जातीचा एक बुद्धिमान विद्याव्यासंगी पुरुष परदेशच्या श्रेष्ठ पदव्या संपादून स्वदेशीं महाराष्ट्रांत परत आला होता व मुंबई शहरांत आपल्या योग्यतेनें उदयाला येत होता. त्याला पुढारीपणाची महत्त्वाकांक्षा असल्यामुळें त्याच्या गळ्यांत शेडयूल्ड कास्टच्या नेतृत्वाची माळ पडावी हें सरळच झालें.

डॉ. भीमराव आंबेडकर हे या वर्गाचे अद्वितीय पुढारी होत. हिंदु समाजानें आपल्या कोट्यवधि बांधवांची अस्पृश्य या नात्यानें शतकानुशतकें चालविलेली दैना हा हिंदु धर्माचा कलंक आहे, तो खरडून, धुऊन साफ केला पाहिजे, म्हणून अतिशय निकराचा सत्याग्रह म. गांधींनीं सुरू ठेवला असतां म. गांधीजींची मनसोक्त निंदा करणें हें आंबेडकरांच्या दिनचर्येचें एक प्रमुख अंग होऊन बसलें होतें. तथापि, म. गांधींनीं आंबेडकरांकडून होणारी निंदा कधीं मनावर घेतली नाहीं. हिंदु धर्मानें हजारों वर्षें केलेल्या

छळाचा हा प्रातवाद आहे व त्या छळाकडे पहातां तो अगदीं क्षम्य आहे, असें म. गांधींनीं त्या निंदेवर पांघरूण घातल्याचेंहि दिसून येईल. गांधीजींच्या औदार्याला आंबेडकरांकडून कालपरवांपर्यंत शिव्याशापांचा मोबदला मिळत होता. गांधीजींसंबंधांत आंबेडकरांची जशी अविश्वासाची भावना होती, तशी ब्रिटिशांबद्दलहि होती. इंग्रजी राज्यानें आपला मुळींच उद्धार केला नाहीं, असें त्यांनीं १९३० सालीं स्वजनांना बजावून स्वराज्याशिवाय आपल्याला बरे दिवस दिसण्याची आशा नाहीं, अशी स्वराज्यप्राप्तीची महतीदेखील गाइली आहे. मात्र स्वराज्यप्राप्तीच्या चळवळीला हातभार लावण्याची बुद्धि आंबेडकरांनीं दाखविली नाहीं. हिंदु समाजाला धर्मांतराच्या धमकीनें भेवडावून स्वजनोद्धाराचा लभ्यांश पदरांत पडल्यास पहावा, असाहि प्रयत्न त्यांनीं एकदां करून पाहिला. हिंदूंतला महार या नात्यानें त्यांना जें महत्त्व ब्रिटिश राज्यांतील भेदनीतिनें दिलें होतें तें महत्त्व धर्मांतरानें ते कोणत्याहि समाजांत गेले असते तरी गमावलें असतें. नव्यानें बाटून दाखल झालेला विद्वान् बॅरिस्टर मुसलमानांत किंवा शिखांत असें कोणतें पुण्याईचें वजन वाढविणार होता? पण खरें भय जर किंचित् हिंदु समाजांत डोकावून गेलें असेल, तर आंबेडकरांबरोबर त्यांची सारी जात धर्मांतर करील कीं काय, अशा शंकेचें होतें. आंबेडकरांची धर्मांतराची घोषणा ऐकून कांहीं शीख, मुसलमान व हिंदुसभावाले त्यांच्या अंतरंगाचा ठाव काढण्यासाठीं येरझारा करूं लागले. या धर्मांतराच्या घोषणेंत नव्या धर्माची दीक्षा घेणारांना त्या धर्माच्या लोकांनीं व सरकारनें निराळे हक्क द्यावेत असा एक सूर होता व महाराष्ट्रांत शीख जमात हजारोंच्या संख्येनें निर्माण करतां आल्यास तसे हक्क मिळतील अशी उमेदहि होती. आंबेडकरांनीं घोषणेनंतर विलायतेस प्रयाण केलें; परंतु गोलमेज-परिषदेमार्फत निरनिराळ्या जातिधर्मांच्या हक्कांची जी तरतूद केली आहे तिच्यांत रतिभरसुद्धां फेरफार होणार नाहीं, असें सरकारनें जाहीर करून निराळ्या हक्कांच्या उमेदीवर पाणी ओतलें व हें धर्मांतराचें चहांतील वादळ लवकरच शांत झालें. धर्मांतराच्या धामधुमीचें स्मारक मुंबईचें खालसा कॉलेज आहे. पण डॉ. आंबेडकरांचे श्रद्धेय गौतम बुद्ध असून त्यांच्या नांवाचें सिद्धार्थ कॉलेज आंबेडकरांच्या मनोरचनेवर निराळ्या तऱ्हेचा उजेड टाकणारें आहे.

१९३२ सालीं जातवारीच्या हक्कांचा निवाडा प्रसिद्ध झाल्यावर अस्पृश्यांना हिंदु समाजांतून फुटूं न देण्यासाठीं म. गांधींनीं उपोषण आरंभलें, त्यावेळीं डॉ.आंबेडकरांनीं पडतें घेऊन जो करार केला, त्यानिमित्त, म. गांधींचे प्राण वांचले म्हणून, आंबेडकरांना दुवा दिला जात असतो. आंबेडकर जर हट्टासच पेटते तर म. गांधींचे प्राण धोक्यांत सांपडण्याचा संभव होता. परंतु आंबेडकरांनीं अस्पृश्य लोकसंख्येच्या मानानें पुष्कळ जास्त व सरकारी निवाडयाच्या जवळ जवळ दुप्पट इतके अस्पृश्य उमेदवार निवडले जातील असा त्या कराराचा फायदा पाहून त्या कराराला मान्यता दिली. त्यांच्या अशा स्वार्थचतुर समंजसपणाबद्दल त्यांना धन्यवाद मिळाला. पुण्यास करार झाला, तथापि मनांतली अढी कायम असल्याप्रमाणें त्यांचें राजकारण सुरूं होतें. १९३९ सालीं मुस्लिम लीगनें कॉंग्रेसचीं प्रांतिक सरकारें गेलीं म्हणून जो मुक्ततादिनाचा सोहळा साजरा केला, त्याची डॉ. आंबेडकरांनीं शोभा वाढविली. मुस्लिम लीगशीं त्यांची एकदां सलगी होती व मुस्लिम लीगला जोंवर मुसलमान हें एक स्वतंत्र राष्ट्र आहे, अशा कल्पनेची बाधा झालेली नव्हती तोंवर आपल्या सांवलींत सगळ्या अल्प संख्याकांनीं येऊन रहावें, त्यांचे आपले हितसंबंध सारखे असल्यामुळें सर्व अल्पसंख्य जातींची जूट झाल्यास उत्तम, अशा धोरणाची कावेबाज भाषा मुस्लिम लीगचे पुढारी मिठ्ठासपणानें कांहीं दिवस वापरीत होते. परंतु ही परस्परप्रीति ‘गांठ पडली ठका ठका’ अशा थाटाची असल्यानें तिचा राजकारणांत मुळींच उपयोग झाला नाहीं. डॉ. आंबेडकरांनीं लीगच्या डावपेचांचा अभ्यास करून मुसलमानांप्रमाणें दांडगाई केल्यासच हिंदु नरमतो व आपलें मागणें पदरांत टाकतो असा सिद्धांत ठरविला व त्याचा कित्येकदां उच्चारहि केला. त्यांच्या स्वयंसेवक दलानें हा सिद्धान्त कृतींत आणल्याचे दाखले आहेत. त्यांना सरकारी मान्यतेचा टिक्का १९४० सालीं हिंदु महासभेबरोबरच लागला. आपण राजकीय दृष्ट्या वयांत आलों, असें त्यांनाहि तेव्हां समाधान झालें असेल! १९४२ मध्यें त्यांनीं पुनः एकवार मुसलमानांसारख्या विभक्तपणाच्या वृत्तीनें आपला दर्जा मुसलमानांच्या बरोबरीचा समजण्यांत यावा असें

सरकारांत बोलणें लावलें होतें. महायुद्धाच्या काळांत मजूरखात्याचें मंत्रिपद त्यांना भोगायला सांपडलें.

हिंदी राजकारणांतला अस्पृश्यांची चळवळ हा एक लहानसा ओघ असला तरी ब्रिटिशांच्या भेदनीतीनें व म. गांधींच्या हिंदुत्वप्रेमानें त्याला महत्त्व आलें. म. गांधी हे अस्पृश्यांना हिंदुसमाजपुरुषाचा एक अवयव मानीत असले, तरी डॉ. आंबेडकर आपण व आपला समाज हिंदु नाहीं, असेंच ठांसून सांगत असतात. आपण हिंदु नाहीं तर कोण याचा त्यांच्या संशोधकी विद्वत्तेला अजून पत्ता लागलेला नाहीं. तथापि, हिंदूंच्या जागा पदरांत पडतांना त्यांनीं पुणें-कराराच्या वेळीं बिलकूल दिक्कत बाळगली नाहीं. आपल्या लोकसंख्येला न शोभण्याइतक्या अधिक प्रमाणांत त्या जागा आहेत हा विचार त्यांच्या न्यायबुद्धीला मुळींच शिवला नाहीं. अस्पृश्यांना दिलेल्या हक्कांचा विषाद हिंदूंना वाटूं नये हें स्वाभाविक आहे. विषाद असला तर आपण अहिंदु या समजुतीनें अस्पृश्यांना अधुन-मधून हिंदूंना उपद्रव द्यावासा वाटतो, या परिस्थितीचा आहे. परंतु म. गांधी सांगतात त्याप्रमाणें हिंदुसमाजानें या प्रकारांना आपल्या प्राचीन कर्मांचें प्रायश्चित्त मानावें. म. गांधींनीं स्वयंप्रेरणेनें अस्पृश्यतानिवारणाचें कार्य हातीं घेऊन व ब्रिटिशांनीं भेदनीतीच्या संधानांत अस्पृश्यांना हातीं धरून हिंदु समाजावर उपकारच केले आहेत. या उपकारांत ब्रिटिशांनीं परस्पर वैमनस्याचें जें व्यंग उत्पन्न केलें, त्याचे परिणाम आणखी कांहीं काळ भोगावे लागतील.

## मुस्लिम लीगचा पाकिस्तानवाद

इंग्रज राज्यकर्त्यांना हिंदुस्थानांतील धर्मभेदाच्या जोरावर आपलें राज्य 'यावच्चंद्रदिवाकरौ' जिवंत ठेवण्याची मनीषा असल्यानें पेशवाईचा स्वाहा·कार घडतांच त्यांनीं 'फोडा व झोडा' या तत्त्वाच्या अंमलबजावणीला सुरवात केली. १९व्या शतकाच्या शेवटीं शेवटीं त्यांनीं मुसलमानांना प्रेमांत घेऊन आपलें 'फोडा व झोडा' हें धोरण अगदीं सरळ स्पष्ट स्वरूपांत आणलें. १९०६ मध्यें मुस्लिम लीगची स्थापना केली. १९१३ पर्यंत लीगला राजकीय ध्येय नव्हतें. त्यावर्षींच्या अधिवेशनांत तिनेंहि

वसाहतीच्या स्वराज्याचें ध्येय स्वीकारलें. लीग व काँग्रेस याच्यात द्वैत राहूं नये असा पुढील वर्षांत प्रयत्न झाला. काँग्रेस लीगचीं अधिवेशनें एकाच शहरीं व एकाच वेळीं भरूं लागलीं. परंतु ब्रिटिश नोकरशाहीला या समाजांचें राजकीय दृष्टया ऐक्य व्हावयास नको असल्यानें १९१५ सालीं मुंबई शहरीं लीगच्या बैठकींत पोलिसांदेखत गुंड घुसले व त्यांनीं बैठक उधळून लावण्याचा खेळ केला! तरी ऐक्याची भावना ओसरली नाहीं व १९१६ सालीं लखनौस काँग्रेस-लीगची गट्टी जमली. त्यानंतरचा लीगचा इतिहास १९२७ पर्यंत नजरेंत भरण्याजोगा नाहीं. त्यावर्षी सायमन-कमिशनवर बहिष्कार घालावा कीं न घालावा यावरून लीगचे तुकडे पडले. त्याच वर्षी मुसलमानांतील भेदभाव मिटवून काँग्रेसबरोबर पुनः समेट करावा, या हेतूनें लखनौस दुहेरी परिषदा भरल्या. १९२८ च्या नेहरू-रिपोर्टावर अनेक वजनदार मुसलमान पुढाऱ्यांनीं सह्या केल्या. एकटे बॅ. जीना मात्र त्या रिपोर्टानिमित्त जळफळत राहिले. तरीसुद्धा हें लक्षांत ठेवणें अवश्य आहे, कीं जीनामीयांचें माथें ठिकाणावर होतें. त्यांचा १९३७ नंतर जसा ताळ सुटला तसा तेव्हां सुटलेला नव्हता. त्यांच्या हटवादांतहि समंजसपणाचा अंश त्या काळांत दृष्टीस पडत होता. १९३७ पासून ते हिंदू समाजाबद्दल निर्भेळ द्वेषाची भाषा बोलूं लागले. 'नात्झींनीं ज्यूंची जी अवस्था जर्मनींत केली, ती अवस्था मुसलमान लोक हिंदूंना भोगायला लावतील' अशी उघड धमकी देण्यापर्यंत त्यांच्या हिंदुद्वेषाची मजल १९३७ च्या पुढील काळांत गेली. मुसलमान हिंदूंबद्दल कांहींहि बोलले तरी त्यांना ते सारे माफ, या वृत्तीचें सरकारी वर्तन असल्यामुळें त्यांच्या दुष्ट प्रलापांना कसलीच अटक नव्हती. हिंदु-मुसलमानांच्या दंग्यांत मुसलमानांना वाटेल तें करूं द्यावयाचें, व हिंदूंना मात्र दडपायचें हाच अनुभव लीगवाल्या पुढाऱ्यांच्या द्वेषाच्या विषारी वक्तृत्वासंबंधांत येत होता. हिंदूंचा द्वेष लीगच्या अंतरंगांत आपल्या बडेजावाचें समर्थन होण्यासाठीं नव्या नव्या कल्पना सुचवीत होता. पाकिस्तान ही अशीच कल्पना असून १९३० नंतर ती लीगच्या कारभारामध्यें धूळ खात पडली असतांही तिचा उर्जित काळ आला. मुसलमान हें एक स्वतंत्र राष्ट्र आहे, हिंदुस्थान हें एक अखंड राष्ट्र कधींच नव्हतें, मुसलमानांच्या उदयापासून येथें शेंकडो वर्षें हिंदु व मुसलमान अशीं दोन राष्ट्रें

अस्तित्वांत आहेत; मध्यंतरीं इंग्रजी राज्यकारभारानें घोटाळा केला, नाहीं तर हा दोन राष्ट्रांचा देश असेंच सर्वांच्या प्रत्ययाला आलें असतें, वगैरे लटपटींचें विवेचन करून पाकिस्तानाच्या कल्पनेला बॅ. जीनांनीं सडकून उजाळा दिला. जिनांच्या द्विराष्ट्रवादाला हिंदु महासभेकडून दुजोरा मिळाल्याचें प्रसिद्धच आहे. कॉंग्रेसला हा द्विराष्ट्रवाद कबूल नव्हता. ब्रिटिश राज्यकर्त्यांनाहि तो पटला नाहीं. पण जीनांनीं त्याचा घोष सतत चालू ठेवला. १९४२ मध्यें कॉंग्रेसनें ब्रिटिशांना 'चले जाव' म्हणून ठोठावतांच जीनांनीं 'चले जाव, पण हिंदुस्थानाचे तुकडे करून' असा अनुवाद केला. १९४० सालीं लीगनें पाकिस्तानाच्या प्राप्तीचा ठराव केला व दरसाल त्याची घोकंपट्टी चालविली. पाकिस्तान उत्पन्न झालेंच पाहिजे, अशी जीनांची जों जों अधिकाधिक वर्षें लोटत गेलीं तों तों खात्री वाटत चालली.

बॅ. जीनांचा हिंदु-द्वेष हें एक इतिहासाचें गूढ आहे. जीना हे एकदां हिंदूप्रमाणेंच राष्ट्रीय वृत्तीचे होते. 'मी प्रथम हिंदी म्हणून स्वतःला ओळखतों व मागाहून मी मुसलमान असल्याचें माझ्या ध्यानांत येतें.' असे त्यांच्या तोंडचे उद्‌गार त्यांच्या भाषणांतून आहेत. पहिल्या युद्धाच्या काळांत टिळकांबरोबर युद्ध-परिषदेंतून उठून जाणारे, १९१८ सालीं विलिंग्डन-स्मारकाला विरोध करणारे जीना पुढें १०।१५ वर्षांनीं हिंदु-समाजाचे कट्टे शत्रु बनतील असें जर कोणी तेव्हां भाकीत केलें असतें, तर लोक त्याला वेडाच समजले असते. हिंदु-मुस्लिम-ऐक्याच्या आशावादाचें एकमेव स्थान मानले जाणारे जीना पुढें हिंदुस्थानच्या चिरफाडीचे पुरस्कर्ते झाले. खिलाफतीच्या चळवळींत ते मुळींच चमकले नाहींत. खिलाफतीच्या बचावाची विलायतेस ब्रिटिश सरकारकडे शिष्टाई करण्यासाठीं गेलेल्या मुसलमान पुढाऱ्यांबरोबर जीना असूनहि हिंदुस्थानांतल्या चळवळींत त्यांनीं कसलाच भाग घेतला नाहीं. जीना हे फेरोजशहा मेथांच्या तालमींत कांहीं वर्षें होते. कॉंग्रेसच्या चळवळीचें लोण ब्रिटिश जनतेमध्यें पोंचविण्याच्या कामगिरीवर त्यांची एकदां नेमणूक झाली होती. पण लीगच्या अद्वितीय पुढारीपणाच्या आसनावर चढतांक्षणीं त्यांची वृत्ति बिथरली, दृष्टीहि फिरली. जे जीना कधीं मुसलमान सणाच्या दिवशीं उघड्या जागेवरील सामुदायिक

प्रार्थनेंत दिसायचे नाहींत, तेच जीना मोठ्या आस्थेनें त्या प्रार्थनेच्या सोहळ्यांत मुसलमानी थाटाचा पोशाख घालून बसूं लागले! सणानिमित्त पाकिस्तानाच्या पालुपदाचे संदेश आपल्या समाजाला देऊं लागले. पूर्वीच्या चरित्राचें स्मरणसुद्धां राहूं नये अशा दक्षतेचा गुण त्यांच्या स्वभावांत शिरला. फेरोजशहा मेथांच्या पुण्यस्मरणाचा मुंबईला समारंभ झाला, तर फेरोजशहांचे एका वेळचे सहकारी स्नेही म्हणून त्यास पाचारण केलें असतां त्यांनीं त्याचा अनादर केला. अकबर बादशहाच्या स्मरणाचा उत्सव झाला, पण या उत्सवांत हिंदु-मुसलमानांच्या एकीचे पोवाडे गाइले जातील, हें जाणून त्यांनीं त्या उत्सवाची व पर्यायानें त्या बादशहाची साफ उपेक्षा केली.

जीनांच्या राजकारणांत माणुसकीच्या सद्‌गुणांना किंमत नाहीं. पंजाबचे मुख्य प्रधान सर सिकंदर हयातखान अकस्मात् मरण पावले, त्यांच्या निधनाचें दुःख जीनांनीं व्यक्त केलें नाहीं. म. गांधींच्या पत्नी कस्तुरबा वारल्या तेव्हांसुद्धां जीनांकडून गांधींच्याकडे दुखवट्याची एक ओळहि गेली नाहीं. हिंदु-मुसलमानांच्या दंग्यांत जेव्हां मुसलमानांना सपाटून मार बसल्याचें दिसेल तेव्हां ते मुसलमानांच्या कैवारानें डरकाळ्या फोडीत, परंतु हिंदूंच्या कत्तलीचा खेद त्यांच्या हृदयांत संचरल्याचें एकसुद्धां उदाहरण नाहीं. ब्रिटिश राज्यकर्तृत्वाशीं टक्कर घेण्याची हिंमत त्यांनीं कधींच दाखविली नाहीं. १९४३ मध्यें गांधींनीं मला पत्र लिहावें, तें अडविण्याची सरकारची छाती नाहीं, ही बढाई त्यांनीं मुकाट्यानें मिटवून टाकली! कॉंग्रेसच्या सिद्धीला विघ्न करीत गेल्यानें आपलें काम होणारं असतां जीनांनीं लीगला सरकारशीं झगडण्याच्या संकटांत कां घालावें? कॉंग्रेस-लीगचें मतैक्य असल्याशिवाय हिंदुस्थानाला स्वराज्य द्यावयाचें नाहीं, या ब्रिटिशांच्या हट्टी संकल्पांतच जीनांच्या यशाची गुरुकिल्ली होती व त्या किल्लीचा त्यांनीं उत्तम उपयोग करून घेतला. चढेल अहंकार हा त्यांचा मोठा स्वभावविशेष दिसतो. मौ. आझादांना 'तुम्ही कॉंग्रेसच्या गोटांतले एकाद्या नाच्यापोऱ्यासारखे आहां' असें तारेनें कळवून त्यांचा उपमर्द केला! म. गांधींसारख्या जगद्वंद्य पुरुषाला जीनांनीं आपल्या घरीं दोनदां खेटे घालायला लावले हा जीनांच्या अहंकाराचा दाखला सर्वांना सुपरिचित आहे. जीनांचें समाधान करण्याचा

पं. जवाहरलाल नेहरू, बाबू राजेंद्रप्रसाद, राजगोपालाचारी, भुलाभाई देसाई यांनीं उद्योग केला. शेवटच्या दोघांची खटपट पाकिस्तानाला संमति देऊन चालली होती, परंतु सर्वांचा उद्योग वायां गेला. आपल्याला नेमकें काय हवें तें निश्चित स्पष्ट शब्दांनीं सांगायचें नाहीं आणि शक्य तेवढ्या घमेंडीच्या भाषेंत रिकामा घोळ घालीत बसायचें व इतक्या उपर बाजू उलटते असें वाटल्यास प्रतिपक्षाला झिडकारून वादांतून माघार घ्यावयाची, अशी त्यांची कोणताहि मुसलमानी हक्काचा प्रश्न सोडाविण्याची रीत होती! यामुळें कसलाच निर्णय होऊं नये व सदैव आपलें तक्रारींचें गुरगुरणें चालू राहावें, अशी सवड जीनांना मिळत राहिली. जीनांचें राजकारण हें ब्रिटिशांच्या भेदनीतीनें पोसलेलें, पण ब्रिटिशांच्या आटोक्याबाहेर निघालेलें भस्मासुरी फळ आहे, असें त्याचें थोडक्यांत वर्णन करतां येईल. हिंदु-मुसलमानांच्या दुहीचें पाप ब्रिटिशांनीं बुद्धिपुरस्पर केलें, असा आरोप ऐकतांच अलीकडे पुष्कळ जबाबदार ब्रिटिश राज्यकर्ते उद्वेगानें आपल्या कानावर हात ठेवून या दुहीशीं आपला कांहीं संबंध नाहीं, असा त्या आरोपाचा निषेध करीत असतात. परंतु गेल्या शंभर वर्षांच्या इतिहासाची साक्ष या आरोपाला सर्वथैव दुजोरा देणारी आहे. ब्रिटिशांनीं आपला आधार योग्य वेळीं काढून घेतला असता, तर मुस्लिम-लीगचे ताबूत थंड व्हायला उशीर लागला नसता. यादवीचा रक्तपात टळला नसता, पण पाकिस्तानचें भूत खाचित गाडलें गेलें असतें.

लीगच्या कारभाराचे डंके झडत असतां मुसलमानांत हिंदुस्थान हें एकच अखंड राष्ट्र या सिद्धान्ताचा पुरस्कार करणारे हजारों लोक होते. त्यांतल्या खुदा-ई-खिदमतगारांचा निर्देश येथें न केल्यास अन्याय होईल. वायव्य सरहद्दीवरील पठाणांत एका सद्भावनेच्या जागृत पठाणानें हा पंथ स्थापन केला. १९२५ सालीं कानपूर-कॉंग्रेसच्या अधिवेशनांत त्यांनीं म. गांधींचें दर्शन घेतलें, त्यांच्या शिकवणीचा अभ्यास केला व परत गेल्यावर आपल्या पठाण-जमातीला सत्य-अहिंसेचा मंत्र पढविला. १९३० मध्यें खुदा-ई-खिदमतगारांच्या तत्त्वनिष्ठेची परीक्षा झाली. एरवीं पठाण जीं कृत्यें कमालीचीं अपमानास्पद समजतो व त्यांचा वचपा काढण्यासाठीं प्रतिपक्षाचा जीव घेतो किंवा त्याच्याशीं त्वेषानें लढून स्वतःचा

जीव घालवितो, तीं कृत्यें त्यानें शांतपणें सहन केलीं. हीं कृत्यें ब्रिटिशांच्या दडपशाहीचीं होतीं व एकदां खुदा-ई-खिदमतगारांचा तोल सुटला असता कीं ब्रिटिशांनीं त्यांना झोडपून काढण्यासाठीं आपल्या हत्यारखान्यांतलीं एकाहून एक दारुण शस्त्रें त्यांवर चालवून पुनः गांधींच्या शिकवणीची यथेच्छ टवाळी केली असती. पण खुदा-ई-खिदमतगारांच्या शांत वृत्तीनें ब्रिटिशांचे दांत खट्टे केले. दडपशाहीला रुद्रावतार धारण करून थैमान घालतां आलें नाहीं. या दडपशाहीच्या वेळीं खुदा-ई-खिदमतगारांनीं मदती-साठीं मुस्लिम लीगला प्रथम हांक मारली. लीगनें या हांकेचा मान राखला नाहीं. परंतु कॉंग्रेस मात्र मदतीची हांक मारली जाण्यापूर्वीच सरहद्दीवर धांवून गेली. कॉंग्रेसच्या उपकारानें खुदा-ई-खिदमतगार कॉंग्रेसचे एकनिष्ठ सेवक बनले. वायव्य सरहद्दीच्या प्रांतांत कडव्यांतल्या कडव्या आडदांड मुसलमानांची वस्ती असतांहि तेथें लीगच्या कारस्थानांना अंकुर फुटेनासा झाला. खुदा-ई-खिदमतगारांचे पुढारी खान अबदुल गफारखान यांना लोक सरहद्द गांधी अशा नांवानें ओळखूं लागले, यावरून त्यांच्या सत्त्वशीलतेची कल्पना होण्याला हरकत नाहीं.

तसेंच पाहूं लागलें तर मुस्लिम लीगचा नक्षा अलीकडच्या वर्षांत (१९४२-४३) बंगाल, पंजाबमध्येंहि उतरण्याचे प्रसंग घडले. पंजाबांत सिकंदर हयातखानांच्या मागून ज्यांनीं मुख्य प्रधानाचीं वस्त्रें धारण केलीं ते खिज्र हयातखान मुस्लिम लीगचे सभासद नव्हते. शेवटीं नांवाला त्यांनीं लीगचा गंडा आपल्या गळ्यांत बांधून घेतला. तरी जीनांना संतोष नव्हता. त्यांनीं खिज्र हयातखानांच्या कारभारांत लुडबूड चालविली, तेव्हां जीनांना गाल चोळीत परत जायला खिज्र हयातखानांनीं भाग पाडलें. बंगालमध्यें फजलूल हक हे मुख्य प्रधान असतां त्यांचा वरचष्मा जीनांना सहन होईना. फजलूल हकांचा स्वभाव पाऱ्यासारखा चंचल आहे. त्यांनीं आपल्या हयातींत पुष्कळशीं थेरें केलीं. जीनांसमोर लीगच्या निष्ठेचीं भाषणें घसा फोडून ते करीत असले, तरी जीनांनीं त्यांच्याबद्दलचा संशय कधीं सोडला नाहीं. अखेरीस जीनांनीं कुठें तरी कळ दाबून हकमियाँना मुख्य प्रधानकीच्या उच्चासनावरून सक्तीनें खालीं ओढलें. पुढें फजलूल हकांसारख्या प्राण्यांना

बंगालच्या राज्याधिकारांत कदापि आश्रय मिळणार नाहीं असें जीनांनीं दर्पोक्तिपूर्वक भविष्य वर्तविलें. सिंधप्रांतांत अल्लाबक्ष नांवाच्या मुस्लिम पुढाऱ्यानेंहि जीनांच्या काळजांत कांहीं काळ कंप उत्पन्न केला होता. अल्लाबक्ष हा लीगच्या तुलनेनें सवाई हिकमती ठरणारा पुरुष होता. त्याच्यापुढें लीगच्या कारवाईची मात्रा चालत नव्हती. त्यालाहि सिंधच्या गव्हर्नरानें जबरदस्तीनें कारभारांतून काढून टाकलें व नंतर त्याचा भरदिवसा पोलीस-चौकीसमोर खून करण्यांत आला. पंजाबांत खिज्र हयातखानांनीं लीगच्या सभासदांची कायदेमंडळांत संख्या वाढल्यावरहि ही आपली मांड कायम राखली. काश्मीर संस्थानांतल्या मुसलमानांनीं तर काळीं निशाणें दाखवून जीनांना आल्या पावलीं परतविलें ही माहिती लक्षांत ठेवण्याजोगी आहे. १९३७ सालीं ज्या लीगला पंजाब, बंगाल, सिंध, वायव्य सरहद्द या बहुसंख्य मुसलमानांच्या मुलखांत बेताचा मान होता, तीच लीग १९४२–४३ मध्यें मुसलमानांची एकच प्रातिनिधिक संस्था व्हावी याचा खुलासा ब्रिटिश राज्यनीतीनें होणारा आहे. कॉंग्रेस जें करील त्याच्या उलट वागायचें, आणि जें बोलेल तेच शब्द फिरवून आपण बोलायचें हा लीगचा खाक्या पाहिल्यास तिच्याजवळ स्वतःची अशी अक्कल मुळींच नसल्याचें दिसून येतें. अक्कल नसली तरी स्वार्थाची हुषारी मात्र भरपूर होती. 'लढनेको मेरा भाई, और खानेको हम' या मुसलमानी म्हणीप्रमाणें कॉंग्रेसनें लढावें आणि कमाईत आयत्या वेळीं लीगनें आपल्या वांटणीचें घोडें पुढें रेटावें, व ब्रिटिशांनीं त्या घोड्याला चुचकारावें असा प्रकार चालला होता. शेवटीं या घोड्यानें स्वारावर मात करावी हें ठरलेलेंच होतें.

## हिंदी ख्रिस्ती समाज

ब्रिटिशांनीं माजविलेल्या भेदनीतीच्या सावळ्या गोंधळांत हिंदी ख्रिस्ती समाजानें मात्र सवत्या सुभ्याच्या बदसुराची भर कधींच घातली नाहीं. त्या समाजाच्या अखिल भारतीय वार्षिक संमेलनांतून जातवारीच्या विरुद्ध भाषणें होत असत. हिंदूंच्या हातीं राज्यकारभार गेल्यास आपल्या धर्माचे हाल होतील असें भय त्यांना कधीं वाटलें नाहीं. ब्रिटिशांच्या नीतीला ख्रिस्ती समाज भाळला नाहीं. वस्तुतः ख्रिस्त्यांप्रमाणें सर्व धर्मांच्या

समाजांना हिंदुस्थानांत निर्भयपणा वाटायला पाहिजे. हिंदु-राज्यांत कुठल्यहि धर्माला धक्का लागल्याचें उदाहरण—ऐतिहासिक वा अर्वाचीन—नसतां मुसलमानांनीं स्वधर्महानीचें नसतें भय उराशीं बाळगावें, तें भय पोसावें आणि स्वतंत्र मुलखाची राज्यासाठीं मागणी करावी, हा चमत्कार 'राजा कालस्य कारणम्' या वचनानें उलगडतो. करोडों मुसलमान ज्या भयानें घाबरल्याचा देखावा करीत होते तेथें हिंदी खिस्ती निर्धास्त राहावेत, याबद्दल ते सदैव धन्यवादास पात्र आहेत. ब्रिटिशांना मात्र खिस्ती समाजाचें हें धोरण रुचणारें नव्हतें. त्यांनीं खिस्त्यांना १९३५ च्या राज्यघटनेंत सवता सुभा दिला. अँग्लो-इंडियनांनाहि सवत्या सुभ्याचे मिरासदार बनविले. हिंदी राजकारणांत एकजिनसीपणा नाहीं, नानाविध परस्परविरोधी समाजांचा हिंदी समाज हा एक जुडगा आहे, असें जगाला दाखविण्याचा उद्देश ब्रिटिश राज्यकर्ते पिढ्यान्‌पिढया सिद्धीस नेत होते.

## दुसऱ्या महायुद्धाचीं वर्षें : : ११

### १९३९ ते १९४२

१९३९ च्या सप्टेंबर ३ तारखेला इंग्लंड-फ्रान्सनें जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारलें. जर्मनीमध्यें हिटलर सुमारें ६ वर्षें सारखी लढाईची तयारी करीत होता. तयारी उतास जाऊं लागली तेव्हां त्यानें झेकोस्लोव्हाकियाविरुद्ध खुसपट काढलें. त्या प्रदेशाच्या सुडेटन भागांतील जर्मन-प्रजेचा छळ होत असल्या-मुळें त्यांची सोडवणूक करण्याच्या इराद्यानें हिटलरनें सुडेटनबरोबर झेको-स्लोव्हाकियाचा निःपात उडविला. यावेळीं इंग्लंड–फ्रान्स दुबळ्या प्रेक्षकांप्रमाणें हिटलरचा बकासुरी खेळ पाहून हिटलरशीं सामना होणार या खात्रीनें युद्धाच्या तयारीस लागले. १९३९ मध्यें त्यानें आपली वक्रदृष्टि पोलंडकडे वळविली व पोलंडच्या ताब्यांतलें डॅझिग बंदर जर्मनीचें आहे असा हट्ट शेवटास नेण्याकरितां अगाऊ संकेतानुसार पोलंडवर हल्ला चढविला व तो देश एका पंधरवड्याच्या आंत जगाच्या नकाशावरून पुसून टाकला. पोलंड पादाक्रांत करीत असतां रशियन फौजा पोलंडच्या एका भागांत शिरल्या-मुळें सगळा देश हिटलरला घशांत टाकतां आला नाहीं. पोलंडच्या बचावाची हमी इंग्लंड-फ्रान्सनें घेतली असल्यामुळें त्या देशावर स्वारी होतांच हीं दोन्हीं राष्ट्रें लढाईच्या मैदानांत उतरलीं. १९४० च्या एप्रिल-पर्यंत हिटलरनें त्यांच्याकडे लक्ष दिलें नाहीं. समुद्रांत इंग्लंडच्या बोटी बुडवाव्या, एवढेंच काम हिटलरच्या पाणबुड्या करीत होत्या. एप्रिलांत त्याची नॉर्वेवर चढाई झाली. तिला थोपविण्याचा इंग्लंडचा यत्न वायां गेला. याच सुमारास हिटलरच्या लष्करानें डेन्मार्क, हॉलंड, बेल्जम हीं

समुद्रकिनाऱ्यावरील राज्यें रगडून फ्रान्समध्यें आपली धाड आणून पोंचविली. फ्रान्समध्यें थोडेसें रणकंदन झालें. पण जून महिन्यांत फ्रान्स कोसळून पडलें. या मुहूर्तावर इटालीनें इंग्लंडविरुद्ध युद्ध पुकारलें ( १० जून १९४० ). इंग्लंडनें या धडाक्यांत आपल्या शौर्याची व धैर्याची शिकस्त करून जवळ जवळ साडेतीन लाख सर्दी माणसें स्वदेशीं सुरक्षित आणलीं. युद्धाचें सर्व बहुमोल साहित्य फ्रान्समध्येंच टाकून देणें इंग्लंडला भाग पडलें. फ्रान्सचा पाडाव केल्यावर हिटलरला स्वर्ग दोन बोटें उरल्याप्रमाणें धन्यता वाटून त्यानें इंग्लंडविषयीं धमकीची भाषा वापरली. इंग्लंड देशानें ती धमकी जोरानें लष्कराची वाढ व तयारी करण्याच्या दृष्टीनें मनावर घेतली. फ्रान्सचा आपल्या मनाजोगा बंदोबस्त केल्यावर १९४० च्या ऑगस्टपासून नोव्हेंबर-पर्यंत इंग्लंडचा युद्धनिश्चय ढिला व्हावा व त्यानें कंटाळून घाबरून जाऊन शरण यावें, या उद्देशानें हिटलरचें विमानदळ दर दिवशीं वाढत्या संख्येनें इंग्लंडवर बॉंबगोळ्यांचा वर्षाव करीत होतें. त्या योगानें इंग्लंडचें नुकसान पुष्कळच झालें; पण हिटलरच्या विमानदळालाहि इंग्लंडचें आकाश वाटलें होतें तसें अगदींच मोकळें नसून इंग्लंडचीं विमानें आपला प्रसंगीं सपाटून धुव्वा उडवूं शकतात असा कटु अनुभव आला.

## युद्धस्थितीचें निरीक्षण

नोव्हेंबरांत इंग्लंडवरील विमानाचे हल्ले कमी करून हिटलरनें आपला मोर्चा बाल्कन राष्ट्रें व ग्रीस यांच्याकडे वळविला. ग्रीसमध्यें इंग्लंडशीं हिटलरला झटापटी कराव्या लागल्या. या झटापटींत इंग्लंडला शेवटीं हरावें लागत असलें तरी शत्रूचें वेळापत्रक विस्कटून त्याला आपल्या शक्तीची ओळख करून द्यावयाची एवढें काम साधत असे. बाल्कन राष्ट्रें बगलेंत मारण्याचा हिटलरचा हेतु रशियावरील आक्रमणाला कसलाच अडथळा राहूं नये हा होता, हें १९४१ च्या जून अखेरीस स्पष्टच झालें; पण त्या पूर्वीसुद्धां तो हेतु इंग्लंडच्या लक्षांत आला होता. बाल्कन राष्ट्रांना, विशेषतः ग्रीसला कुमक पोंचवितां न आली तरी इंग्लंडनें आफ्रिकेंत इटालिन साम्राज्याचे लचके तोडण्याला सुरुवात केली होती ( लिबिया १९४०–४१ ) व ॲबिसीनिया देश इंग्लंडनें इटालीच्या घशांतून बाहेर काढण्याचें काम पुरें केलें होतें

(१९४१). ईजिप्तच्या पश्चिमेस लिबियांत इटालीच्या हुकमतीची इंग्लंडनें केलेली गळचेपी जर्मन फौजेनें थांबविली व ब्रिटिश लष्कराला इजिप्तच्या उंबरठ्यापर्यंत मागें रेटलें. जर्मनीची मदत वेळेवर आली नसती तर इटालियन पराक्रमाच्या नाड्या तिकडेहि आंखडल्या असत्या. यूरोपचा दक्षिण किनारा व आफ्रिकेचा उत्तर किनारा आपल्या ताब्यांत घेऊन इंग्लंडचा भूमध्य समुद्रांतील संचार बंद करावयाचा ही जर्मन-इटालियन योजना फिसकटली. तेव्हां जर्मनीला आपलें लष्कर रोमेल या नामांकित सेनानीसह आफ्रिकेंत पाठवावें लागलें व त्यानें आपलें नांव राखलें. १९४१ च्या मध्यापर्यंत उत्तर आफ्रिकेचें रणक्षेत्र याप्रमाणें तापलें असतां हिटलरनें रशियावरील स्वारीचा डाव टाकला. ता. २२ जून १९४१ च्या दिवशीं जर्मनीचे लाखों सैनिक रशियाचा प्रदेश तुडवीत निघाले. दोन तीन महिन्यांत रशियाची मोहीम आटपेल असा हिटलरचा अंदाज होता. पण रशियानें आपल्या लढाईचें तंत्र असें ठेवलें, कीं जर्मनीची विजयाची आशा १९४१ सालाच्या पलीकडे गेली. रशियन फौजेची सारखी पीछेहाट चालली होती. जर्मनीच्या या पीछे-हाटीला दाणादाण उडाल्याचें स्वरूप देतां आलें नाहीं. रशियन फौजा मागें सरकतांना जर्मनांच्या हातीं दाणागोटा, दारूगोळा किंवा कारखान्यांची यंत्रें यांपैकीं कांहींच न लागेल अशी व्यवस्था अंमलांत आणीत होत्या. त्या फौजा मजबूत ठाण्यावर थांबून जर्मन लष्कराला अटीतटीच्या सामन्यांत गुंतवून त्यांची धांव अडवीत होत्या. राशियानें १९४१ अखेरपर्यंत लाखों चौरस मैल जमीन कित्येक मोठालीं शहरें गमावलीं; पण सेनाशकट शाबूत ठेवला. त्या वर्षाच्या ऑक्टोबरांत राशीयन हिवाळ्याला प्रारंभ होतांच अतिशय कडक थंडी व बर्फाची दलदल यांतून पुढें दौड करणें जर्मनीला अशक्य झालें. राशीया आपल्यासारखाच थकलेला असेल व त्याला हिवाळ्यांत लढण्याची हिंमत करवणार नाहीं. असा जर्मनांचा भरंवसा होता; परंतु राशीयानें हिवाळा ऐन भरांत असतां आपल्या चढाईचे जोरदार तडाखे मारायला सुरवात केली. मॉस्को हें राजधानीचें शहर वेढ्याच्या आपत्तिमधून यावेळीं मोकळें झालें. १९४२ मध्यें राशीयांत दक्षिणेकडे जर्मनीनें मुसंड्या मारल्या पण राशियाचा खुर्दा उडविण्याच्या अवसानाच्या त्या मुसंड्या नव्हत्या. लढलेंच पाहिजे या भावनेच्या हट्टी उपायांतल्या त्या मुसंड्या होत्या.

## जपानचा युद्धप्रवेश

१९४१ च्या डिसेंबरांत जपान देश जर्मनीच्या बाजूनें युद्धांत शिरला व त्याच्या विजयाचा वेग व मुलुखगिरीचा पल्ला जर्मनीपेक्षांहि जास्त दिसून आला. हां हां म्हणतां फिलिपाइन्स, इंडोचायना, सयाम, मलाया, ब्रह्मदेश हा प्रदेश त्यानें काबीज केला. जावा, सुमात्रा हीं डच बेटें त्याच्या पोटांत उतरलीं. तिकडे ऑस्ट्रेलिया व इकडे हिंदुस्थान या दोन्हीं देशांतील ब्रिटिशांची सत्ता केव्हां जाईल याचा भरंवसा नाहीं, असा देखावा जपानच्या स्वारीनें उत्पन्न केला. १९४२ सालांत हिंदुस्थानांत जपानी व जर्मन फौजांनीं एकमेकांस भेटावयाचें आणि जिंकलेल्या दुनियेची आपसांत वांटणी करावयाची असा जपान-जर्मनीचा संकल्प असल्याची कुजबूज जिकडे तिकडे सुरू झाली. इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका हे म्हातारे देश आहेत, तेथील जनता आजवर भोगलेल्या वैभवानें मर्दुमकींत मागासली आहे. एकाद्या जोराच्या धपाट्यानें तिचे प्राण कासावीस होऊन शरणार्थीनें आपल्या पायाशीं ती जनता लोळण घेईल, अशा कल्पना हिटलरनें स्वतःच्या उराशीं बाळगल्या व जर्मनींत यथेच्छ पिकवल्या होता. जपानी साम्राज्या नेत्यांनासुद्धां ह्याच कल्पनांनीं घेरलें होतें. दोन्हीं देशांचीं युद्धनीति सारखीच होती. प्रतिपक्षाला आपल्या उद्देशाचा सुगावा लागून तो सावध व सज्ज होण्यापूर्वीं त्याला रक्तबंबाळ करावयाचें हें धोरण रशियाच्या बाबतींत जर्मनीनें व अमेरिकेच्या बाबतींत जपाननें बिनचूक पाळलें. परंतु पहिल्याच तडाख्याला प्रतिपक्षी बेशुद्ध पडेल ही अपेक्षा सपशेल चुकीची आहे असा अति कडवट अनुभव इंग्लंड—अमेरिकेनें जपानला व रशियानें जर्मनीला चाखायला भाग पाडलें. अमेरिकेनें पहिल्या सहामाहींत आपल्या बळाची व शौर्याची चुणुक जपानला दाखविली. रशियांत जर्मनांची स्थिति इसापनीतींतला 'कावळा व मेंढरूं' या दोन गोष्टी-सारखी करून सोडली. गरुडानें मेंढराला उचलून अस्मानांत नेल्याचें पाहून कावळ्यालाहि तसेंच करावेंसें वाटलें. कावळ्यानें मेंढरावर झडप टाकली. आपल्या पायाचीं नखें मेंढराच्या अंगांत रोवलीं, पण मेंढरूं उचलेना, तेव्हां पाय सोडवून उडून जाण्याची धडपड चालविली. पण पाय लोकरीच्या गुंता-ड्यांत असे अडकले होते कीं, ते कांहीं केल्या सुटेनात. अखेरीस धनगराच्या नजरेस हा प्रकार येऊन त्यानें कावळ्याचें कांडांत काढलें. जर्मनीला गरुडाचा

गौरव देतां येईल; पण रशिया हें झेकोस्लोव्हाकिया, पोलंडसारखें मेंढरूं नाहीं; तो अस्वल आहे. याचें भान सुटल्यामुळें जर्मनीला रशियांत झिजून मरण्याची पाळी १९४२ पासून आली.

## हिंदी जनमनाची पाहणी

दुसऱ्या महायुद्धाची ही कथा हिंदुस्थानांतील भल्याबुऱ्या घडामोडींचा आढावा उकलण्यासाठीं थोडक्यांत सांगितली आहे. युद्ध सुरू होतांच हिंदी जनतेमध्यें इंग्लंडच्या पराभवाचीं भाकितें वर्तविलीं जाऊं लागलीं. ब्रिटिश साम्राज्याच्या चिंधड्या उडून आपला देश रशिया किंवा जपान यांच्या ताव-डींत जाणार ही नव्या गुलामगिरीची भाषा मोठ्या चवीनें हिंदी साक्षर व सुशिक्षित समाजांत सर्वत्र बोलली जात होती. झेकोस्लोव्हाकिया, पोलंड या देशांचा जर्मनीनें सहज चुटकीसरशीं चुराडा केला, आतां त्यापुढें इंग्लंड-फ्रान्सला कसा दम धरवतो, या समजुतींनीं हिंदी प्रजा दर दिवशीं आपलें मनोरंजन करीत होती. १९४० एप्रिल-मे-जून या तीन महिन्यांत नॉर्वेपासून फ्रान्सपर्यंत सारे देश जर्मनीच्या जबड्यांत गेले व लाखों ब्रिटिशांनीं डंकर्क येथून स्वदेशीं धूम ठोकली, हा जर्मन विजयाचा झपाटा हिंदुस्थानाला अभि-नंदनीय वाटला. ब्रिटिशांच्या गुलामगिरीचा कंटाळा हिंदी मनोरचनेला असा विचित्र आकार आणीत होता. १९४० च्या उत्तरार्धांत जर्मन विमानांच्या धाडी इंग्लंडवर सुरू झाल्या तेव्हांच्या हिंदी हृद्गतांचें ज्यांना स्मरण असेल, ते हिंदुस्थानांत दर घडीस हवेमध्यें उठणाऱ्या वार्तालहरींची कल्पना देऊं शकतील. लंडनचा होम झाला, ब्रिटिश बादशहा गुप्तपणें हिंदुस्थानांत येऊन राहिला आहे, चर्चिल कानडांत जाऊन लपला आहे, अशा बातम्यांचा येथें कर्णोपकर्णीं बेफाम खप सुरू होता. जर्मन रेडिओ ऐकण्याचा नियम धर्म-व्रताच्या अभंग निष्ठेनें पाळणारे हरीचे लाल किंवा अल्लाचे प्यारे घरोघर होते; रेडिओ व आपला कान यांमध्यें फाजील अंतर राहिल्यास न जाणो जर्मन प्रवक्त्याच्या तोंडचा एकादा महत्त्वाचा शब्द निसटायचा अशा धास्तीनें जर्मनींतल्या बातम्यांचे प्रेमी—अशांची संख्या फारच मोठी होती—रेडिओला कान लावून जर्मनींतून सांगितल्या जाणाऱ्या बातम्या अत्यंत श्रद्धेनें ऐकत असत. पण १९४० मध्यें इंग्लंडचा नाश झाला नाहीं, व

१९४१ तरी तसा नाश होण्याचें चिन्ह नाहीं, असें दिसूं लागल्यावर खंतावत चाललेल्या हिंदी चित्ताला जर्मनीच्या रशियावरील स्वारीनें एकदम हुरूप चढला. रशियाला तीन चार महिन्यांत शेवटचा घोर लागणार याबद्दल हिंदी माणूस मुळींच शंकित नव्हता. रशिया जिंकतांना जर्मनीला जेवढी घाई असेल त्याहून जास्त घाई जर्मनीकडून रशिया जिंकला जावा म्हणून हिंदी माणसामध्यें दिसत होती. आफ्रिकेंत जर्मन सेनापति रोमेल यानें ब्रिटिशांच्या सैन्याला कैरो शहराच्या परिसरापर्यंत माघार घ्यायला लावली तेव्हां तर जर्मनांनीं त्याच्या स्तुतीचे पोवाडे गाइले नसतील अशा थाटाचे पोवाडे हिंदुस्थानांत घरोघर गुणगुणण्याचा प्रघात पडला. १९४२ मध्यें जेव्हां जपानचें सैन्य हिंदी पूर्वसीमेशीं येऊन उभे राहिलें, तेव्हां जणुं काय आपला कोणी चिरापेक्षित त्राताच आल्यासारख्या हर्षाच्या लाटा हिंदी जनतेंत उसळल्या. सरकारी कायद्यामुळें त्या लाटांचें उघड प्रदर्शन करणें अशक्य होतें; पण ज्यानें त्यानें आपल्या तत्कालीन मनःस्थितीचा झाडा घेतल्यास वरील विधानें अत्युक्तीचीं नाहींत असेंच कबूल करावें लागेल.

## हिंदी राजकारणाचे हेलकावे

हिंदी राजकारणाची या पावणेदोन वर्षांच्या काळांत काय स्थिति होती ? १९३९ अखेरपर्यंत काँग्रेसचे प्रांतिक पुढारी १९३५ च्या राज्यघटनेस अनुसरून ती राज्यघटना अमान्य असूनहि शिताफीनें आपापल्या प्रांताचा राज्यकारभार चालवीत होते. युद्धाचा भडका उडतांच म. गांधींना व्हाइसरॉयांनीं भेटीस बोलावलें. म. गांधींची सहानुभूति फ्रान्स-इंग्लंडच्या बाजूस होती. लंडनच्या प्राचीन प्रख्यात इमारतींचा विध्वंस होणार हें दृश्य मनासमोर येतांच त्यांचें हृदय गांगरून गेलें, असें त्यांनींच सांगितलें आहे. पं. जवाहरलाल नेहरू हे जगाच्या राष्ट्रशृंखलेंतला हिंदुस्थान हा एक दुवा आहे, अशा व्यापक दृष्टीनें विचार करणारे म्हणून त्यांनीं 'जुनें जग मेलें, नवें जग जन्मास येणार, अशा वेळीं आपणदेखील नव्या जगाच्या जन्माचें स्वागत होण्यासारखें वागलें पाहिजे,' असा खुलासा केला. पण आपल्या देशाची वाट काय ? हा प्रश्न काँग्रेसच्या पुढाऱ्यांच्या अंतःकरणांत यावेळीं सहजगत्या उभा राहणारा होता. इंग्लंड जर लोकशाहीच्या रक्षणासाठीं

जर्मनांशीं लढणार, तर त्यानें हिंदुस्थानांत हिंदी जनतेच्या राज्याला संधि देऊन ' बोले तैसा चाले ' अशा वंद्य मार्गाचा अवलंब करावा, त्या योगानें आपलें नैतिक बळ वाढवावें; हिंदुस्थानला स्वराज्य दिल्यास इंग्लंडला हिंदी जनतेचा एवढा प्रचंड सहकार लाभेल, कीं त्यापुढें जगाचीं सारीं राष्ट्रें लटपटतील. इंग्लंडचें नांव जगाच्या इतिहासांत निरंतर उज्ज्वलतेनें तेवत राहील, वगैरे विचार गांधीजी व इतर पुढारी ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या कानांवर घालूं लागले. परंतु या विचारांचा ब्रिटिश राज्यकर्तृत्वांत प्रवेश होण्याची आशा नव्हती. म्हणून १९३९ च्या अखेरीस कॉंग्रेसनें आपलीं प्रांतिक प्रधान-मंडळें बरखास्त केलीं व वैयक्तिक सत्याग्रह अंमलांत आणावा अशी योजना म. गांधींनीं आंखली ( १९४० अखेर ). ' ब्रिटिशांना युद्धांत मदत करावयाची नाहीं, ' या आशयाचें भाषण करण्याचें स्वातंत्र्य असावें, असा या सत्याग्रहाचा रोख होता. परिणामीं एका वर्षांत सुमारें पांच हजार कॉंग्रेसचे कामकरी तुरुंगाच्या भिंतीआड लोटले गेले. त्यांत कॉंग्रेसचे प्रांतिक मंत्री, जवाहरलाल, मौलाना आझाद, वल्लभभाई यांसारखीं मोठीं माणसें होतीं. पं. नेहरूंना कोर्टानें चार वर्षांची सक्त मजुरीच्या कैदेची शिक्षा ठोठावून लोकांच्या प्रक्षोभाला चांगलेंच इंधन पुरविलें. १९४१ अखेरीला बहुतेक सारे पुढारी सुटले.

## ब्रिटिशांचें ' ये रे माझ्या मागल्या ! '

हिंदी राजकारणाची गांठ जास्त जास्त कांटेरी व बळकट होत असतां ब्रिटिश राज्यकर्ते आपल्या जुन्यापुराण्या बुरसलेल्या अडचणींचा पाढा त्याच त्याच स्वरांनीं व शब्दांनीं पुनः पुनः वाचीत होते. १९४० ऑगस्ट ८ रोजीं गव्हर्नर जनरलानें भलें जंगी वक्तव्य जाहीर केलें. त्यांत हिंदुस्थानच्या निरनिराळ्या पक्ष-प्रतिपक्षांतून बरेच लोक निवडून त्यांचें एक सल्लागार मंडळ नेमण्याची कल्पना होती. ब्रिटिशांनीं आपले युद्धाचे हेतु स्पष्ट करावे व त्यांत हिंदी राजकीय भवितव्याचें चित्र कसें रेखाटलें जाईल तें कळवावें, हा हिंदी राजकीय पुढाऱ्यांचा तगादा योग्य प्रकारें विचारांत घेतलेला नव्हता. मोघम गुळमुळीत भाषेनें त्याची वासलात लावली होती. कॉंग्रेसनें आपली निराशा व उद्विग्नता व्यक्त करून ब्रिटिश सरकार विस्तवाशीं खेळत अस-

त्याचा इशारा दिला. देशांतील वृद्ध, वजनदार विचारवंतांना राजकीय वातावरणांत वाढणारा बिघाड टाळण्याचें स्फुरण चढून त्यांनीं समानशीलाची एक परिषद् भरवून हिंदुस्थानाला स्वराज्य देण्याची हीच वेळ आहे, असें बजावलें. कॉंग्रेसची मागणी व या जुन्या सनदशीर राजकारणाच्या तालमीं-तल्या वृद्ध विचारवंतांची स्वराज्याची कल्पना यामध्यें महत्त्वाचें अंतर असलें, तरी त्यांच्याहि तोंडावर ब्रिटिशांकडून वाटाण्याच्या अक्षता फेंकण्यांत आल्या. आपल्या सत्तेंत तसूभर कमतरता होऊं द्यावयाची नाहीं, हा निश्चय न सोडतां जगाला मात्र आपण उदार आहों, असें भासविण्याकरितां येथें आणि इंग्लंडांत ब्रिटिश राज्यप्रमुख ' हिंदुस्थानांत जातवारीचें व वर्गवारीचें असाध्य वैमनस्य आहे ' या पालुपदाचें रडगाणें या काळामध्यें गात राहिले. आंतून मात्र त्यांना कांहींतरी बेमालूम तोडगा काढल्याशिवाय देशांतील परिस्थिति काबूंत ठेवतां येणार नाहीं, याची जाणीव झालेली होती. म्हणून त्यांनीं १९४० ऑगस्टनंतर सुमारें एक वर्षानें हिंदुस्थान-सरकारांत नव्या आठ असामींची नेमणूक केली. त्या नेमणुकीनें बॅ. जीनांच्या तळपायाची आग मस्तकाला गेली. आपल्याला विचारल्या-शिवाय मुस्लिम लीगचीं माणसें सरकारांत ओढली हें त्यांच्या मस्तकशूळाचें कारण होतें. सहा कोट अस्पृश्यांना डावलून या नेमणुका झाल्या, याबद्दलचा संताप डॉ. आंबेडकरांनीं निदर्शनास आणला. या अष्टकांत आपल्या समाजा-ची वर्णी लागली नाहीं म्हणून शीखांचें मन खट्टू झालें. कॉंग्रेसच्या गोटांतली ध्येयनिष्ठा या नेमणुकींनीं बिलकूल हादरली नाहीं. आठ जणां-पैकीं श्री. माधवराव अण्यांचें नांव किंचित् विस्मयकारक वाटणारें होतें.

## चिनी जोडप्याचें आगमन

१९४१ च्या अखेरीस कॉंग्रेसचे सगळे सत्याग्रही बंधमुक्त झाल्यावर म. गांधींनीं ताबडतोब कॉंग्रेसच्या कार्यकारिणीची बैठक भरविण्याचा आग्रह धरला. या वर्षांत रशियावरील जर्मनीची मोहीम व जपानची महायुद्धांतली जर्मनीच्या बाजूची उडी, या दोन घटनांनीं युद्धाच्या छाया हिंदुस्थानापर्यंत येऊन पसरल्या होत्या. ब्रिटिश सत्ताधाऱ्यांची काळजी वाढली होती. अशा वेळीं हिंदी जनतेच्या कर्तव्याची मीमांसा असंदिग्ध रीतीनें व्हावी म्हणून

बारडोलीस कार्यकारिणीची बैठक भरली व तिनें पुनः एकवार आपले राजकीय उद्देश ठासून मांडले. जपानच्या युद्धप्रवेशानें कालाचें चक्र जलद फिरूं लागलें. कार्यकारिणीचे व तन्निमित्त बारडोलीस जमलेले लोक आपापल्या घरीं पोंचले असतील नसतील तोंच हिंदुस्थानांत विजेप्रमाणें चियांग-कै-शेक पतिपत्नी आल्याचें वर्तमान चमकलें. चीन देश पूर्वी कित्येक वर्षें जपानशीं लढत असतां त्याविषयींच्या हकिकती जपान लढाईंत पडण्यापूर्वी वृत्तपत्रांना दिल्या जात नव्हत्या. कारण जपानला असें करणें रुचलें नसतें असें भय होतें. पण जपाननें शत्रूची भूमिका घेतांच इंग्लंडच्या स्नेहाचें पारडें फिरलें. चीन देशाच्या पुढाऱ्याला प्रेमानें मिठी मारण्याची इंग्लंडची उत्सुकता अशा रीतीनें फळास आली. हिंदी जनतेमध्यें या चिनी जोडप्याच्या स्वागतानिमित्त उत्साह उत्पन्न झाला. पूर्वीच्या वर्षांत पं. नेहरू चीनचा फेरफटका करून व चियांग-कै-शेक यांचा पाहुणचार भोगून आलेले होते. दोघांच्या गांठीभेटींचा पुनः योग आला. जर्मनी—जपानबद्दल हिंदी जनतेंत असलेल्या अनुकूलतेला विरजण लावण्याची कामगिरी या चिनी पाहुण्यांनीं जपानी अत्याचारांचा पाढा वाचून बजावली. याशिवाय लढाईच्या दृष्टीनें हिंदुस्थान-सरकारशीं खलबतें झालीं. पाहुण्यांना स्वदेशीं लवकर जावयाचें असल्यानें त्यांनीं शांतिनिकेतनसारखीं स्थळें पाहून कलकत्त्यास प्रयाण केलें व तेथें जाण्याच्या घाईंत म. गांधींनीं त्यांची भेट घेतली. ता. ९ ते २३ फेब्रुवारीपर्यंत चियांग-कै-शेक हिंदुस्थानांत होते. त्यांतले पहिले १० दिवस त्यांनीं दिल्लींत घालविले.

## क्रिप्स्‌ची शिष्टाई

फेब्रुवारीच्या सुरुवातीस हिंदी राज्यकारभाराच्या प्रश्नाला तोंड लावून सर स्टॅफर्ड क्रिप्स् यांनीं ब्रिटिश-प्रधानमंडळांत यासंबंधीं कांहींतरी शिजत असल्याचा वास उत्पन्न केला. क्रिप्स् ही व्यक्ति आधीं एकदां ( १९३९ नोव्हेंबर ) हिंदी पुढाऱ्यांच्या मुलाखती घेऊन हिंदुस्थानांत हिंडून गेलेली होती. क्रिप्स्‌ची स्वारी पुढें रशियाच्या ब्रिटिश वकिलातीवर गेली व त्यांनीं इंग्लंड—रशियाची मैत्री जुळविल्यामुळें ते इंग्लंडला परत आले तेव्हां त्यांचा गौरव मुत्सद्दी या नात्यानें वाढलेला होता. क्रिप्स् हे समाजसत्तावादी, मजूर-

पक्षांतलें एक प्रस्थ, यामुळें त्यांच्या विचारसृष्टींत इंग्लंडच्या हुजूर व उदार पक्षाचे दोष नसतील असें सर्वांना वाटत होतें. फेब्रुवारीच्या अखेरीला पुनः एकदां पार्लमेंटांतील चर्चेंत क्रिप्स् यांनीं हिंदी प्रश्न चघळून स्वतःबद्दलच्या आशेला दुजोरा आणला. मार्च १० तारखेला हिंदी प्रश्नाविषयीं मुख्य प्रधान मि. चर्चिल खुलासा करणार आहेत असें बोलून त्याच वेळीं त्यांनीं त्या तारखेकडे सर्वांचे कान, डोळे वेधून घेतले. त्याप्रमाणें चर्चिलसाहेबांचा खुलासा जगासमोर आला. आपली निश्चित योजना घेऊन क्रिप्स् हिंदुस्थानांत जाणार असल्याची घोषणा झाली व २३ मार्च रोजीं सर स्टॅफर्ड दिल्लीस आले. उभयपक्षीं वादविवादाला रंग चढला. पण विलायतेहून जें घबाड म्हणून आणलें, तें काँग्रेसच्या मागणीपुढें चिपाड ठरलें! त्यांत हिंदी जनतेला खरे स्वराज्याधिकार मिळण्याची तरतूद नव्हती. ३० मार्चलाच काँग्रेसतर्फे त्या पोकळ देणगीचा धिक्कार झाला होता. पण तो सर स्टॅफर्ड यांच्या विनवणीवरून षट्कर्णी होऊं दिला नाहीं. त्या मूळच्या देणगीला पुढें ठिगळें लावण्यांत आलीं तरी तें सोंग काँग्रेसच्या मनांत भरेना. एप्रिलमध्यें अमेरिकेचें कॅ. जॉन्सन या नांवाचें एक पात्र या वाटाघाटींत घुसलें व त्याकरितां काँग्रेसला आणखी कांहीं दिवस झुलत राहण्याची पाळी आली. ता. १० रोजीं काँग्रेसचा नकार जगजाहीर झाला. सर स्टॅफर्ड यांनीं तत्काळ आपला बाडबिस्तरा गुंडाळून विलायतचा रस्ता धरला. ता. १२ एप्रिल रोजीं त्यांनीं हिंदुस्थानला रामराम ठोकला. त्यांनीं हिंदुस्थानांतून जाऊं नये अशा अर्थाचा निरोप अमेरिकन राष्ट्राध्यक्षाकडून अगदीं हिंदुस्थानांतून निघण्याच्या वेळीं त्यांना आला होता; पण 'वेळ गेली' असें बोलून सर स्टॅफर्ड चालते झाले, असें म्हणतात. सर स्टॅफर्ड यांनीं आणलेली देणगी दृष्टीस पडतांक्षणीं असल्या बुजगावण्याकरितां हिंदुस्थानच्या प्रवासाची तसदी घेण्याचें कारण नव्हतें, असें सरसाहेबांस म. गांधींनीं सांगितलें अशी एक आख्यायिका आहे. क्रिप्स्-योजना एकाहि पक्षाला पसंत नाहीं, तेव्हां एकट्या काँग्रेसकडे तिला झिडकारल्याचा दोष येत नाहीं.

## काँग्रेस-पुढाऱ्यांची धरपकड (१४९२ ते १९४४)

सर स्टॅफर्ड गेल्यावर यापुढें ब्रिटिशांची गय केल्यास निभाव लागणार नाहीं,

अशा खात्रीनें कॉंग्रेसचे पुढारी बोलूं लागले. हिंदी राजकारणांतील परस्परविरोधी पक्षांना ब्रिटिशांची फूस आहे, त्यांनीं निष्कारण पक्षभेदांचें स्तोम उभें केलें आहे, मुस्लिम-लीगच्या आडमुठेपणाला ब्रिटिश राज्यकर्ते पुष्टि देत आहेत, ब्रिटिशांनीं आपली सत्ता सोडल्याखेरीज पक्षभेदाचें पीळ उकलण्याला सवड मिळायची नाहीं, जोंवर ब्रिटिशांचें वर्चस्व राहील तोंवर साहजिकच प्रत्येक त्यांच्या तोंडाकडे पहातो, समेटाकरितां एकमेकांच्या तोंडाकडे पाहण्याची गरज ब्रिटिशांमुळें कोणत्याहि पक्षाला वाटत नाहीं, याकरितां कसलीहि भीडमुर्वत न बाळगतां ब्रिटिशांना 'आतां तुमचा वरचष्मा पुरे, तुम्ही येथून चालते व्हा' असें सांगण्याची प्रवृत्ति म. गांधींच्या हृदयांत स्फुरली व त्यांनीं 'क्विट् इंडिया'चा मंत्र जनतेला शिकविला. ब्रिटिशांना 'चालते व्हा, येथून काळें करा' असें बजावणारा हा मंत्र असून त्याचा प्रतिध्वनि प्रत्यहीं करोडों हिंदी हृदयांत दुमदुमूं लागला. नुसतें 'जा' म्हटल्यानें ब्रिटिश जाणार नाहींत, त्याला सत्ता सोडायला लावण्याकरितां आपण चळवळ केली पाहिजे, असेहि विचार म. गांधींच्या हृदयांत डोकावूं लागले. कॉंग्रेस-कार्यकारिणीनें यासंबंधाचा ठराव केल्यावर १९४२ ऑगस्टच्या पहिल्या आठवड्यांत मुंबईस ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीची सभा भरविण्यांत आली. कॉं. कार्यकारिणीच्या ठरावाचा या सभेंत कसून खल झाला. म. गांधींकडे पुनः एकवार नेतृत्व सोंपविलें गेलें. त्यांनीं आपल्या भाषणांत आपण 'व्हाइसरॉयला पत्र पाठवून भेटणार आहों. हा कार्यभाग संपल्यावर चळवळीला प्रारंभ होईल' अशी सूचना घातली होती. मुस्लिम-लीगच्या पुढाऱ्यांना वळविण्याचाहि त्यांचा उद्देश होता. ता. ९ ऑगस्ट रोजीं या ठरावाच्या चर्चेबरोबर एकंदर सभेचें काम संपलें. त्याच रात्रीं सरकारनें बहुतेक साऱ्या महत्त्वाच्या पुढाऱ्यांना पकडून निरनिराळ्या कैदखान्यांत रवाना केलें. सरकारची कॉंग्रेसला दडपून टाकण्याची तयारी बरेच दिवस चालली होती. कॉं. कार्यकारिणीच्या सभासदांना अहमदनगरचा किल्ला दाखविला. बाकीच्यांना येरवड्यांत ठेवलें. म. गांधींची सोय पुण्यानजीकच्या आगाखानाच्या महालांत लावली. कॉंग्रेस-पुढाऱ्यांना हिंदुस्थानभर अशाच रीतीनें भराभर पकडून तुरुंगांत टाकलें. या धांदलींत ज्यांना पोलिसच्या हातावर तुऱ्या देतां आल्या, त्यांना भूमिगत असें नांव प्राप्त झालें.

## देशांतील दंगे

दुसऱ्या दिवसापासून आठपंधरा दिवस साऱ्या देशांत दंगे उसळून सरकारी किंवा सार्वजनिक इमारती जाळणें, आगगाड्यांचे रूळ उखडणें, तारा तोडणें, पोलीस ठाण्यावर हल्ला करणें, प्रसंगीं पोलिसांना व इतर अंमलदारांना ठार मारणें असल्या अत्याचारांना ऊत आला. हिंदुस्थान-सरकारनें पुढाऱ्यांना तुरुंगांत टाकण्याचें जें समर्थन केलें त्यांत कॉंग्रेस दंग्या ेाण्याच्या चळवळीची तयारी करीत होती, व तिला वेळींच पकडलें नसतें तर ही तयारी वाढली असती ' असा युक्तिवाद आहे. हा युक्तिवाद शिळा'च असून पुनः त्याची पोपटपंची केली जावी हें सरकारी बुद्धीच्या निकसपणाचें लक्षण ठरलें. पण कॉंग्रेस ही संस्था एकमुखी सत्तेची भक्त आहे, तिला देशांतील इतर पक्ष व हितसंबंध आपल्या वरचढपणाखालीं चिरडून टाकावयाचे आहेत, इत्यादि अवास्तव आरोप कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांवर लादून सरकारानें आपली बाजू कशी पोकळ आहे हें चांगलेंच उघडकीस आणलें. म. गांधींनीं सरकारी समर्थनाचें खंडन करतांना कॉंग्रेसच्या निःस्वार्थ धोरणाचे दाखले सरकारावर फेकले आहेत व जनतेची खात्री पटण्याला ते पुरेसे आहेत. म. गांधींनीं तुरुंगांतून सरकारशीं केलेला पत्रव्यवहार सरकारी दप्तराच्या अंधेरांत बराच काळ पडून राहिला. यांतलें एक पत्र जर तावडतोब प्रसिद्ध झालें असतें तर कॉंग्रेसच्या नांवानें जो जाळपोळ, लुटालूट, रक्तपात यांचा धुमाकूळ माजला होता, त्याला गांधींची मान्यता नसल्याचें लोकांना समजून त्यावर दाब पडण्याचा संभव होता. तें पत्र म. गांधींनीं फेब्रुवारी १९४३ मध्यें २१ दिवसांचें उपोषण आरंभलें तेव्हां लोकांपुढें आलें व त्यावेळींच श्री. राजगोपालाचारींनीं ' तें पत्र अप्रसिद्धींत टाकून लोकांच्या अत्याचारांना आळा घालण्याची संधी सरकारनें दवडली ' असा ठपका सरकारला एका पत्रकाच्या द्वारें दिल्याचें पुष्कळांच्या आठवणींत असेल. म. गांधींनीं लोकांच्या अत्याचारांचा दोष सरकारच्या माथीं रोवला असून ' पुढाऱ्यांना एकदम पकडल्यानें लोक भडकले, माणुसकी विसरले, सरकारच्या हिंसात्मक उपायांनीं ते जास्तच बिथरले व त्यांच्या हातून हिंसेचीं कृत्यें घडलीं ' अशी आपली धारणा नमूद केली आहे.

## महात्माजींचे सहकारी व जनता

म. गांधी हिंसेला प्राण गेला तरी उत्तेजन देणार नाहींत, ही गोष्ट कुणालाहि समजणारी होती; परंतु त्यांचे सहकारी स्वातंत्र्यसाधनाच्या ईर्ष्येनें मुंबईचा ठराव होण्यापूर्वी आपल्या भाषणांतून जीं विधानें करीत होते, तीं लोकांना अहिंसेच्या मर्यादेंत राखणारीं नव्हतीं. एका सहकाऱ्याचें अहमदाबादेस विद्यार्थ्यांसमोर भाषण झालें. त्यांत त्यानें तारा तोडणें, आगगाड्या उलथून पाडणें, पोस्टाच्या कामाला अडथळा करणें वगैरे कृत्यांना राजरोस प्रोत्साहन दिल्याचें वृत्त तेव्हांच प्रसिद्ध झालें होतें. मुंबईत कांहीं कॉंग्रेस पुढाऱ्यांचें वक्तृत्व इतकें स्पष्ट नसलें, तरी त्याच मासल्याचें होतें. म. गांधी प्रत्येक वेळीं अहिंसेची शपथ घेऊन व इतरांना घालून आपल्या भावी कार्याचें विवेचन करीत होते यांत बिलकुल संशय नाहीं व त्यांच्या अंगीं हिंसेचें पाप चिकटविणें हा बुद्धीचा आततायीपणाच म्हणावा लागेल. पण 'पुढें जें करण्याचें घाटत आहे तें उघड बंड आहे. तें निकालापर्यंत चालू ठेवावयाचें आहे. पुढारी तुरुंगांत कोंडले गेले कीं ज्याचा तो पुढारी. प्रत्येकानें आजच आपण स्वतंत्र झालों, अशा निश्चयानें वागायला सुरुवात करावी' अशा आशयाचा मजकूर 'हरिजन' साप्ताहिकांतून व मुलाखतींतून छापण्याचा धडाका चालला होता. सामान्य नागरिकांवर याचा परिणाम काय होत असेल, हें त्या दिवसांत घरोघर चालणाऱ्या चर्चेचें नीट स्मरण केल्यास ध्यानांत येणारें आहे. 'हें उघड बंड आहे, ज्याचा तो पुढारी, करा किंवा मरा' हीं वचनें ग्रहण करतांना लोक त्यांचें अहिंसेच्या शपथेंतून गाळून ग्रहण करीत नव्हते. म. गांधींना अहिंसेचें तत्त्व लोकांच्या हाडींमासीं पूर्णपणें मुरलें नसल्याचें माहीत असूनहि जेव्हां त्यांनीं 'अहिंसा लोकांच्या अंगीं बाणली नसली, तरी गेल्या २० वर्षांत आम्हीं जी पुण्याई कमावली आहे तिच्या जोरावर चळवळ केली जाईल. कदाचित् दंगेधोपे होतील, पण बिनहत्यारी लोकांच्या दंग्यामुळें हत्यारबंदीच्या दंग्याइतकी हिंसा होणार नाहीं,' वगैरे अर्थाचे शब्द उच्चारले व प्रसिद्ध केले, तेव्हां सामान्य माणसाला शेंकडा शंभर टक्के अहिंसा नसली, तरी म. गांधींना तें पतकरेल असें वाटलें असल्यास आश्चर्य नाहीं. गांधींनीं बंडाळीचा हेतु पुकारला त्या

दिवसांत जपान हिंदुस्थानावर स्वारी करील असें भय सर्वत्र पसरलें होतें. इंग्रजांची सत्ता घालवायची व जपानशीं लढायचें असें म. गांधींचे दोन उद्देश एकत्र बोलले जात होते; परंतु म. गांधी जपानला अनुकूल आहेत असा लोकांत समज पसरल्याची गोष्ट पं. नेहरूंनीं त्यांना सांगितल्याचें त्यांनींच एका लेखांत नमूद केलें आहे. म. गांधींच्या एका मुलाखतीच्या वर्णनांत वृत्तपत्राच्या बातमीदारानें म. गांधींच्या तोंडीं त्यांनीं न उच्चारलेले शब्द घातले व एकदोन विधानें पदरचीं जोडलीं; आणि त्या वर्णनानें सरकाराची दिशाभूल झाली, असा प्रकार म. गांधींनीं सरकारी आरोपांना सविस्तर तपशीलवार उत्तर देतांना उघडकीस आणला आहे. हीं दोन उदाहरणें लोकांत बातम्या सोयीच्या विपर्यासानें कशा फैलावतात, हें ध्यानांत येण्यासाठीं घेतलेलीं आहेत. यांच्याबरोबर 'हरिजन'मध्यें ९ ऑगस्ट १९४२ रोजीं प्रसिद्ध झालेला महादेवभाई देसाईंचा व त्यानंतर बऱ्याच उशीरा श्री. मश्रूवाला यांचा असे दोन लेख व आंध्र काँग्रेस कमिटीचें पत्रक, वगैरे साहित्य पाहिल्यास लोकांनीं केलेल्या दंग्याधोप्यांमागील गैरसमज कसे उद्‌भवले असतील याविषयीं तर्क करतां येतो. श्री. मश्रूवाला हे महात्माजींचे अत्यंत निकटवर्ती मित्र व सहकारी असूनहि त्यांची गांधीजींजवळ चालणाऱ्या चर्चेनें फसगत झाली, तर वृत्तपत्रांतून प्रसिद्ध होणाऱ्या बातम्या फारशा कांटेकोरपणानें न वाचणाऱ्या व गोळाबेरजेनें आपल्या आवडीला धक्का न लागूं देतां ऐकणाऱ्या सामान्य माणसानें म. गांधींच्या हेतूविपर्यी भलताच ग्रह करून घ्यावा यांत आश्चर्य कसलें ? यापूर्वी (१९४०) युद्धाच्या परिस्थितींत अहिंसेला रजा देण्याचा एक ठराव काँग्रेसच्या सूत्रधार मंडळींनीं पास केल्याचें ध्यानांत ठेवल्यास या विषयावर आणखी प्रकाश पडण्याला हरकत नाहीं. तो ठराव म. गांधींना मुळींच पसंत नव्हता. श्री. राजाजींच्या युक्तिवादानें त्या ठरावाकडे काँग्रेसच्या सूत्रधारांचें बहुमत ओढलेलें होतें. स्वराज्यासाठीं अहिंसा व परचक्रासाठीं हिंसा असा या ठरावाचा दुटप्पी भावार्थ होता. फ्रान्सच्या पाडावानें हा परिणाम घडवून आणलेला होता. अहिंसाहिंसेच्या मिश्रणांतील या दोन तत्त्वांना एकमेकांपासून विलग ठेवणारी सूक्ष्म भेदरेषा सामान्य जनतेच्या स्थूल दृष्टीला उमगणारी नव्हती.

## जपानी चढाईची धग

जपानच्या विद्युत्गति विजयानें हिंदी जनतेची व पुढाऱ्याची मनःस्थिति अतिशय गढूळ करून सोडली. १९४१ च्या डिसेंबर ७ रोजीं लढाईत शिरलेला जपान हजारों मैलांचा मुलुख जिंकून अवघ्या चार महिन्यांच्या अवधींत हिंदुस्थानाच्या उंबरठ्यांत उभा राहतो, या चमत्कारिक योगायोगानें जपानची युद्धसामग्री व मर्दुमकी याबद्दल हिंदुस्थानांत अनुकूलतेचें वारें वाहूं लागलें. सिंगापुरास ब्रिटिश, ऑस्ट्रियन व हिंदी असें बहुजिनसी लष्कर एका झटक्यास नादार झालें. सिंगापुरापासून ब्रह्मदेशापर्यंत आणखी पुष्कळसें सैन्य गमावलें असलेंच पाहिजे. आतां जपानी लष्करांना हिंदी सरहद्दीवर अडवून धरण्याचें सामर्थ्य इंग्रजांपाशीं उरलेलें नाहीं. मग एप्रिलांत जपानची मोहीम ब्रह्मदेशांतच कां थांबली, या प्रश्नाचें 'फौजांची पुनर्घटना व पिछाडीहून रसद पोचण्याची निर्विघ्न व्यवस्था करण्यांत जपान गुंतलेलें आहे' असें उत्तर तर्कानें काढलें जात होतें व तें अंशतः खरेंहि होतें. शिवाय त्याच्यामागील सगळा मुलुख निर्विघ्न झालेला नव्हता, तरी ता. ६ एप्रिल १९४२ रोजीं जपानच्या विमानांनीं विजगापट्टण, कोकोनाडा या समुद्रकिनाऱ्याच्या शहरांवर हल्ला केला. आतां जपानच्या ताकदीबद्दल लोकांना शंकाच उरली नाहीं. या हल्ल्यांत जपानी विमानदळाला सर्वथैव सुरक्षितपणें परत जातां आलें नाहीं अशी उत्साहजनक माहिती पुरविण्यांत आली असली, तरी तिच्यावर विश्वास न ठेवतां लोकांनीं घबराट वाढविणाऱ्या कल्पनांचा एकमेकांत भरपेट बटवडा चालविला होता. प्रतिपक्षांच्या मुलुखांत विमानहल्ल्यांनीं गोंधळ माजवून त्यांची लढाईची तयारी ढिली करावयाची, असा एक डाव दुसऱ्या महायुद्धानें उदयास आणला होता. जपाननें ज्या दिवशीं लढाई सुरू केली, त्याच दिवशीं टोकियोच्या रेडियोवरून हिंदी जनतेला 'मुंबईवर विमानांचा हल्ला अमक्या तारखेस होणार आहे, तेव्हां नागरिकांनीं शहर सोडून लांब जावें' अशा मतलबाचा इशारा देण्यांत आला होता. पण रेडियोतून देशोदेशीं फेकले जाणारे शब्द म्हणजे प्रत्यक्ष विमानें नसल्यामुळें त्या शब्दांच्या खरेपणाचा अनुभव पूर्वेकडील दोन बंदरांना फक्त सबंध लढाईत एकदांच आला व तोहि सौम्य स्वरूपाचा होता. जपानच्या अंतिम विजयाबद्दल शंका नसणारांना

त्या अनुभवानें समाधान झाल्याचीं प्रमाणें प्रत्येकाला तत्कालीन परिस्थितीच्या स्मरणांत पहायला सांपडतील. पूर्वेकडील मद्राससारखीं शहरें रिकामीं व्हावीं अशी सरकारतर्फे सूचना मिळाल्यावर लोकांच्या अस्वास्थ्याला सुमारच उरला नाहीं. मुंबई शहराच्या वस्तीलाहि जोराची गळती लागली. उन्हाळ्याच्या तीन महिन्यांत सुमारें ४ लाख लोकांनीं मुंबई शहरांतून पळ काढला, अशी तेव्हांची अटकळ होती. महाराष्ट्राचे धनिक आपल्या जडजवाहिराची व्यवस्था कशी, कुठें करावी याविषयीं ज्या सल्लामसलती एकमेकांना देत असत त्या मासलेवाईक होत्या. आपले जिन्नस विभागून वेगवेगळ्या संस्थानांतून ठेवावे, ह्या योगानें ते जपानपासून बचावतील; जपानचा संस्थानांवर डोळा नाहीं, ब्रिटिश हिंदुस्थानावर आहे, कारण ह्यांचें ब्रिटिशांशीं वांकडें आहे; असा या व्यवस्थेचा भाबडा खुलासा केला जात होता.

### म. गांधींच्या विचार-लहरी

हिंदुस्थानांतील ब्रिटिशांच्या सत्तेचें आमिष नाहींसें झालें कीं जपानला हिंदुस्थानवर स्वारी करण्याला कांहीं कारणच रहात नाहीं, अशी एक समजूत म. गांधींच्या तत्कालीन लेखांतून आलेली आहे. त्या कल्पनेच्या वर्गांतलाच हा धनिकांचा खुलासा गणावा लागतो. मुंबईला जपानच्या बागुलबोवाची धडकी सिंगापुर पडल्यापासूनच भरली होती. नंतरच्या काळांत ती धडकी खूपच फुगली. हिंदुस्थानचा बचाव इंग्लंडला करतां येणार नाहीं; म्हणून इंग्लंडनें हिंदी राज्यसूत्रें लोकांच्या हवालीं करावीं; तसें केल्यास लोक आपखुषीनें इंग्लंड अमेरिकेला हजारपट जास्त मदत करतील, असे विचार लोकांना व सरकारला म. गांधी सांगत होते. या धोरणाचा ठराव त्यांनीं कॉं. कार्यकारिणीकडे रवाना केला असतां तो जपानला अनुकूल आहे असा पं. जवाहरलाल नेहरूंचा ग्रह झाला. या प्रकरणाचें साहित्य चाळीत असतां म. गांधी आपल्या मनोगतामध्यें वेळोवेळीं फेरबदल करीत असल्याचें दिसून आल्याशिवाय रहात नाहीं. युद्ध हा हिंसाचार म्हणून त्यांना मुळांतच नको होता; तथापि इंग्लंडला आपला पाठिंबा आहे असें जाहीर केल्यावर तो केवळ 'नैतिक' स्वरूपाचा, अशी त्याबद्दल सुधारणा केली. लढाईच्या कामांत इंग्रज-अमेरिकनांची गैरसोय अथवा अडवणूक करावयाची नाहीं, हा मुद्दा

या 'नैतिकां'तच सामावलेला होता. पुढें ब्रिटिश व अमेरिकन हे दोघेहि या नैतिक पाठबळाला पात्र नाहींत असें त्यांनीं ठरविलें. ब्रिटिशांनीं हिंदी राज्यकर्तृत्व सोडलें तरी त्यांच्या फौजा नव्या हिंदी स्वराज्य-सरकाराच्या परवानगीनें राहतील व जपानशीं लढतील; हिंदी फौजा बरखास्त केल्या जातील, या विधानाचा अर्थ आजच्या ब्रिटिशनिष्ठेच्या हिंदी फौजा बरखास्त केल्या जातील, वगैरे असल्याचें म. गांधींनीं तुरुंगांतून सरकारी आक्षेपांना पाठविलेल्या उत्तरांत स्पष्ट केला आहे. एकदां त्यांनीं हिंदी शिपायाला 'भाडोत्री' म्हटलें, नंतर त्यांनीं 'धंदेवाईक' या शब्दानें त्याची संभावना केली ! म. गांधींच्या अहिंसेला लष्कराचें शल्य वाटत असल्यानें त्यांच्या पूर्ण अहिंसामय मनोराज्यांत लष्कराला जागा नव्हती व त्याच धारणेस अनुसरून त्यांनीं हिंदी फौजा बरखास्त करण्याची भाषा वापरली असण्याचा संभव आहे. स्वराज्य आणि जपानच्या स्वारीचें संकट यांचा मेळ कसा घालावयाचा, यांविषयीं त्यांचे विचार स्वराज्याच्या मागणीइतके निश्चित नव्हते. इंग्रजांची सत्ता गेल्यावर जपानच्या हिंदी स्वारीमधील ब्रिटिशांच्या द्वेषाचा दंश मोडेल व मग आपल्याला जपानशीं तहाचें बोलणें करतां येईल. तसें न साधल्यास जपानच्या आक्रमणाला संपूर्ण असहकाराच्या अहिंसात्मक उपयांनीं जेरीस आणावयाचें, असा उपदेश त्यांनीं चालविला होता. इंग्लंडवर जर्मनीची स्वारी होईल अशीं चिह्नें दिसत असतां त्यांनीं ब्रिटिशांना असाच उपदेश केला असून तो प्रस्तुत संदर्भांत पाहण्याजोगा आहे. इंग्रजाचा लढाईत पराजय होईल का, असें कोणी विचारल्यास 'पराभव होणार नाहीं किंवा विजय होईल' यापैकीं कोणतेंच निश्चयाचें उत्तर देण्याऐवजीं 'इंग्रज फार टणक आहे, चिवट आहे. तो मारायला फार कठिण आहे; त्याचा पराजय व्हावा असें मी इच्छीत नाहीं; पण त्याला विजय मिळायला नको असें मला वाटतें,' वगैरे अर्थाचा जबाब म. गांधी पृच्छकाला देत होते. परंतु जपानच्या आक्रमणाचा त्यांना इंग्रजी वर्चस्वाइतकाच तिटकारा होता, याबद्दल मात्र संशयाला त्यांच्या लेखांतून वा मुलाखतींतून जागा सांपडायची नाहीं. 'इंग्रजी वर्चस्व झुगारून देण्याच्या शिक्षणांतच जपानी आक्रमण निष्फळ करून सोडण्याचें सामर्थ्य आहे' अशा दाव्याच्या आवेशानें ते स्वराज्याच्या मागणीचा पुरस्कार करीत होते. हिंदी स्वराज्य पश्चिमेस रशियाला व पूर्वेस चीनला पराजयच्या

आपत्तींतून सोडवील' असाहि त्यांचा विश्वास होता. या साऱ्या विचारसरणींचा परिणाम ना. ८ ऑगस्ट १९४२ चा ठराव होय.

हिंदी राजकीय वातावरणाची आंच इंग्रजांच्या एकान्तिक विरोधानें म. गांधी व काँग्रेसचे पुढारी—विशेषतः म. गांधी—जों जों वाढवीत गेले, तों तों जपान-जर्मनींतल्या रेडियोंतून आनंदाच्या उकळ्या फुटूं लागल्या. ब्रिटिशांच्या राज्यकारभाराची नालस्ती त्या देशांतील रेडियोचे वक्ते जोरानें करूं लागले. आपला उद्देश हिंदुस्थानाला इंग्रजी प्रभुत्वाच्या मगर-मिठींतून सोडवून स्वराज्याचें स्वर्गसुख द्यावयाचा आहे, हें स्वर्गसुख लवकर मिळवावयाचें असेल तर इंग्रजांची सर्वत्र अडवणूक केली पाहिजे; म. गांधी व कांग्रेसचे पुढारी जें करीत आहेत, तेंच उत्तम असून त्याला सर्व प्रकारें टेकू देण्यांतच हिंदी जनतेचें कल्याण आहे, असा पोक्त सल्ला जर्मनी-जपानकडून रोजच्या रोज रेडियोमार्फत हिंदी जनतेच्या कानावर घातला जात होता. त्याला सुभाषबाबूंच्या नांवाचा दुजोरा मिळाला. हिंदुस्थानांत याचें प्रायः सर्वत्र तत्परतेनें व विश्वासानें श्रवण होत असे. इंग्रजांच्या बातम्या सपसेल खोट्या व जर्मनी-जपानच्या बातम्या अक्षरशः खऱ्या, असें मानण्याची हिंदी चित्ताला पक्की संवयच झालेली होती. काँग्रेसचे पुढारी ऑगस्ट ८, १९४२ च्या ठरावानंतर तुरुंगांत पडले त्यावेळीं झालेल्या दंग्याचा रोख इंग्रजांविरुद्ध होता. जपानशीं लढण्याची ती रंगीत तालीम नव्हती. ऑगस्टपासून तीन चार महिने लोकांची हुल्लड मोठ्या प्रमाणांत चालू होती. नंतर तिला किरकोळ स्थानिक स्वरूप प्राप्त झालें. तेव्हांच्या सरकारी दडपशाहीचा अंदाज पुढील आंकड्यांनीं होईलः— ६०२२९ लोक गिरफदार केले. हिंदरक्षणाच्या कायद्याप्रमाणें अटकेंत टाकले १८०००; गोळीबारांत ९४० जण मेले आणि १६३० जखमी झाले. एकूण ६० ठिकाणीं लष्कर बोलवावें लागलें. ५३८ वेळां पोलिसांनीं गोळीबार केला. विमानांतून पांच ठिकाणीं मशीनगन्सचा मारा लोकांवर करण्यांत आला. (हे आंकडे ९ ऑगस्ट ते ३१ डिसेंबर १९४२ पर्यंतचे आहेत.) लोकांच्या चळवळीचा वृत्तान्त पुढीलप्रमाणें आहे:— ५०० रेल्वे स्टेशनांचा नाश. ५०० पोस्ट ऑफिसांवर हल्ला; त्यांतील ५० जाळून टाकलीं. संयुक्त प्रांताच्या पूर्व भागांतील व बिहारांतील रेल्वेची वाहतुक एकफळ दिवस नीट चालू

नव्हती. दळणवळणाच्या इतर साधनातहि देशभर अडथळा उत्पन्न झाला होता. १५० पोलीस ठाणीं व दुसऱ्या सरकारी इमारती यांवर हल्ले झाले. थोडेसे अधिकारी, कांहीं गोरे शिपाई व ३० पोलीस शिपाई ठार झाले. समुदायाच्या मानसाचा अभ्यास करण्यासारखा तो प्रसंग होता. अर्थात् त्यामध्यें शेंकडा ७५ टक्के अचरटपणाचे प्रकार असतील हें सांगायला नको. ज्याच्या मनाला जें सुचेल तें त्यानें करावें, असा अराजकाचा देखावा कुठें कुठें उत्पन्न झालेला होता. ब्रिटिश राज्यकर्ते थोडेसे सतावले गेले असतील पण हिंदी जनता त्यांच्याहून कितीतरी पटीनें जास्त सतावली जात होती. मोठाल्या शहरांतून गुण्डांचे तांडे हिंदु-मुसलमानांच्या दंग्यांतून निपजत होतेच. आतां त्यांना आपले अत्याचार घटवायला उत्तम संधि मिळाली. राज्यकर्त्यांनीं लष्करी बळानें या हुल्लडीचा बंदोबस्त केला. क्वचित् देशभक्तीच्या नांवावर चाललेल्या गुंडगिरीला पूर्णपणें आळा घालणें राज्यकर्त्यांना शक्य झालें नाहीं; एकंदर देशाच्या मानानें क्षुल्लक ठरणारे असे कांहीं अपवाद वगळल्यास लोकांचे व्यवहार लवकर सर्वत्र सुरळित चालू झाले. ब्रिटिशांचें राज्य संपुष्टांत आलें नाहीं व जपानचेंहि आक्रमण झालें नाहीं. सरकारला कॉंग्रेसचे पुढारी कैदेंत टाकले म्हणूनच पैशांचा व माणसांचा तुटवडा मुळींच भासला नाहीं. जर्मनी-जपानच्या पराक्रमाचा भपका हिंदी वृत्तपत्रांतून मात्र शेवटपर्यंत दिसत होता. त्या काळांतल्या लोकप्रिय हिंदी वृत्तपत्रांतील युद्धविषयक समालोचनें पाहिल्यास याबद्दल खात्री पटेल. हिंदी वृत्तपत्रांना कधीं ब्रिटन, अमेरिका अथवा रशिया यांचा जय दिसलाच नाहीं.

## हिंदी व्यापारी व काळा बाजार

युद्धाचीं पहिलीं तीन वर्षें अन्नवस्त्राच्या दृष्टीनें लोकांना फारशीं जाचलीं नाहींत. १९४२ पासून धान्याची टंचाई उत्पन्न होऊन सरकारनें धान्य-वांटपाची पद्धति अमलांत आणली. पुढें वस्त्रांचें नियंत्रण अस्तित्वांत आलें. क्रमानें बहुतेक साऱ्या जीवनोपयोगी वस्तूंचें सरकारी नियंत्रण सुरू झालें. १९४३ मध्यें बंगालमध्यें अन्नाच्या भयंकर दुष्काळानें जवळजवळ पसतीस लाख माणसांची रवानगी यमलोकीं झाली. बंगालच्या मंत्रिमंडळाच्या नालायकीची ही साक्ष होती. पण तें मंत्रिमंडळ सुरक्षित राहिलें. व्हाइसरॉय

लिनालिथगो यांनींहि दिल्लीचें निवासस्थान सोडलें नाहीं. वेव्हेलसाहेबांनीं नंतर व्हाइसरॉय या नात्यानें लष्करी मदत पुरवून दुष्काळग्रस्तांना सक्रिय सहानुभूति दाखविली, तेवढीच काय ती विचारांत घेण्याजोगी होती. सरकारी नियंत्रणामुळें काळा बाजार असा बोकाळला कीं त्याला कुठें मर्यादाच दाखवितां येणार नाहीं. केवळ बड्या लाखोपतींनींच काळ्या बाजारांचा खेळ मांडला असें नसून मध्यम स्थितींतल्या सुशिक्षितांनाहि आपापल्या परीनें काळ्या बाजाराचा लोभ बाधला, हें हिंदी जनतेच्या एकंदर मानसिक अधोगतीचें प्रमाण आहे. सरकारी दुकानांतला जिन्नस विकत घेऊन तो आपल्या उपयोगाचा नसल्यास किंवा दुसऱ्याची गरज जास्त असल्याचें आढळल्यास गरजूला तो जास्त किमतीनें विकण्याची शरम मध्यम वर्गाच्या इसमांना वाटेनाशी झाली. नियंत्रणाच्या अंमलांत लांचलुचपतीच्या प्रयोगाशिवाय काळा बाजार चालणें शक्य नसल्यानें तो प्रयोग सर्रहा वरपासून खालपर्यंत होत रहावा हें सरळच म्हणावें लागतें. या प्रकाराला स्वदेशाभिमान म्हणावयाचें कीं त्याचा अधमपणा सिद्ध होण्यासाठीं दुसरें नांव द्यावयाचें हें वाचकांनींच ठरवावें. हिंदुस्थानांतला व्यापारी-वर्ग हा इंग्रजी राज्यांत बिघडला, पूर्वी तो देशबांधवांचा कैवारी होता, असें इतिहासावरून दिसत नाहीं. शेवटच्या बाजीरावाच्या कारकीर्दींत पुणेंप्रांतीं दुष्काळानें माणसें अन्नाला महाग होऊन मरत आहेत, असें पाहून त्यांच्या मदतीसाठीं मुंबईहून इंग्रजांनीं धान्य पाठविण्यास सुरुवात केली. तें धान्य कबजांत येतांच पुण्याचे अधिकारी आणि व्यापारी यांनीं आपसांत संगनमत करून अन्नार्थी गरीब प्रजेला लुबाडण्याची पर्वणी साधली. इंग्रजांनीं याविषयीं आश्चर्य व्यक्त केलें. तो प्रसंग उलटवून आतां इंग्रजी कारभारांत 'काळा बाजार' कां उत्पन्न व्हावा, या झोंकाचा सवाल एका बड्या महाराष्ट्रीयानें विचारला होता. आजसुद्धां काळाबाजार हिंदी अधिकारी आणि व्यापारी यांच्याच मेथकुटानें चालला आहे, इकडे त्या सवालकाराचें लक्ष गेलें असतें तर त्याला अप्रत्यक्षपणेंहि काळ्या बाजाराचें मंडन करतां आलें नसतें. महायुद्धामध्यें हिंदी राज्य कारभार देशी अधिकारीच फार मोठ्या प्रमाणामध्यें करीत होते, हें विसरून काळ्या बाजाराची छाननी करणें योग्य होणार नाहीं. कॉंग्रेसच्या नांवानें देणग्या काढायच्या व लष्करी कंत्राटानें आपलें उखळ पांढरें करावयाचें हें

काळ्या बाजारवाल्यांची तऱ्हा आतां जनतेला अगम्य राहिलेली नाहीं. द्रव्यार्जनाच्या उपास्यापुढें बहुसंख्य दरिद्री स्वजनांचा बळी द्यावा लागला तरी हरकत नाहीं, इतक्या खालच्या पातळीवर हिंदी व्यापारी-कारखानदारांचा द्रव्यलोभ आलेला आहे.

## भेकडपणाचा दुर्गुण

कमालीचा भेकडपणा या आणखी एका हिंदी—विशेषतः हिंदु स्वभावदोषाचा निर्देश सन १९४२च्या प्रारंभींच्या हालहवालींत झालेला आहे. कलकत्ता, मद्रास हीं शहरें जपानी विमानांच्या टप्प्यांतील असल्यानें तेथील रहिवाशांनीं पळ काढला याची थोडी तरी तरफदारी करतां येईल. पण मुंबईच्या लोकांनीं पळावें, याचें भेकडपणाशिवाय कांहींच कारण दाखवितां येत नाहीं. लोकांचें भय वाढावेणें हा शिकल्यासवरल्यांचासुद्धां एक धंदाच झाला होता. बॉंबच्या माऱ्याखालीं मरण येऊं नये, याकरितां जो तो धडपडत होता. युद्धाच्या प्रदेशांतून विमानांच्या हल्ल्याखालीं मोठालीं शहरें अंशाअंशांनीं जमीनदोस्त होत असल्याचीं वर्तमानें वाचीत व ऐकत असता त्या शहराचीं रोजचीं कामें बंद पडलेलीं नाहींत; विमानांच्या माऱ्यांतहि जगणारांची संख्या मरणाराच्या मानानें अति प्रचंड असते, याचें भान हिंदी बहुसंख्य सज्ञानांनीं कधींच ठेवलें नव्हतें. त्यांना मरणाचा परिचय नव्हता असें नाहीं. देवी, महामारी, प्लेग, इन्फ्लुएंझा, विषमज्वर, दुष्काळ, भूकंप, वादळ, विद्युत्पात, महापूर, आपसांतले दंगे, हीं मृत्यूचीं कारणें हिंदी जनतेच्या परिचयाचीं आहेत; इतकीं कीं त्यांच्या बाबतींत 'अतिपरिचयात् अवज्ञा' या सूक्तार्थाचा अनुभव येतो; पण विमानांतल्या बॉंबखालचें मरण कधींच पाहण्याची पाळी आलेली नसल्यानें त्याचें विलक्षण भय येथील जनतेनें निदर्शनास आणलें. मुंबईतून चार लाखांइतके लोक बाहेर गेल्यानें मुंबई ओस पडली नाहीं. सर्वांनाच मुंबई सोडणें शक्य नव्हतें, व ज्यांनीं सोडली तेच परत आले असें नव्हे, तर दहा लाखापर्यंत नव्या लोकांचा लोंढा मुंबईत पोटानिमित्त शिरला व कायमचा स्थिरावलाहि. १९४४च्या एप्रिलच्या १४ तारखेला मुंबईच्या बंदरांत एका बोटींतील दारूगोळ्याचा स्फोट होऊन फार मोठी प्राणहानि आणि वित्तहानि झाली. त्या दिवशीं व पुढील कांहीं

दिवशीं मुंबईतून हातीं लागेल तेवढ्या सामानासह हजारों गोरगरिबांची जी यात्रा नाशिक-पुण्याच्या रस्त्यावरून वाहत होती, तिचें दर्शन जसें करुणाजनक तसेंच राष्ट्रीय चारित्र्याच्या दृष्टीनें विचार करण्यालायक होतें. वकील, डॉक्टर, शिक्षक वगैरे शिक्षितांनीं स्फोटाचा भीषण गडगडाट कानीं पडतांच 'जपानचा हल्ला' अशी त्यासंबंधीं कल्पना करून घेतली व मागाहून घडलेल्या नुकसानींचीं अक्राळ-विक्राळ अशीं शाब्दिक चित्रें एकमेकांसमोर 'चक्षुर्वै सत्यं' या अधिकारानें रेखाटलीं जाऊं लागलीं. बुद्धि ठिकाणावर ठेवून भीतिग्रस्तांचें काळीज सांवरून धरण्याचा यत्न केला जात नव्हता, असा निष्कर्ष येथें निवेदन केल्यास चूक होणार नाहीं. जो कोणी असा प्रयत्न करील तो वेडा, असा ग्रह त्याच्याबद्दल बहुधा करून घेतला जात असे. बुद्धिजीवी पांढरपेशांची ही अवस्था अत्यंत शोचनीय ठरणारी आहे.

द्रव्यलोभ हिंदी प्रकृतीमध्यें प्राचीन काळापासून दिसला तरी भेकडपणा शंभर वर्षांमागें स्वराज्यकाळीं आजच्यासारखा व आजच्याइतका नव्हता, हें खचित. जेव्हां रस्ते नव्हते, पूल नव्हते, दर दिवशीं लुटारूंशीं व जंगली जनावरांशीं गांठ पडत होती, तेव्हां भेकडपणानें जगणेंहि शक्य नव्हतें. यामुळें तेव्हांचीं माणसें—स्त्रिया व पुरुष दोन्ही—ज्या निर्भयपणानें आपला व्यवहार करीत होतीं, त्या निर्भयपणाला इंग्रजी राजवटींत बुद्धिजीवी पांढरपेशा वर्ग अतिशय अंतरला. त्याला शहराच्या बंदोबस्तांत सुखानें पोलिसांच्या भरंवशावर निर्धास्त जगण्याची गेल्या तीनचार पिढ्या सवय लागलेली आहे. या संवयीपायीं मरणाच्या भीतीनं त्याच्या काळजांत एमसेस बिऱ्हाड थाटलें. परिणामीं जरासें खुट्ट झालें कीं चटकन् थरथरण्याइतकें त्याचें काळीज अशक्त बनलें. स्वावलंबनाचा मानसिक कणखरपणा शिकायची व्यवहारांत सवड राहिली नाहीं; त्यांत पुनः इंग्रजांनीं त्याच्या दृष्टीस हत्यार पडणार नाहीं, मग तें हातांत वागविण्याची गोष्ट तर लांबच, अशी व्यवस्था करून त्याला शेणामेणाचा करून सोडलें. स्वराज्यांत—मग त्या स्वराज्याचें स्वरूप कितीहि अंदाधुंदीचें असो—प्रत्येक बारीकसारीक हालचाल स्वतःच्या विश्वासानें व बळानें करावी लागत होती. यामुळें हरघडीस मरणाचें भय बाळगून चालणारें नव्हतें. थोरल्या माधवरावांच्या अव्वल कारकीर्दींत निजामी लष्कराची धाड पुण्यावर आली असतां गोपिकाबाईनें

पुणें न सोडण्याचा हट्ट धरला हें उदाहरण तेव्हांच्या स्त्रियांची निर्भय मनोवृत्ति सिद्ध करण्याला पुरेसें आहे. तेव्हां स्वराज्याच्या रक्षणाचें आणि विस्ताराचें कर्तृत्व माणसाच्या अंतरंगांतून मरणाच्या भीतीला हद्दपार करीत होतें.

## स्वराज्याला निर्भयता अवश्य

पण आतां स्वराज्यप्राप्तीचें कर्तृत्व तितकेंच, किंबहुना, त्याहून अधिक महत्त्वाचें असूनहि स्वराज्यवादी शिक्षित समाज भेकड आढळतो, याचें मूळ राजकीय पारतंत्र्यांत आहे. कारण कितीहि बलवत्तर असलें तरी ज्वलज्जहाल स्वराज्यवादाला तें शोभणारें नाहीं. ' इंग्रजी राजवटीचें तळपट झालें पाहिजे, स्वराज्याशिवाय घडगत नाहीं,' या निकराच्या सिद्धान्तावर पोंचल्याप्रमाणें रोज घरींदारीं तोंडपिटी करणारांनीं निर्भयतेच्या गुणाकडे सदैव डोळेझांक करावी, हा हिंदी स्वभावाचा विशेष चमत्कार दिसतो. याचें कारण स्वराज्य आपल्या हयातींत होणार नाहीं अशी भावना, हें होय. शिकलेलीं माणसें जपानी स्वारीकडे मोठ्या आशेनें डोळे लावून बसलीं होतीं ! असें कां म्हणून विचारलें व एकाद्यानें प्रामाणिकपणें उत्तर दिलें तर " स्वराज्य कसलें घेऊन बसलां आहां ? आजवर इंग्रजांची गुलामगिरी केली, यापुढें जपानची करूं; गुलामगिरीचा स्वाद तर बदलेल !" अशा भावार्थाचें तात्पर्य त्यांच्या उत्तरांत बिनचूक सांपडलें असतें. इंग्रजांविषयीं तिटकारा दाखविण्यापुरताच ज्यांचा इतरांनीं चालविलेल्या स्वराज्यप्राप्तीच्या उद्योगाबद्दल प्रेमा होता, त्यांच्या हृदयांत वरच्यासारखीं मतांचीं संतानें वाढावीं हेंच स्वाभाविक आहे. पेशव्यांचें राज्य, मोगलांचें राज्य, हैदराचें राज्य हीं जशीं एकाद्या वंशाचीं किंवा व्यक्तीचीं राज्यें, त्यांतलेंच इंग्रजांचें राज्य, या भावनेचा प्रभाव शिक्षितांच्या स्वराज्यवादांत दिसून येईल. उद्यां स्वराज्य झाल्यास तें कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांचें स्वराज्य असेल, त्याच्यांत तुमच्या आमच्यासारख्या सामान्य माणसांचा हात कितीसा राहणार, या प्रश्नानें स्वराज्य म्हणजे आपल्यांतल्या महत्त्वाकांक्षी कर्तबगारांची गुलामगिरी, अशी समजूत पुष्कळजण उघडकीस आणीत होते. स्वराज्य हा राजकीय पारतंत्र्याचा स्वदेशी प्रकार असें मानणारांना इंग्रज, जपानी व कॉंग्रेसवाले हे सारखेच वाटावेत आणि कॉंग्रेसवाल्यांना स्वराज्य मिळणार नाहीं, इंग्रज तर येथें क्षणभरहि राहायला नको, या पेंचांतून सुटण्याकरितां त्यांनीं जपानच्या

आक्रमणाच्या शक्यतेचें चिंतन स्वीकारलें होतें. जपानांची स्वारी गांधींच्या वाढदिवशीं सुरू होईल; पहिल्या आठवड्यांत बंगाल जिंकून नागपूर मार्गानें तिची दौड दुसऱ्या आठवड्यांत मुंबईस पोंचेल, असा गंभीरपणें इशारा देणारीं पत्रकें मुंबईत वाटलीं गेल्याचें पुष्कळांस आठवत असेल. कित्येकांनीं उद्यां जपानी राज्य झालें म्हणजे आपापल्या नोकरीची अडचण राहूं नये म्हणून मोठ्या दूरदर्शीपणानें जपानी भाषा शिकण्याला मनापासून आरंभ केला होता! शेतकरी बोलत, कीं कुणाचेंहि राज्य झालें तरी आमचे काबाड-कष्ट असेच कायम राहणार! कामगारहि त्यांचा तसाच अनुवाद करीत. कारकून-वर्गाच्या मनोदशेची माहिती सादर केलीच आहे. सारांश, देशव्यापी लोकजागृति झाली असतांहि हिंदी स्वराज्यवाद हा जाणत्या म्हणून ओळखल्या जाणारांच्या ठिकाणीं अगदीं वरवर बाणलेला होता व हेंच जाणत्यांच्या भेकडपणाचें एक कारण समजावें लागतें. एरवीं गुलामगिरीच्या जीवनाची इतकी अकृत्रिम आस्था खऱ्या कळकळीच्या कर्त्या स्वराज्यवादाला धरवलीच नसती. स्वराज्याच्या अभिमानाचे लोक कसे वागतात, याचे दाखले इंग्लंड, रशिया, जर्मनी या देशांच्या वर्तनांत युद्धकाळीं स्वच्छ दिसत असूनहि त्यांचें अनुकरण हिंदी स्वराज्यमूलक जागृतीला स्वयंस्फूर्तीनें करतां आलें नाहीं व वृत्तपत्रांनीं लोकांना तशी दिशा दाखविली नाहीं.

### म. गांधींची शिकवण

म. गांधी हा एकटाच पुरुष स्वराज्याला व स्वातंत्र्याला अवश्य असणाऱ्या गुणांनीं संपन्न असल्याचें दाखवितां येतें. त्यांच्या आधींच्या हिंदी राजकारणांत सर्वांगीण स्वावलंबनाच्या तत्त्वाचा फारसा—कदाचित् मुळींच—पगडा नव्हता. केवळ स्वदेशी मालापुरतेंच स्वावलंबनाचें स्तोत्र तेव्हां गाईलें जात असे. म. गांधींनीं स्वदेशींतील स्वावलंबनाची कल्पना जास्त व्यापक केली. इंग्लंड, अमेरिका वगैरे देशांतून आपल्या मताचा प्रसार झाला पाहिजे, त्यांची अनुकूलता संपादन केली पाहिजे, हे विचार व त्यासाठीं होणारा खर्च म. गांधींनीं बंद केला. 'राज्यकर्त्यांची नड ही आपली सवड' या कल्पनेलाहि त्यांनीं मूठ-माती दिली. राज्यकर्ता अडचणींत असता स्वार्थाची रोटी भाजून घ्यावयाची ही दुबळेपणाची रीत त्यांना मान्य नव्हती; राज्यकर्त्यांना आपण काय कर-णार आहों, याची अगोदर सूचना देऊन आपल्या कर्तव्याचा मार्ग चोखाळ—

त्याचा प्रघात म. गांधींनी निर्भय आत्मविश्वास वाढविण्याकरितांच उत्पन्न केला होता. भय व दास्य हीं एकाच स्थितीचीं पाठपोटासारखीं अंगें आहेत. भेकड व गुलाम हे एकमेकाचे पर्याय आहेत. म्हणून दास्यांतून सुटायचें असल्यास आधीं निर्भय व्हा, असा उपदेश ते जनतेला करीत होते. अर्थात् भेकडांच्या पळापळीला त्यांच्या विचारसरणींत थाराच नव्हता. जपानच्या आक्रमणाला सत्याग्रहाच्या असहकारानें प्रतिकार करावयाचा या कल्पनेंत प्रत्येकजण आपापल्या जागीं घट्ट उभा राहिला पाहिजे, या स्थितीचा अंतर्भाव आहे. चढाईसमोर पळायचें व चढाईनें पाठ सोडल्यास तिला शरण जाऊन वांचायचें, हा पाठ शतकानुशतकें गिरविणाऱ्या हिंदी जनतेला गुलामगिरीनें जगायचें हेंच ठाऊक असावें यांत नवल नाहीं. पराक्रमानें मरायचें हा म. गांधींचा सत्याग्रही मंत्र लोकांच्या अंतरंगांत रुजल्याचें प्रमाण युद्धकाळांत ठळकपणें दिसत नाहीं, याचें कारण गुलामगिरीचा खरा खरा तिटकारा बहुसंख्य समाजांत उत्पन्न झाला नव्हता हेंच होय.

म. गांधी तुरुंगांत गेल्यावर त्यांचा सरकारशीं सारखा पत्रव्यवहार सुरू होता. १९४३ च्या फेब्रुवारी १० तारखेपासून त्यांनीं उपोषण चालविलें तेव्हां त्या संबंधाचा व त्या पूर्वीचा त्यांचा पत्रव्यवहार सरकारनें प्रसिद्ध केला. याच वेळीं ' दंग्यांसंबंधीं कॉंग्रेसची जबाबदारी ' या नांवाचें एक चोपडेंहि सरकारमार्फत प्रसिध्द झालें. म. गांधींनीं हा उपवास आत्मशुद्ध्यर्थ आरंभला होता. एकदोन वेळां त्यांची प्रकृति चिंताजनक अवस्थेस पोंचली होती. ता. ३ मार्च रोजीं त्यांनीं उपोषण संपविलें. उपोषणाबाबत झालेला गांधी-सरकारचा पत्रव्यवहार दोन्ही पक्षांच्या मनोवृत्तीचें परीक्षण करायला उपयोगी आहे. उपोषणाची अशक्तता ओसरतांच म. गांधी त्या सरकारी चोपड्याच्या समाचाराकडे वळले. गांधीजींच्या जबाबावर ता. १४ मे ही तारीख असली तरी तो जबाब ता १५ जुलै रोजीं सरकारांत रवाना झाला. तो पोंचल्याचें सरकारी उत्तर २० सप्टेंबरचें आहे. नंतर ऑक्टोबरांत आणखी उभयतांत पत्रापत्री झडली. याच दिवसांत कस्तुरबा गांधी यांचा आजार विकोपास जाऊं लागला. म. गांधींच्या उपोषण-काळांत त्यांच्या प्रकृतीचा बिघाड डॉक्टरांच्या लक्षांत आला. औषधोपचार चालू होते, पण प्रकृति सुधारली नाहीं. अखेरीस १९४४च्या फेब्रुवारी ता. २२ रोजीं कस्तुरबांचें

देहावसान घडलें. तुरुंगांत अतिशय जिव्हाळ्याच्या माणसाचा मृत्यु पाहाण्याचा गांधीजींवर हा दुसरा प्रसंग होता. तुरुंगांत गेल्यावर एक आठवड्यानें म. गांधींचे परमप्रिय शिष्य व निष्णात चिटणीस महादेवभाई देसाई हृदयविकारानें अकस्मात् वारले, हा तुरुंगवासाच्या मानसिक क्लेशाची तीक्ष्णता वाढविणारा पहिला प्रसंग होता. कस्तुरबांच्या मृत्यूनंतर दोन महिन्यांनीं म. गांधी तुरुंगांतून सुटले ( ६ मे १९४४).

१९४३ ऑक्टोबर १९ रोजीं लॉर्ड लिन्लिथगो यांनीं विलायतेस प्रयाण केलें आणि वेव्हेलसाहेब—पूर्वीचे सरसेनापति—त्यांच्या जागीं आले. म. गांधींचा त्यांच्याशीं पत्रव्यवहार सुरू झाला. म. गांधी व सरकार यांच्यांतील मतभेद या पत्रव्यवहारानें मिटले नाहींत. पूर्वी जपानच्या स्वारीला गांधींची अनुकूलता असल्याचा जो कुतर्क सरकारानें प्रकट केला होता, त्यांबद्दल वेव्हेलसाहेबांनीं निराकरण केलें, एवढी एकच गोष्ट या पत्रव्यवहारांत महत्त्वाची दिसते.

१९४५ च्या जूनमध्यें कॉं. कार्यकारिणीचे सभासद बंधमुक्त करण्यांत आले. कॉंग्रेस-संस्थांवर लादलेला बेकायदेशीरपणा उठविण्यांत आला. हळूहळू कॉंग्रेसचे सगळे पुढारी सुटले. कॉंग्रेसश्रेष्ठींची सुटका होतांच त्यांना राष्ट्रीय सरकारची उभारणी करण्यासाठीं व्हाइसरॉयकडून पाचारण मिळालें. सिमल्यास तीन आठवडे (जून २४ ते जुलई १४) कॉंग्रेस व लीग पुढाऱ्यांत याबद्दल खूपशी वाटाघाट होऊन ती सपशेल वांया गेल्याचें व्हाइसरॉयांनीं जाहीर केलें. कॉंग्रेसला बंधमुक्त करण्यापूर्वी वेव्हेलसाहेब विलायतची एक फेरी मारून आले होते.

जुलईच्या शेवटच्या आठवड्यात इंग्लंडमध्यें पार्लमेंटच्या निवडणुकी होऊन त्यात चार्चिलपक्ष आपटला. मजूरपक्षाचे ४१७ उमेदवार निवडले गेले. चार्चिल पक्षाचे फक्त २१०च असामी विजयी झाले. साहजिकच चार्चिलसाहेबांनीं मुख्य प्रधानाचें स्थान सोडलें व ॲटलींच्या नेतृत्वानें मजूरपक्ष अधिकारारूढ झाला. त्यानंतरची स्वराज्यप्राप्तीची हकिकत ताज्या आठवणीची आहे. तथापि, म. गांधींचें देहावसान स्वराज्यप्राप्तीनंतर अवघ्या पांच महिन्यांत झाल्यानें आतां त्यांच्या कामगिरीचा आढावा घेणें बरें.

# म. गांधींची अवतारसमाप्ति : : १२

आपल्या आयुष्याच्या अखेरच्या क्षणापर्यंत काम करावयाचें, ज्या वेळीं देवाला आपलें काम संपलें असें वाटेल त्यावेळीं तोच आपल्या जीविताचा शेवट करील, अशी महात्मा गांधींची निष्ठा प्रसिद्धच आहे. १९४४ सालीं त्यांची सुटका, सरकारनें ते तुरुंगांत आजारी पडले व त्या आजाराला सरकारी औषधोपचारांनीं उतार पडेना म्हणून केली. देशांतलें वातावरण निवळलें होतें व सगळीकडे युरोप-आशियांतील शत्रूंचा मोड होत चालला होता, या स्थितीचाहि गांधींची सुटका करतांना सरकारला आधार वाटत असावा. आजाराच्या निमित्तानें आपणास तुरुंगांतून बाहेर पडण्याची संधि मिळावी याचें म. गांधींना समाधान वाटत नसलें, तरी त्यांचाहि इलाज नव्हता. तुरुंगांतून मोकळें झाल्यावर ते उद्योगास लागले. आजार बरा होण्याकरितां त्यांनीं महाबळेश्वराच्या डोंगरावर पंचगणी येथें कांहीं दिवस मुक्काम केला. या सुमारास हिंदी राजकारण नीट मार्गी लागावें म्हणून व्हाइसरॉयसाहेबांशीं त्यांचा पत्रव्यवहार सुरू होता. याचप्रमाणें कम्युनिस्ट पक्षाबद्दलच्या संशयाचाहि झाडा घेण्यांत ते गुंतले होते. या दिवसांत रामनामाची महति त्यांच्याकडून फार उघडपणें जनतेसमोर ठेवली जात होती. त्यांनीं रामनामाच्या किंवा रामभक्तीच्या सामर्थ्याची या वेळेसारखी प्रशंसा केल्याचीं उदाहरणें त्यांच्या पूर्वीच्या वाङ्मयांत अति विरळ सांपडतील.

१९४४ सालीं मे महिन्याच्या प्रारंभीं म. गांधींची बंधमुक्तता झाल्यावर त्यांनीं प्रथम सर्वांच्या डोळ्यांत भरण्यासारखें जें काम हातीं घेतलें, तें हिंदु-मुसलमानांच्या ऐक्याचें होतें. सप्टेंबराच्या ९ तारखेला मुंबईस त्यांनीं जीनांची भेट घेऊन हें कार्य आरंभिलें. एक पंधरवडा आपसांत गांठीभेटी

आणि पत्रापत्री चालू होती. अखेरीस हा सारा खटाटोप वांया गेल्याचें जगाला समजलें. वाटाघाटींचें मूळ १९४३ सालीं श्री. राजाजी यांनीं जीनांची भेट घेऊन काँग्रेस लीगच्या ऐक्यासाठीं तयार केलेला मसुदा हें होय. या मसुद्यावरून राजाजींविषयीं काँग्रेस-पक्षांतहि नाराजी उद्भवली होती; परंतु म. गांधींचा त्याला आशीर्वाद असल्यानें ही नाराजी कधीं थडकली नाहीं. !आतां तर गांधीच त्या मसुद्याच्या आधारानें जीनांच्या घरीं पायपिटी करूं लागले।! तेव्हां कित्येकांना त्यांचा राग आला, तर कित्येकांना विषाद वाटला. जीना-मियाँचा ज्या काळांत राजकीय क्षेत्रांतील भाव उतरला होता त्या काळांत त्यांची मनधरणी करून गांधी त्यांना निष्कारण महत्त्व देत आहेत, असाहि एक प्रवाद रूढ होता. हिंदुस्थानाची फाळणी करण्याच्या हेक्यापुढें म. गांधींचें कांहीं चालूं नये, हें ठरलेलेंच होतें व तसेंच घडलें. म. गांधींच्या सहनशीलतेला सुद्धां ताण देणारा हा प्रसंग होता. मुसलमान-समाज हें एक स्वतंत्र राष्ट्र आहे व त्याचें स्वतंत्र राज्य असावें, ही भूमिका सोडण्याला जीना तयार नव्हते. उलट, म. गांधींना मुसलमानांच्या स्वतंत्र राष्ट्राची कल्पना व मागणी कबूल करावयास भाग पाडण्याचा हिय्या जीनांनीं धरलेला होता. पण मुसलमान हें स्वतंत्र राष्ट्र या सिद्धांताचा पायाच इतका कच्चा होता, कीं गांधींच्या गळ्यांत तो सिद्धांत बांधण्याचें काम जीनांना साधलें नाहीं. धर्मांतर केल्यानें नवें राष्ट्र निर्माण होत नाहीं, हा म. गांधींचा ग्रह रेसभर ढळला नाहीं. दोघांच्या हेतूंमध्यें असें जमीनअस्मानाचें अंतर असतां म. गांधींनीं जीनांच्या दारीं कशाला जावें याचें उत्तर सरळ आहे. जीनांना व्यक्तिशः किंवा एका बलाढ्य संस्थेचे पुढारी या नात्यानें महत्त्व नसलें, तरी ब्रिटिशांच्या सत्तालोभाचें आश्रयस्थान म्हणून त्यांना निःसंशय महत्त्व होतें. जीनांचें मन वळवितां आलें, तर ब्रिटिशांचा हा शेवटचा आधार नाहींसा होऊन स्वराज्याचा मार्ग अगदीं निर्विघ्न होईल, ही म. गांधींची कल्पना चुकीची नव्हती.

यानंतरच्या काळांत म्हणण्यासारख्या उलाढाली घडल्या नाहींत. १९४५ च्या मध्यांत काँग्रेसचे इतर पुढारी तुरुंगांतून सुटल्यावर सिमला येथें लॉर्ड वेव्हेल यांनीं ज्या वाटाघाटी सुरू केल्या, तेथून पुढें हिंदी राजकारणाचें चक्र जोरानें फिरूं लागलें. सिमल्याच्या वाटाघाटी फिसकटल्या व काँग्रेसची

नेहमींचीं कामें सुरू झालीं. १९४६ साल उजाडलें. देशांत कायदे-मंडळांच्या निवडणुकी झडल्या. त्यांनीं कॉंग्रेस व लीग या हिंदुस्थानांत दोनच प्रमुख संस्था असल्याचा निवाडा दिला व त्या निवाड्याप्रमाणें हिंदी स्वराज्याचें भिजत पडलेलें घोंगडें एकदां पिळून वाळत घालण्याची प्रतिज्ञा ब्रिटिश सरकारानें केली. ब्रिटिशांचे तीन मंत्री हिंदुस्थानांत आले. पुनः वाटाघाटींना भरती आली. परंतु त्यांतून कांहीं निष्पन्न होण्याची आशा दिसेना. शेवटीं कॉंग्रेस-लीगच्या पुढाऱ्यांचें प्रधानमंडळ नेमावें, त्यानें तूर्त राज्यकारभार हाकावा, कॉन्स्टिटयुअंट असेंब्लीनें नवी राज्यघटना तयार करावी, अशी योजना अंमलांत आणाण्याचें ठरलें. १९४६ च्या सप्टेंबर २ तारखेला नवें प्रधानमंडळ अस्तित्वांत यावयाचें होतें. लीगला ही योजना मान्य नव्हती. तिच्या लोकांनीं आपल्या चाळ्यांना सुरुवात करून कलकत्ता शहरीं हिंदु-मुसलमानांच्या भयंकर दंग्याची आग ऑगस्ट १६ तारखेला पेटाविली. कलकत्त्यास पहिल्या एक दोन दिवसांत हिंदु वस्तीला मुसलमानांच्या तयारीचें स्वरूप माहीत नसल्यामुळें जास्त नुकसान सोसण्याची पाळी आली. नंतर पारडें उलटून हिंदूंनीं मुसलमानांचें उट्टें काढलें. कलकत्त्याचा दंगा शमल्याचीं लक्षणें दिसूं लागल्यावर पूर्व बंगालमध्यें नौखाली भागांत मुसलमानांनीं आपल्या संख्यातिशयाच्या जोरावर हिंदूंचा सूड घेण्यास आरंभ केला. त्या हत्याकांडानें हिंदू जनतेचें लक्ष वेधलें असतां बिहार प्रांतीं हिंदूंनीं मुसलमानांचा संहार चालविला. भावी स्वराज्याचे हे विचित्र डोहाळे पाहून या देशाचें पुढें होणार काय, या विषयीं हिंदु-समाजांत सर्वत्र चिंता पसरली. ता. १ सप्टेंबरला दिल्लीस नवें सरकार अधिकारारूढ होणार म्हणून मुसलमानांना त्या दिवशीं त्याचा निषेध करण्याबद्दल लीगमार्फत आदेश मिळाला होता. त्याचा परिणाम म्हणून मुंबई शहरीं व अहमदाबाद येथें हिंदु-मुसलमानांचे दंगे उत्पन्न झाले. इतर प्रांतांतूनहि त्यांचे स्फोट झाले नाहींत असें नाहीं.

दंग्यांच्या भयानक परिस्थितीनें जर कोणाच्या हृदयाला जबरदस्त जखम केली असेल, तर ती महात्मा गांधींच्या. बिहार प्रांतीं हिंदूंची वस्ती मोठी व त्यांनीं अल्पसंख्य मुसलमानांची कत्तल चालविली याचा खेद म. गांधींना इतका असह्य झाला, कीं बिहारी हिंदू आपलें हत्याकांड न थांबावितील तर आपण प्राणांतिक उपोषण करूं, असा

म. गांधींनीं निश्चय व्यक्त केला. पं. जवाहरलाल नेहरूंनीं त्याकरितां बिहारांत फेरी टाकली व दंग्याच्या धुमाकुळांत शिरून हिंदूंना आवरण्याचा यत्न केला. म. गांधी कलकत्त्यास मुक्काम ठोकून बसले व बिहार शांत झाला तेव्हां त्यांनीं नौखालींत दौरा काढला. हा दौरा १९४७ सालांतला आहे. त्यापूर्वी ते कलकत्त्यानजिकच्या खेड्यांतून फिरून लोकांना धीर देण्याचें काम करीत होते. नौखालींत जातांना आपल्याबरोबर संरक्षणार्थ कोणीहि नको, असें आपल्या सहकाऱ्यांना व बंगाल सरकाराला त्यांनीं बजावलें होतें. त्यांनीं संरक्षणाची अपेक्षा बाळगली नाहीं, तरी बंगाल सरकारानें त्यांच्या जवळपास पोलिसांचा बंदोबस्त राहील अशी व्यवस्था केली होती. गांधींच्या जीवनाचें सत्त्व याप्रसंगीं विशेष रीतीनें सर्वांच्या अनुभवास आलें. त्यांनीं हिंदु व मुसलमान या दोघांवरहि उपकार करण्याची बुद्धि ठेवली होती. यामुळें नौखालींत त्यांनीं प्रवेश केला त्यावेळचें संशयाचें वातावरण स्वच्छ होऊन त्यांचा प्रवास मनाजोगा होऊं लागला. पुष्कळ ठिकाणीं मुसलमानांनीं पश्चात्ताप दाखविला व हिंदूंना त्यांच्याबद्दल विश्वास वाटेल असें वर्तन स्वीकारलें. प्रत्येक ठिकाणीं बहुधा ते एकच मंत्र उच्चारीत होते. 'भय सोडा, निर्भय व्हा' हाच तो मंत्र होय. हिंदूंना अनुलक्षून तो मंत्र होता. जातीच्या भेकडाला निराळें भय दाखवावेंच लागत नाहीं. तो आपल्या भित्रेपणानें असतील तीं संकटें वाढवितो आणि नसतील त्यांना उत्पन्न करतो, हा म. गांधींचा अभिप्राय नवा नव्हता. 'भित्यापाठीं ब्रह्मराक्षस' म्हणतात त्यासारखी हिंदु आपली स्थिति करून घेतो, असें त्यांचें निदान त्यांनीं २५ वर्षांमागें लिहिलेलें आढळतें. त्याप्रमाणें हिंदूंना त्यांनीं धीर दिला व मुसलमानांनाहि चीड आणली नाहीं. म. गांधी जीव पणास लावून हिंदु-मुसलमानांच्या एकीसाठीं झटत असतां लीगचे पुढारी फक्त हिंदूंच्या नांवानें खडे फोडण्याशिवाय दुसरें कांहींच करीत नव्हते. जीनांच्या चित्ताला ज्या वेदना झाल्या त्या बिहारच्या मुसलमानांबद्दल. कलकत्ता, नौखाली व इतर ठिकाणीं मुसलमानांनीं केलेल्या अत्याचारांची वार्ता लीग-पुढाऱ्यांच्या कानापर्यंत कधींच न पोंचल्यासारखें त्यांचें वर्तन पाहून हिंदु समाजाचा क्षोभ वाढत गेला. म. गांधींविषयींच्या आदराला

ग्रहण लागत चाललें. मुसलमानांच्या अत्याचाराचें अनुकरण हिंदूंनीं करूं नये, ही त्यांची भावना अत्युच्च मानवतेची दर्शक होती, तरी ती मनांत भरावी अशी हिंदु-मनाची स्थिति यांवेळीं राहिलेली नव्हती.

१९४७ च्या मार्चमध्यें म. गांधी दिल्लीस आले. आतां दिल्लीस राजकारणाच्या मन्वंतराला विलक्षण गति आली होती. ब्रिटिशांनीं सत्तात्यागाच्या निश्चयाची घोषणा करण्याचें मनावर घेतलें. १९४७ च्या १५ ऑगस्ट रोजीं ब्रिटिशांच्या सत्तेची इतिश्री होणार याबद्दल शंका राहिली नाहीं. मे महिन्याच्या सुरुवातीला स्वराज्याच्या विचारविनिमयाला तोंड लागलें. त्यापूर्वी १५ एप्रिल रोजीं गांधी-जीना यांच्या सह्यांचें हिंदु-मुसलमानांनीं आपसांतील वैमनस्य सोडावें, अशा अर्थाचें एक पत्रक प्रसिद्ध करण्याची कामगिरी म. गांधींनीं सिद्धीस नेली. सरकारी दडपणापुढें जीना वांकले व गांधींच्या जोडीनें सही करण्याला तयार झाले असें म्हणतात. यानंतरच्या घडामोडींमुळें जीनांच्या सहींत फारसें तथ्य नव्हतें असें दिसून आलें. ती सही हिंदु मुसलमान हे एका राष्ट्राचे प्रजाजन व यासाठीं त्यांनीं एकमेकांचें वैर टाकावें, या भावनेची नव्हती; अपवाद टाळण्याकरितां होती, असें थोड्याच दिवसांनीं स्पष्ट झालें. हिंदु-मुसलमानांच्या समेटाशिवाय सत्ता सोडायची नाहीं, अशी ब्रिटिशांनीं अट घातलेली होती. हिंदुस्थानची विभागणी करावी हा जीनांचा हट्ट होता. शेवटीं ब्रिटिशांनीं सत्ता व हिंदुस्थानची विभागणी या दोन अनिष्टांतलें दुसरें अनिष्ट कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांनीं स्वीकारलें व ब्रिटिस सत्तेच्या अनिष्टाला खो दिला. मध्यंतरीं कॉंग्रेस—लीगच्या पुढाऱ्यांचें सरकार अंमल करीत होतें. त्याचा विपरीत अनुभव कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांना आला. हिंदु-मुसलमान या द्वैतानें सरकारी कचेऱ्यांतून थैमान चालविलें व या दोन जमातींच्या पुढाऱ्यांना एकत्र काम करणें अशक्य वाटूं लागलें. मुसलमान-मंत्र्यांच्या कारस्थानाचा पाढा एकदां सरदार वल्लभभाईनींच लोकांपुढें वाचल्याचें पुष्कळांना आठवत असेल. अशा रीतीनें रोजच्या व दिवसानुदिवस जास्त जास्त उग्र होत जाणाऱ्या कटकटींत सरकार चालविण्यापेक्षां लीगच्या मतानुसार हिंदुस्थानची फाळणी करून लीगवाल्यांची पीडा दूर करणेंच कॉंग्रेसला श्रेयस्कर वाटलें. महात्मा गांधी हे फाळणीला अनुकूल नव्हते, असें त्यांनीं ता. २५ मे व २ जून या दिवशीं

हिंदुस्थानचे तुकडे न करण्याविषयीं काढलेल्या सार्वजनिक उद्‌गारांवरून म्हणावें लागतें. पण तारीख ३ जून रोजीं हिंदुस्थानच्या फाळणीची ब्रिटिशांनीं घोषणा केली. फाळणी टळतच नाहीं असें पाहिल्यावर कॉंग्रेसनें जीनांच्या पाकिस्तानची मागणी जशीच्या तशी मान्य केली नाहीं. त्यांच्या पाकिस्तानाच्याहि संक्षेप झाला. त्यांना ब्रिटिश राजवटींतील समग्र बंगाल व समग्र पंजाब असे दोन प्रांत त्यालगतच्या मुलुखासुद्धां हवे होते. शिवाय बंगाल-पंजाबला सांधणारी एक पट्टी हवी होती. त्यांना पंजाब व बंगाल हे दोन्ही प्रांत विभागून मिळाले, तेव्हां मधल्या पट्टीचा व या प्रांतालगतच्या प्रदेशाचा प्रश्नच मिटला. १५ ऑगस्ट १९४७ रोजीं हिंदुस्थानांत दोन स्वतंत्र राज्यें उदयास आलीं. हिंदुस्थानांत सर्वत्र स्वराज्य-महोत्सव साजरे झाले.

म. गांधी मात्र व्याकुळ चित्तानें हे महोत्सव पहात होते. मिळालेल्या स्वराज्याचा त्यांना आनंद वाटत नव्हता. स्वराज्याच्या जन्मोत्सवकाळीं लोकांत जो उत्साह दिसावयास पाहिजे तो आपल्याला दिसत नाहीं, सर्वत्र स्मशानकळा आढळते, असल्या आशयाचे त्या प्रसंगासंबंधाचे त्यांचे उद्‌गार प्रसिद्ध आहेत. १९१५ पासून स्वराज्याचा लढा अविश्रांत चालविला तो हिंदुस्थानाच्या विभागणीकरितां नव्हता. हिंदु-मुसलमानांच्या ऐक्याचें जगाला आदर्श वाटणारें स्वराज्य लाभावें म्हणून केलेला उद्योग सपशेल वायां गेला, याचा खेद त्यांच्या थकल्या भागल्या जीवाला असह्य ताप देत होता. हिंदुस्थानच्या विभागणीनें पुनः दंग्याची सांथ जोरावली. कलकत्त्यास या सांथीला पुष्कळसे बळी पडलेले पाहतांच म. गांधींनीं उपवास आरंभला (१ सप्टेंबर १९४७). उपवासामुळें दंगा थांबला व ७३ तासांनीं गांधींनीं उपवास सोडला. कलकत्त्याला शांतता लाभली; पण पंजाब-दिल्लीच्या कत्तलीचा भयंकर प्रसंग याच दिवसांत वाढत चाललेला होता. पश्चिम पंजाबांतल्या मुसलमानी अत्याचारांचें तंतोतंत अनुकरण पूर्व पंजाबांत हिंदूंनीं चालविलें. ती कत्तलींची वावटळ खुद्द दिल्ली या राजधानींत पोंचली. दिल्लीस कॉंग्रेसच्या सरकाराला उलथून पाडण्याचा मुसलमानांचा कट होता व ते १५ ऑगस्ट याच दिवशीं आपला उद्देश सफळ करणार होते. पण त्या दिवशीं हिंदूंचा उत्साह इतका प्रचंड होता कीं सदर कटाची कारवाई क्षणार्धांत धुळीस मिळाली असती. तो उत्साह मावळल्यावर

कटानें उचल खाल्ली व दिल्लीस हिंदूंनीं मुसलमानांची भयंकर लांडगेतोड केली. दिल्ली व पूर्व पंजाब येथून मुसलमानांचा लोंढा पाकिस्तानच्या रोखानें निघाला, तर पश्चिम पाकिस्तान सोडणाऱ्या लाखों हिंदू-शीखांचा प्रवाह दिल्लीकडे आधींच वाहूं लागलेला होता. त्यांचा सूड अलवार, भरतपूर या जाटवाड्यांतील संस्थानांच्या हिंदूंनीं उगवला. कांहीं महिने या प्रदेशांत दंगेखोरांचेंच राज्य होतें. आगगाड्यांतूनहि मुसलमानांना मारण्याचे प्रकार चालले होते. पाकिस्तानवाल्यांची ही विद्या त्यांच्या जातभाईवरच इकडे उलटली होती. दिल्लीचे दंगे थांबविण्यांत सरकारचें बळ खर्ची पडत असतांना म. गांधी ता. ८ सप्टेंबर रोजीं दिल्लीला पोंचले. त्यानंतर त्यांचा मुक्काम दिल्लीसच होता.

म. गांधींच्या मानव्यनिष्ठेची दिल्लीस कसोटी लागली व त्या कसोटीनेंच त्यांच्या प्राणांचा घात झाला. दिल्लींतील मुसलमानांना वांचविण्याकरितां व मुसलमानांना शांत राखण्याकरितां गांधींनीं खवळलेल्या दिल्लींत जीं साहसें केलीं तीं आश्चर्यकारक होतीं. एकदां ३०–४० हजार मुसलमानांच्या वस्तींत ते एकटेच गेले! तसाच प्रकार त्यांनीं दुसऱ्या वेळीं एका मशिदींत जमलेल्या मुसलमानांमध्यें शिरून जगाला दाखविला. मुसलमानांच्या सांत्वनार्थ जातांना त्यांच्याबरोबर पोलीसचा बंदोबस्त नसे. गांधी अमुक ठिकाणीं गेले असें कळलें, म्हणजे पोलिस आपलें कर्तव्य बजावण्यासाठीं मागाहून उपस्थित होत असत. गांधींचें ७८ वर्षांचें वयोमान लक्षांत घेतल्यास त्यांच्या या साहसी हालचाली त्यांच्या कठोर कर्तव्यनिष्ठेची साक्ष पटविण्याऱ्या ठरतात. दर दिवशीं सायंकाळीं चालणाऱ्या प्रार्थनेनंतर त्यांच्या मुखांतून जो उपदेश बाहेर पडे तोसुद्धां कित्येकदां इतका तर्कशुद्ध असे, कीं सामान्यांना तो विलक्षण वाटावा. हिंदी संघराज्यांत कायद्यानें गोवध बंद करण्यांत यावा, अशी कल्पना कोणा सेठियानें उच्चारतांच पाकिस्तानांत क़ायद्यानें मूर्तिपूजा बंद करण्यासारखाच हा प्रकार जुलमाचा ठरणारा आहे, असा म. गांधींनीं त्या कल्पनेचा तावडतोब प्रतिवाद केला. या दिवसांत पाकिस्तानांत मालमत्ता व जवळच्या नात्यागोत्याचीं माणसें गमावून त्या दुःखानें पोळलेल्यांचे जमाव दिल्लींत भरलेले होते. त्यांच्या दुःखकथांनीं दिल्लीचे इतर मुस्लिमेतर नागरिक हळहळत होते. मुसलमानां-

बद्दलच्या त्वेषानें दिल्लीचें वातावरण भरलेलें असतां, त्या वातावरणाच्या नापल्या तव्यावर आपल्या लोकप्रियतेची पोळी शेकून घेणारे गांधींचे सहकारी जसे वागत होते, तसे गांधी वागत नव्हते. 'मुसलमानांना तलवारबहादुरीची घमेंड असेल, तर हिंदूसुद्धां तलवारबहादुरीनें त्यांचा सामना करतील'; 'हिंदूंच्या धर्मजीवी संस्था देशभक्तांच्या आहेत'; पाकिस्तानच्या वांटणीची रक्कम पाकिस्तानला तूर्त मिळावयाची नाहीं, कारण तिचा उपयोग हिंदी संघराज्याविरुद्ध केला जाण्याचा संभव आहे' अशी अविचाराची भाषा हिंदूंच्या अंतरंगांत मुसलमानांचा द्वेष वाढवीत असतां म. गांधींनीं ह्या समाजाला प्रेमानें वागविण्याचा उपदेश करावा, हें सामान्य जनतेला विचित्र वाटल्यास नवल नाहीं. दिल्लीस दर दिवशीं प्रार्थनेमध्यें ते संस्कृत किंवा गुजराती-हिंदी भाषेंतील वचनांबरोबर शीखांचे ग्रंथसाहेब, आणि कुराण, बायबल या ग्रंथांतील वाचनांचा पाठ शीख, मुसलमान, ख्रिस्ती यांना म्हणायला सांगत. या प्रघाताचा पुष्कळांना राग येत असे. दोन चार वेळां कुराणवचनांना श्रोत्यांपैकीं कित्येकांनीं विरोध केल्यामुळें म. गांधींनीं सार्वजनिक प्रार्थना बंद केल्याचेहि दाखले आहेत. व्यत्यय आणला जाणार नाहीं, अशी हमी घेतली जातांच त्यांनीं सार्वजनिक प्रार्थनेचा क्रम सुरू केला. म. गांधींच्या या वागणुकीचा जेवढा विपर्यास करणें शक्य होतें तेवढा विपर्यास हिंदूंचीं अनेक वृत्तपत्रें सर्वत्र करीत होतीं. उर्दू लिपि हिंदुमात्रानें शिकावी, हा म. गांधींचा आग्रहसुद्धां त्या विपर्यासांत भर टाकीत होता. अशा विपर्यासापायीं केव्हांतरी गांधींच्या जीवावर बेतणार, असें सुचविणारीं चिन्हें मधून मधून दिसूं लागलीं होतीं. कलकत्त्यास असतांना एकदां रात्रीच्या वेळीं त्यांच्या वसतिस्थानावर हल्ला झाला. त्यांना मारण्याकरितां त्यांच्या रोखानें कोणा गुण्डानें एक सोटाहि फेकला. दुखापत झाल्याशिवाय तो प्रसंग टळला; पण म. गांधी हे हिंदूंच्या हिताचे महान् शत्रु आहेत व त्यांना अधिक जगूं दिल्यानें हिंदूंचें आणखी किती नुकसान होईल यांचा भरंवसा नाहीं, अशी विचारसरणी मात्र बळावत गेली.

गांधींनीं मुसलमानांकरितां दिल्लीला उपवास आरंभतांच (ता. १३ जानेवारी १९४८) वरील विचारसरणीच्या माथेफिरूंचें डोकें फारच ठणकूं लागलें. उपवास १७३ तास चालला होता. दिल्लींत शांतता राखण्याची सर्व

पक्षांच्या पुढाऱ्यांनीं हमी घेतल्यावर म. गांधींनीं उपवासाची समाप्ति केली. म. गांधींनीं मुसलमानांच्या अनुकूलतेनें घातलेल्या अटी अगदीं साध्या व किरकोळ स्वरूपाच्या असतांहि त्यांवर जिकडे तिकडे जीं भाष्यें होऊं लागलीं तीं निर्मेळ अविचारी, गांधीद्वेषाचीं दर्शक होतीं. या भाष्यांत पाकिस्तानला ५५ कोट रुपये दिले, या घटनेचाहि समावेश करून हिंदूंकडून जिझियासारखी पट्टी लादून ती रकम सक्तीनें उभारल्याप्रमाणें हिंदूंमध्यें तावातावानें चर्चा होत असे. म. गांधींनीं राजकारणांतून निवृत्त व्हावें, असें कोणी बोलला कीं त्याचा अनुवाद परोपरीनें सर्व प्रांतांमधून होऊं लागे ! म. गांधींनीं 'प्राण असे-तोंवर आपण आपलें कर्तव्यक्षेत्र सोडणार नाहीं' असें जाहीर करतांच गांधींविषयीं दारुण वैरबुद्धि बाळगणारांना मोठा पेंच पडला ! उपवासांतून गांधी उठले, नव्हे, अशा तरतरीनें उठले कीं यापुढें आपण सव्वाशें वर्षांहून जास्त जगणार अशी उमेद त्यांना वाटूं लागली ! राजकारणांतून बाहेर पडत नाहींत, व लवकर मरण्याच्या गोष्टी बोलत नाहींत, तेव्हां त्यांच्या जीविताचा नाश करणें हा उपाय महाराष्ट्रांत कित्येकांना सुचला. वस्तुतः महाराष्ट्राचा व पंजाब-दिल्लीच्या कत्तलीचा बादरायणसंबंध लागणेंहि कठिण. महाराष्ट्रांतील टिळकांच्या तालमींतला वर्ग गांधींच्या चळवळीशीं बहुधा असहकारानें 'सुखं च मे शयनं च मे' अशी वृत्ति धरून वागला. पण यावेळीं त्याच वर्गांतल्या कांहीं जणांना 'गांधींचा नाश' या कल्पनेचा हृद्रोग जडला. ता. २० जानेवारीला प्रार्थनेच्या सभेंत बॉबगोळ्याचा प्रयोग झाला. परंतु गांधी डगमगले नाहींत व सभेंतहि गडबड वाढली नाहीं. बॉबफेक करणारा पंजाबी तरुण होता. त्यानंतर १० दिवसांनीं एका महाराष्ट्रीय ब्राह्मणानें, म. गांधी प्रार्थनेस निघाले असतां त्यांच्यावर चाल करून पिस्तुलाच्या गोळ्या झाडल्या व आपलें दुष्ट इच्छित शेवटास नेलें ! गोळीबार सायंकाळीं ५ वाजून ५ मिनिटांनीं झाला व ५ वाजून ४० मिनिटांनीं महात्माजींचें प्राणोत्क्रमण घडलें. गोळी लागतांच 'हे राम ! हे राम !' असे शब्द त्यांच्या मुखांतून बाहेर पडले. मुखांत रामनाम, चेहऱ्यावर हास्य आणि अंगावर गोळ्यांची वृष्टि, अशा स्थितींत मरण यावें ही महात्माजींची मृत्युविषयक इच्छा खरी झाल्याचें प्रत्ययास आलें. त्यांच्या देहान्तानें एका युगप्रवर्तकाचा देहान्त झाला, असें साऱ्या जगानें सिद्ध केलें.

# आमच्याकडे सोल-एजन्सीनें असलेलीं पुस्तकें


| | | |
|---|---|---|
| १ | राजनीतिशास्त्र-परिचय : आचार्य जावडेकर | ३ |
| २ | महायुद्ध आणि राष्ट्रसभा : ,, ,, | ।= |
| ३ | आधुनिक राज्यमीमांसा (भाग १ व २) : ,, ,, | २। |
| ४ | पुरोगामी साहित्य : ,, ,, | २ |
| ५ | महाराष्ट्र व हिंदी राजकारण : ,, ,, | १ |
| ६ | समाईक सहकारी स्वराज्य : ,, ,, | ।• |
| ७ | लो. टिळक व म. गांधी : ,, ,, | २ |
| ८ | विनोबाजी भावे : साने गुरुजी | १ |
| ९ | स्वराज्यसंस्थापक श्रीशिवराय : साने गुरुजी | ।• |
| १० | रामाचा शेला : साने गुरुजी | ३ |
| ११ | पत्री : साने गुरुजी | ३॥ |
| १२ | दरबार गोपाळदास : ह. मो. जोशी | ८= |
| १३ | जीवनयोग : ना. ग. जोशी | ॥। |
| १४ | पाकिस्तान : ॲड्. ग. वा. जोशी | १ |
| १५ | कारागृहाच्या भिंती : ना. ग. गोरे | ३ |
| १६ | त्रिमंत्रि-योजना (भाग १ व २) | २॥ |
| १७ | हिंदी रेल्वे-कामगार : वि. न. साने | ॥। |
| १८ | डॉ. सन्यतसेन : वि. म. भुस्कुटे | ३ |
| १९ | साजबा साळी : सुशील परभृत | ३ |
| २० | भ्रान्त जीवन : प्रेमा कंटक | २। |
| २१ | कविता : ना. ग. जोशी | १ |
| २२ | स्वेदगंगा : विंदा करंदीकर | ३ |

सर्व प्रकारच्या पुस्तकांकरितां प्रथम आमच्याकडे चौकशी करा.

**सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला : : टिळक रोड, पुणें २**